॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ॥

# अध्याय अठरावा

अवतरणिका—भगवंतांनी सतराव्या अध्यायापर्यंत अर्जुनाला समोर करून सर्व जगताला जे तत्त्वज्ञान सांगितले त्याची उजळणी करून थोडक्यात पुनः सारांश सांगण्याकरिता अठराव्या अध्यायाची निर्मिती झाली आहे. या अध्यायाला श्रीज्ञानेश्वर माउलींनी ''हा अठरावा अध्याय नोहे। हे एकाध्यायी गीताची आहे'' ( ज्ञाने० अ० १८-८४ ) असे म्हटले आहे. आचार्यहि ''सर्वस्यैव गीताशास्त्रस्यार्थोऽस्मिन्नध्याय उपसंहृत्य.............सर्वेषु ह्यतीतेष्वध्यायेषूक्तोऽर्थोऽस्मिन्नध्यायेऽवगम्यते'' ( अवतरणिका गीताभाष्य ) ''सर्वच गीताशास्त्राचा अर्थ या अध्यायात संक्षेपतः संग्रहीत करून पूर्वी होऊन गेलेल्या सर्व अध्यायामध्ये सांगितलेला शास्त्रार्थ या अध्यायांत ज्ञात होतो.'' असेच म्हणतात एवं दोघांच्याहि मताने गीतेतील तत्त्वज्ञान संक्षेपरूपाने पहावयाचे असल्यास ते अठराव्या अध्यायात दिसून येईल.

**जयजय देव निर्मळ। निजजनाखिलमंगळ। जन्मजराजलदजाळ। प्रभंजन॥ १ ॥**
**जयजय देव प्रबळ। विदळितामंगळकुळ। निगमागमद्रुमफळ। फलप्रद॥ २ ॥**

**अर्थ**—हे सद्‌गुरुदेवा! तू त्रिगुणात्मक उपाधिरहित असा निर्मळ आहेस. तू आपल्या भक्तांचे संपूर्ण कल्याण करतोस. तू जन्मजरारूपी मेघांच्या समूहांचा नाश करणारा वायुच आहेस, तुझा जयजयकार असो॥ १ ॥ हे सद्‌गुरु देवा! तू सर्व समर्थ असून दुःखरूपाने फलद्रूप होणाऱ्या सर्व अशुभांचा निःशेष नाश करणारा आहेस. वेदशास्त्ररूपी वृक्षाचे मोक्षरूपी फळ तूच असून ते प्राप्त करून देणारा तूच आहेस. तुझा जयजयकार असो॥ २ ॥

**गूढार्थदीपिका**—योगप्राप्ति किंवा परमेश्वर प्राप्ति हीच मोक्षप्राप्ति होय. ती भगवंताच्या किंवा श्रीगुरुच्या कृपेनेच होते. म्हणजे चित्ताची शुद्धि व इतर साधनभूत प्रयत्न हे त्याची कृपा संपादन करून केली असताच फलद्रूप होतात असा भाव.

**जयजय देव सकळ। विगतविषयवत्सल। कलितकाळकौतूहल। कलातीत॥ ३ ॥**
**जयजय देव निश्चळ। चलितचित्तपानतुंदिल। जगदुन्मीलनाविरळ-। केलिप्रिय॥ ४ ॥**

**अर्थ**—हे श्रीगुरुदेवा! संपूर्ण तूच एक आहेस. निःशेष विषयवासनारहित झालेल्यांना, आपल्या लहान मुलावर प्रेम करणाऱ्या आईप्रमाणे तू ममताळु आहेस. काळाच्या क्षणोक्षणी होणाऱ्या जन्ममृत्युरूपी क्रीडेला तू नाहीसा करणारा आहेस. तू अंशरहित असा अफूट, पूर्ण आहेस. तुझा जयजयकार असो॥ ३ ॥ हे श्रीगुरुदेवा! तू अवयवरहित असल्यामुळे गतिरहित अखंड अढळ आहेस. चंचल चित्ताचे प्राशन करून तू दोंदिल झाला आहेस-म्हणजे चित्ताच्या चंचलपणाचा नाश करून तू निःशेष वासनारहित नित्यतृप्त आहेस. नामरूपात्मक जगताच्या रूपाने निरंतर प्रगट होण्याची क्रीडा तुला फार प्रिय आहे. तुझा जयजयकार असो॥ ४ ॥

**गूढार्थदीपिका**—मायाभ्रांतिमुळे जीवाला परमेश्वराच्या नामरूपात्मक सगुणरूपाने प्रगट होण्याचा व अंतर्धान पावण्याचा प्रत्यय येत असला तरी परमेश्वराचे नामरूपात्मक सगुणस्वरूप निरंतरच असते. म्हणजे ते सत्, चित् व आनंदमय पूर्ण परब्रह्मच आहे, असे माउलींनी दाखविले आहे.

**जयजय देव निष्कळ। स्फुरदमंदानंदबहळ। नित्यनिरस्ताखिलमळ। मूळभूत॥ ५ ॥**
**जयजय देव स्वप्रभ। जगदंबुदगर्भनभ। भुवनोद्भवारंभस्तंभ। भवध्वंस॥ ६ ॥**
**जयजय देव विशुद्ध। अविद्योद्यानद्विरद। शमदममदनमदभेद। दयार्णव॥ ७ ॥**

**जयजय देवैकरूप। अतिकृतकंदर्पसर्पदर्प। भक्तभावभुवनदीप। तापापह॥ ८॥**
**जयजय देव अद्वितीय। परिणतोपरमैकप्रिय। निजजनजित भजनीय। मायागम्य॥ ९॥**
**जयजय देव श्रीगुरो। अकल्पनाख्यकल्पतरो। स्वसंविद्द्रुमबीजप्ररो-। हणावनी॥ १०॥**

**अर्थ**—अखंडपूर्ण असलेल्या श्रीगुरुदेवा! तू स्फुरत असलेला आनंदच होय. अविद्यादि कोणतेहि दोष तुझ्या ठिकाणी कधीच नाहीत. असा तू सदा सर्वदा मूळचा दोषरहित केवळ आनंदरूप आहेस. तुझा जय जयकार असो॥ ५॥ हे श्रीगुरुदेवा! तू स्वयंप्रकाश म्हणजे तूच तुला प्रकाशित करणारा, जगद्रूपी मेघाच्या गर्भाला धारण करणारे आकाश, त्रिभुवनाच्या उत्पत्तीच्या आरंभाचा आधारभूत स्तंभ व संसाराच्या प्रत्ययाचा नाश करणारा तू आहेस. तुझा जयजयकार असो॥ ६॥ हे श्रीगुरुदेवा! तू सदासर्वदा अविद्यादि दोषरहित शुद्ध असल्यामुळे अविद्यारूपी उपवनाचा नाश करणारा हत्ती व शमदमाच्या योगाने कामवासनेमुळे उत्पन्न होणाऱ्या मदाचा नाश करणारा असा तू दयेचा सागर आहेस. तुझा जयजयकार असो॥ ७॥ अखंड एकरूप अशा श्रीगुरुदेवा! तू कामरूपी सर्पाच्या गर्वाचे उल्लंघन म्हणजे त्याचा नाश करणारा आहेस. तू भक्ताच्या प्रेमळ अंत:करणरूपी मंदिरातील दिवा आहेस व तू सर्व ताप नाहीसे करणारा आहेस. तुझा जयजयकार असो॥ ८॥ हे श्रीगुरुदेवा! तुझ्या सारखा दुसरा कोणी नाही. चित्ताची परम शांती हीच एक तुला प्रिय आहे. तू आपल्या भक्ताच्या स्वाधीन होतोस. तू भजनास योग्य आहेस. मायाभ्रांति आहे तोपर्यंत तू प्राप्त होत नाहीस. तुझा जयजयकार असो॥ ९॥ हे श्रीगुरुदेवा! कल्पनारहिततारूप .किंवा निर्विकल्पतारूप इच्छित फल देणारा तू कल्पतरू आहेस. आत्मचैतन्यरूप वृक्षाचे ब्रह्मज्ञानरूपी बीज अंकुरित करून वाढीला लावणारी जमीन तूच आहेस. तुझा जयजयकार असो॥ १०॥

**हें काय एकैक ऐसें। नानापरिभाषावशें। स्तोत्र करूं तुजोद्देशें। निर्विशेषा॥ ११॥**

**अर्थ**—याप्रमाणे अनेक परिभाषेच्या अनुरोधाने एक एक विशेषण घेऊन तुझ्या निर्विशेष स्वरूपाची कशी स्तुति करू शकणार॥ ११॥

**गूढार्थदीपिका—निर्विशेषा**-सर्व व एकमेव सच्चिदानंद असलेल्या व त्याहून दुसरे काही नसलेल्या परमेश्वराचे ठिकाणी विशेष भाव व तो दाखविण्याकरितां विशेष लक्षणें राहू शकत नाहीत; म्हणून परमेश्वराला ''निर्विशेष'' म्हणतात.

**जिहीं विशेषणीं विशेषिजे। तें दृश्य नव्हे रूप तुझें। हें जाणें मी म्हणोनि लाजें। वानणां इहीं॥ १२॥**

**अर्थ**—जी जी विशेषणे लावून तुझी स्तुती करावी त्या त्या विशेषणाच्या योगाने तुझे रूप दृश्यकोटीत येत असल्यामुळे तू त्या रूपाहून साक्षित्वाने निराळाच राहतोस, हे मी जाणतो. म्हणून कोणतीही विशेषणे लावून तुझी स्तुती करण्याची माझ्या मनाला लाजच वाटते॥ १२॥

**गूढार्थदीपिका**—जी जी विशेषणे लावून तुझी स्तुति करावी ती ती विशेषणे तुझ्या निर्विशेष स्वरूपाहून भिन्न असल्यामुळे त्यांच्या योगाने विशिष्ट झालेले तुझे द्रष्टृस्वरूपही साक्षी स्वरूपाहून निराळे पडून भिन्न अशा दृश्यकोटीत येते, असा अर्थ.

**परी मर्यादेचा सागरु। हा तंवचि तया डगरु। जंव न देखे सुधाकरु। उदया आला॥ १३॥**
**सोमकांतु निजनिर्झरीं। चंद्रा अर्घ्यादिक न करी। तें तोचि अवधारीं। करवी कीं जी॥ १४॥**
**नेणों कैसी वसंतसंगें। अवचितिया वृक्षाचीं अंगें। फुटती तैं तयांही जोगें। धरणे नोहे॥ १५॥**
**पद्मिनी रविकिरण। लाहे मग लाजे कवण। कां जळें शिवतलें लवण। आंग भुले॥ १६॥**
**तैसा तूंतें जेथ मी स्मरें। तेथ मीपण मी विसरें। मग जाकळिला ढेंकरें। तृप्त जैसा॥ १७॥**
**मज तुवां जी केलें तैसें। माझें मीपण दवडूनि देशें। स्तुतिमिषेंच पां पिसें। बांधलें वाचे॥ १८॥**

**अर्थ**—असे असले तरी ज्या प्रमाणे, समुद्र आपली मर्यादा सोडत नाही, अशी जी समुद्राची ख्याती तो चंद्रउदयाला येत नाही तोपर्यंतच खरी असते॥ १३॥ किंवा चंद्रकांतमणी आपण होऊन आपल्या पाझराने चंद्राला

अर्घ्यादिक अर्पण करीत नाही; पण चंद्रोदय झाल्याबरोबर तो चंद्रच सोमकान्त मण्याकडून त्याला पाझर फोडून अर्घ्यादिक करवून घेतो॥ १४॥ अथवा वसंतऋतूच्या आगमनाबरोबर झाडांना कसे अकस्मात् अंकुर फुटतात, हे सांगता येत नाही; पण झाडांच्यानी ते थांबवून धरवत नाही॥ १५॥ सूर्यविकासिनी कमळावर सूर्याचे किरण पडल्याबरोबर त्याचा सर्व संकोच सुटून ते टवटवीत व प्रफुल्ल होते. किंवा मिठाच्या खड्याला पाणी लागल्या बरोबर तो आपला आकाररूप देहच विसरतो॥ १६॥ ज्याप्रमाणे तृप्त झालेला पुरुष ढेंकराने व्यापून जातो, त्या प्रमाणें जेथे मला तुझे स्मरण होते तेथे माझे मीपणच भासत नाही (एक तूच राहतोस)॥ १७॥ त्याप्रमाणे मलाही तू केले आहेस. माझ्या मीपणाला देशोधडीला लावून तुझ्या स्तुतीच्या निमित्ताने माझ्या वाणीला वेडच लावून दिले आहेस॥ १८॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानी भक्तांना मीपणा व देहादिक या सर्वांचा विसरच पडत असल्यामुळे त्यांच्याकडून कर्तृत्वस्फुरणपूर्वक स्तुत्यादिक होत नसतात. ते सर्व सहजसहजी प्रेमानेच होत असते. म्हणजे त्यांचा तो स्वभावच होऊन जातो. ''स्वभावो भजनं हरेः'' किंवा परमेश्वरच प्रेमातिरेकामुळे आपली स्तुत्यादिक भक्ति करीत असतो, असा भाव.

**ना एऱ्हवीं तरी आठवीं। राहोनि स्तुति जैं करावी। तैं गुणागुणीया धरावी। सरोभरी कीं॥ १९॥**
**तरी तूं जी एकरसाचें लिंग। केवीं करूं गुणागुणी विभाग। मोतीं फोडोनि सांधितां चांग। कीं तैसेंचि भलें॥ २०॥**
**आणि बाप तूं माय। इहीं बोलीं ना स्तुति होय। डिंभोपाधिक आहे। विटाळु तेथें॥ २१॥**
**जी जालेनि पाइकें आलें। तें गोसावीपण केवीं बोलें। ऐसें उपाधी उशिटलें। काय वर्णूं॥ २२॥**
**तरी आत्मा तूं एकसरा। हें ही म्हणतां दातारा। तरी आंतुल तूं बाहेरा। घापतासी॥ २३॥**
**म्हणूनि सत्यचि तुजलागीं। स्तुती न देखों जी जगीं। मौनावांचूनि लेणें आंगीं। सुसीना मा॥ २४॥**
**स्तुती कांहीं न बोलणें। पूजा कांहीं न करणे। सन्निधीं कांहीं न होणें। तुझ्या ठायीं॥ २५॥**
**तरी जिंतलें जैसें भुली। पिसें आलापु घाली। तैसें वानूं तें माउली। उपसाहावें तूं॥ २६॥**

**अर्थ**—नाही तर सर्वांची आठवण राहून तुमची स्तुती करू गेली तर गुणी व अगुणी किंवा विशेष व निर्विशेष असा द्वैतभाव धरून ठेवावा लागतो॥ १९॥ महाराज! आपण एकरस एक जिनसी अफुट लिंग आहा. तेथे गुणी अगुणी असा भेद कसा करू? मोती फोडून त्याला जोडणें हे बरे की तो न फोडता तसाच ठेवणे बरे!॥ २०॥ आणि तुम्हाला माय किंवा बाप म्हणून आळवले, तरी या शब्दांनी ती स्तुती होत नाही; कारण त्याठिकाणी अज्ञानी बाळपणाची उपाधि घ्यावी लागते॥ २१॥ मी सेवक झालो असता तुमच्याकडे स्वामीपणा येतो. तो स्वामीपणा मी कसा सांगू? या प्रमाणे उपाधीच्या योगाने उष्टे झालेल्या स्वरूपाचे काय वर्णन करू?॥ २२॥ तू सर्वत्र आत बाहेर एक सारखा आत्मस्वरूपच आहेस, असे म्हटले तरी, हे प्रभो! तू आत असलेला बाहेर घातला जातोस॥ २३॥ म्हणून तुझ्या स्वरूपाची योग्य स्तुतीच जगात होऊ शकत नाही. मौनावाचून दुसऱ्या कोणत्याही शब्दालंकाराने तू आपल्याला सुशोभित होऊ देत नाहीस ना?॥ २४॥ कांही न बोलणेच ही तुझी स्तुती होय. काही न करणेच ही तुझी पूजा होय आणि काही न होणे हेच तुझ्या सन्निध असणे होय॥ २५॥ तरी ज्याप्रमाणे भ्रमाने भुललेला वेडा नाना प्रकारचे आलाप करतो त्याप्रमाणे वेडा होऊन जे मी तुझे वर्णन करतो त्याबद्दल त्या मला माउलीने क्षमा करावी॥ २६॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्माच्या निर्गुण स्थितीचे वर्णन करण्याकरितां वापरण्यात येणाऱ्या भाषेचा वापर करून सगुण स्वरूप असलेल्या सद्गुरुंच्या स्थितीचे वर्णन, श्रीज्ञानेश्वर महाराज या सर्व ओव्यातून करीत आहेत. यात काही विद्वान समजतात तसा अर्थवाद नाही. ज्ञानानंतर निर्गुण तेच सगुण व सगुण तेच निर्गुण असते. निर्गुण व सगुणात अज्ञानकाळी भासणारा भेद राहत नाही, हे माउलीला या ठिकाणी सांगावयाचे आहे. ज्ञानदृष्टीने पाहता सर्व विशेषणे सापेक्षतेची बोधक आहेत. ती निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी ज्याप्रमाणे लागू शकत नाहीत, त्याचप्रमाणे प्रीतिवृत्तीचे आलंबन झालेल्या सच्चिदानंदस्वरूप अशा सगुण सद्गुरुलाही लागू शकत नाहीत. म्हणूनच माउलीने सद्गुरुचे वर्णन करताना सद्गुरुला एका मौनावाचून दुसरा कोणताही अलंकार शोभू शकत नाही, असे म्हटले आहे. एकरस

अशा परब्रह्मस्वरूप सद्‌गुरुचे ठिकाणी कोणत्याच गुणाचा प्रवेश संभवत नसल्याकारणाने कोणतेही विशेषण वापरून केलेली स्तुती ही भेदालाच धरून होईल.

पण असे असले तरी सद्‌गुरुच्या कृपेने प्राप्त झालेल्या आत्मानंदामुळे प्रीतिवृत्तीचे कल्लोळ शिष्याच्या अंत:करणात सारखे उठत असतात व ते सद्‌गुरुची स्तुती करण्याला अभावितपणे त्याच्या वाणीला प्रेरित करतात.

प्रीतिवृत्तीच्या या वर्तनात माउली म्हणते की मला कशाचेच भान राहत नाही. कार्यकारणात्मक असलेल्या व्यावहारिक दृष्टिकोनातून सुसंगत वाटत नसलेली ही स्थिती प्रीतीच्या दृष्टीने मात्र सुसंगतच म्हणावी लागते, कारण प्रीति ही अद्वैतज्ञानावर अधिष्ठित व एकरसात्मक असल्याकारणाने द्वैतमूलक व्यावहारिक ज्ञानातील कार्यकारणात्मक सुसंगततेला प्रीतिकल्लोळात स्थान राहत नाही.

**आतां गीतार्थाची मुक्तमुदी। लावीं माझिये वाग्वृद्धी। जें माने हे सभासदीं। सज्जनांच्या॥ २७॥**

**अर्थ**—आता मी केलेल्या गीतार्थाच्या शब्दविस्तारास, सज्जन समुदायात जेणे करून ते मान्य होईल अशी मोत्याची अंगठी घाला॥ २७॥

**गूढार्थदीपिका**—या अठराव्या अध्यायाचे विवेचन संपूर्ण गीतार्थाचे सार असल्यामुळे मोत्याच्या मुदीप्रमाणे सुंदर भाषेत थोडक्यांत व्यक्त होईल असे करा, असा भाव. (मोती अलक्ष्मीचा नाश करणारे व यश प्राप्त करून देणारे आहे असे त्याचे फल वराहपुराणांत सांगितले आहे.)

**तेथ म्हणितलें श्रीनिवृत्ती। नको हें पुढतपुढती। परिसीं लोहा घृष्टी किती। वेळवेळां कीजे गा॥ २८॥**
**तंव विनवी ज्ञानदेवो। म्हणे हो कां जी पसावो। तरी अवधान देतु देवो। ग्रंथा आतां॥ २९॥**

**अर्थ**—तेव्हा श्रीनिवृत्तिनाथ महाराज म्हणाले, अशी वारंवार विनंती करण्याचे कारण नाही. परिसाने लोखंडाला किती वेळा घासावे लागते?॥ २८॥ तेव्हा श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणाले, जी महाराज! हे बोलणे तुमचा प्रसादच होय. आता, महाराज ग्रंथनिरूपणाकडे लक्ष देतील॥ २९॥

**जी गीतारत्नप्रासादाचा। कळसु अर्थ चिंतामणीचा। सर्व गीतादर्शनाचा। पाढाऊ जो॥ ३०॥**
**लोकीं तरी आथी ऐसें। जे दुरूनि कळसु दिसे। आणि भेटीचि हातवसे। देवतेची तिये॥ ३१॥**
**तैसेंचि एथही आहे। जे एकेंचि येणें अध्यायें। आघवाचि दृष्ट होये। गीतागमु हा॥ ३२॥**
**मी कळसु याचि कारणें। अठरावा अध्यायो म्हणें। उवाइला बादरायणें। गीताप्रासादा॥ ३३॥**
**नोहे कळसापरतें कांहीं। प्रासादीं काम नाहीं। तें सांगतसे गीताही। संपलेपणें॥ ३४॥**

**अर्थ**—या गीतारूपी रत्नाच्या राजवाड्याच्या मंदिरावरील कळसाप्रमाणे दुरून दिसणारा चिंतामणीसारखा हा जो सारभूत अर्थ आहे, तो सर्व गीतादर्शनाचा बोध करून देणारा वाटाड्याच होय॥ ३०॥ आणि लोकांमध्ये असा समजही रूढ आहे की देवाच्या मंदिराचा कळस दुरून दिसला असता देवालयातील देवतेची भेटच झाली असे होते॥ ३१॥ तसेच येथेही आहे, कारण ह्या एकाच अध्यायानें संपूर्ण गीताशास्त्र अवगत होते॥ ३२॥ म्हणूनच गीतामंदिराला या अठराव्या अध्यायाचा भगवान व्यासांनी कळस चढविला असे जे मी म्हणतो ते याच कारणाने की मंदिरावर एकदा कळस चढला म्हणजे मंदिराचे काम आता काही शिल्लक राहिलेले नाही असे जसे कळते, त्याचप्रमाणे या अठराव्या अध्यायाच्या रूपाने गीतारूपी मंदिराचे काम पूर्ण झाले असे कळते॥ ३३-३४॥

**गूढार्थदीपिका**—गीतेवर माउलींनी देवळाचे रूपक करून या अठराव्या अध्यायावर देवळाच्या कळसाचे रूपक केले आहे. कळसाचे दुरून दर्शन होताच भक्ताला देवळातील मूर्तीचे प्रत्यक्ष दर्शन झाल्याचा जसा आनंद होतो, त्याचप्रमाणे या अठराव्या अध्यायाच्या अध्ययनाने संपूर्ण गीतेचे सार कळल्याचे सुख मिळते.

देवळावर कळस चढविल्यानंतर देवळाचे काम पूर्ण झाले, असे लोक समजतात, त्याचप्रमाणे गीतारूप मंदिराचा कळस असलेल्या या अठराव्या अध्यायामुळे गीतेत भगवंतांनी सांगितलेल्या तत्त्वज्ञानाची परिसमाप्ति झाली आहे हे देवळाच्या रूपकाद्वारे श्रीमाउलींनी सूचित केले आहे.

सतराव्या अध्यायापर्यन्त सांगितलेल्या तत्त्वज्ञानात्त काही प्रश्नांच्या बाबतीत संदिग्धता किंवा अस्पष्टार्थता राहिली असेल तीही या अठराव्या अध्यायाच्या रूपाने भगवंतांनी काढून टाकून एकजिनसी तत्त्वज्ञान सांगितले हेही यातून ध्वनित केले आहे.

गीतेचे तत्त्वज्ञान एकरूप असून त्याचा विचार करताना तात्पर्यवृत्तीने गीतेचे तत्त्वज्ञान ग्रहण करायला पाहिजे, हे या ठिकाणी देवळाच्या रूपकाने दाखविले आहे.

कर्मयोग, ज्ञानयोग व भक्तियोग या त्रयींवर गीतेच्या तत्त्वज्ञानाची उभारणी करण्यात आली आहे व त्याचे विस्तृत वर्णन यथास्थान निरनिराळ्या अध्यायातून माउलींनी केलेही आहे. मात्र या तिघांच्याही मर्यादा कोठे सुरू होतात व कोठे संपतात हे सांगता येत नाही. हे तिन्हीही योग स्वतंत्र नसून ते एकमेकांना पूरक आहेत व शेवटी ते तिन्हीही प्रलयार्णवाप्रमाणे एकरूप होतात. त्यांच्यात भेद राहत नाही. या तीन स्वतंत्र विचारसरणी नसल्यामुळे एकाच वस्तूच्या तीन अंगाप्रमाणे या तिघांची स्थिती आहे. म्हणूनच एकजिनसी अशा तत्त्वज्ञानाचे देऊळ भगवंतांनी गीतेत अठराव्या अध्यायाच्या रूपाने उभारले आहे असे माउली म्हणते.

**व्यासु सहजें सूत्री बळी। तेणें निगमरत्नाचळीं। उपनिषदर्थाची माळी। माजीं खांडिली॥ ३५॥**
**तेथ त्रिवर्गाचा अणुआरु। आडऊ निघाला जो अपारु। तो महाभारतप्राकारु। भोंवता केला॥ ३६॥**
**माजीं आत्मज्ञानाचें एकवट। दळवाडें झाडूनि चोखट। घडिलें पार्थवैकुंठ-। संवाद कुसरी॥ ३७॥**
**निवृत्तिसूत्र सोडवणिया। सर्व शास्त्रार्थ पुरवणिया। आवो साधिला मांडणिया। मोक्षरेखेचा॥ ३८॥**
**ऐसेनि करितां उभारा। पंधरा अध्यायांत पंधरा। भूमी निर्वाळलिया पुरा। प्रासादु जाहला॥ ३९॥**
**उपरि सोळावा अध्यावो। तो ग्रीवेघंटेचा आवो। सप्तदशु तोचि ठावो। पडघाणिये॥ ४०॥**
**तयाहीवरी अष्टादशु। तो अपैसा मांडला कळसु। उपरि गीतादिकीं व्यासु। ध्वज लागला॥ ४१॥**
**म्हणोनि मागील जे अध्याय। ते चढते भूमीचे आय। तयांचे पुरें दाविताहे। आपुल्या आंगीं॥ ४२॥**
**जाल्या कामा नाहीं चोरी। ते कळसें होय उजरी। तेवीं अष्टादशु विवरी। साद्यंत गीता॥ ४३॥**
**ऐसा व्यासें विंदाणिये। गीताप्रासादु जोडणिये। आणूनि राखिले प्राणिये। नानापरी॥ ४४॥**

**अर्थ—**व्यास हे मुळातच मोठे कारागीर होते. त्यांनी वेदरूप रत्नांच्या पर्वतावर उपनिषदरूपी माळजमिनीमध्ये खणती लावली॥ ३५॥ त्या खणण्यात धर्म, अर्थ व काम हा त्रिविध पुरुषार्थरूपी जो पुष्कळसा चाराचुरा व दगडधोंडा निघाला त्याचा त्या भोंवती त्यांनी महाभारतरूपी मोठा परकोट बांधला॥ ३६॥ खणतीत निघालेल्या आत्मज्ञानरूपी अखंड दगडाला साफसूफ करून त्याचा श्रीकृष्ण व अर्जुन यांचा संवादरूपी चांगला चिरा तयार केला॥ ३७॥ वैराग्यरूपी दोरी लावून आणि सर्व शास्त्रांच्या अर्थाची भर घालून त्या चिराच्या मांडणीने मोक्षाच्या स्वरूपाचा आकार साधला॥ ३८॥ अशा रीतीने बांधकाम चढता चढता पंधरा अध्यायापर्यन्त पंधरा थर पुरे होऊन (पंधरा अध्याय पूर्ण होऊन) गीतारूपी मंदीर पूर्ण झाले॥ ३९॥ वरती सोळावा अध्याय हा मंदिराच्या गळमण्याचा घाट असून सतरावा अध्याय जो आहे तोच कळसाची बैठक होय॥ ४०॥ त्यावरही अठरावा अध्याय सहजच कळस मांडला असून वर गीतादी शास्त्रामुळे भगवान् व्यास ध्वज झालेत॥ ४१॥ म्हणून मागील अध्याय चढत्या कामाच्या स्वरूप-भूमिका दाखविणारे आहेत व हा अठरावा अध्याय त्या सर्वांची पूर्ती झाली हे दाखवित आहे॥ ४२॥ झालेल्या मंदिराच्या कामात काहीही त्रुटी राहिली नाही, हेच हा कळस बसविल्याने स्पष्ट होते. याप्रमाणे अठराव्या अध्यायाच्या विवरणाने गीता संपूर्ण झाली आहे॥ ४३॥ याप्रमाणे (महाज्ञानी) व्यासांनी मोठ्या कौशल्याने गीतारूपी मंदिराची जोडणी करून नाना प्रकारांनी प्राण्यांना संसारदुःखातून रक्षिले आहे॥ ४४॥

**एक प्रदक्षिणा जपाचिया। बाहेरोनि करिती यया। एक ते श्रवणमिषें छाया। सेविती ययाची॥ ४५॥**
**एक ते अवधानाचा पुरा। विडापाऊड भीतरां। होऊनि रिघती गाभारां। अर्थज्ञानाच्या॥ ४६॥**
**ते निजबोधें उराउरी। भेटती आत्मया श्रीहरी। परी मोक्षप्रासादीं सरी। सर्वांही आथी॥ ४७॥**

**समर्थाचिये पंक्तिभोजनें। तळिल्या वरिल्या एक पक्वान्नें। तेवीं श्रवणें अर्थें पठणें। मोक्षुचि लाभे॥ ४८॥**
**ऐसा गीता वैष्णवप्रासादु। अठरावा अध्याय कळसु विशदु। म्यां म्हणितला हा भेदु। जाणोनियां॥ ४९॥**

**अर्थ—**कोणी या गीतामंदिराला बाहेरूनच जपाच्या प्रदक्षिणा घालतात. कोणी गीतेचे श्रवण करण्याच्या निमित्ताने याच्या छायेखाली बसतात॥ ४५॥ कोणी एकाग्रतेचा विडा पैसा घेऊन अर्थज्ञानाच्या गाभाऱ्यात शिरतात व ते आत्मबोधाने आत्मरूपी श्रीहरीला तात्काळ भेटतात. परंतु मोक्षरूपी मंदिरात सर्वांची योग्यता सारखीच आहे॥ ४६-४७॥ श्रीमंताच्या पंक्तीस भोजनास बसले असता ब्राह्मणांना व शूद्रांना जसे एकच पक्वान्न वाढले जाते त्याप्रमाणे या गीतेच्या श्रवणाने, अर्थज्ञानाने व पठनाने एक मोक्षच प्राप्त होतो॥ ४८॥ याप्रमाणे गीता हे वैष्णवमंदिर व त्याचा अठरावा अध्याय हा स्पष्ट कळस आहे, असे जे मी म्हटले ते हा भेद जाणूनच म्हटले॥ ४९॥

**गूढार्थदीपिका—**गीतेच्या वाचकांचे निरनिराळे वर्ग पडतात. कोणी अर्थ न जाणता पठनच करतात, तर कोणी श्रवणच करतात. कोणी गीतेचा अर्थ समजून घेतात. माउलींनी या तिन्ही प्रकारच्या लोकांना मोक्षाचा लाभ होतो, असे म्हटले आहे.

अर्थ समजून घेऊन गीतेचे पठन करणाऱ्यांची वृत्ती अर्थानुरूप होत असल्याकारणाने गीतेच्या तत्वज्ञानानुसार त्यांना अनुभव किंवा साक्षात्कार होणें साहजिकच आहे. पण अर्थानुसंधान न ठेवता केवल श्रवण किंवा पठन करणाऱ्यांना मोक्षाचा लाभ कसा होतो, हा प्रश्न निर्माण होणे साहजिक आहे.

गीतेचे पठन करणारे असोत. श्रवण करणारे असोत किंवा अर्थानुसंधान ठेऊन पठन करणारे असोत, हे तिन्ही प्रकारचे लोक भगवद्‌गीतेचे श्रद्धाळु अंत:करणाने पठन, श्रवण किंवा अर्थानुरूप वाचन करणारे आहेत ही गोष्ट प्रथम आपल्याला लक्षात ठेवावी लागेल. मुळीच श्रद्धा नसताना यांपैकी काहीही करणाऱ्यांना मोक्षाचा लाभ होतो असे माउली म्हणत नाही. श्रद्धेने भगवद्‌गीतेचे पठन, श्रवण किंवा अर्थानुसंधान ठेऊन पठन करणाऱ्यांच्या ठिकाणी गीतेचा प्रत्येक शब्द हा साक्षात् भगवंताच्या मुखातून आलेला आहे ही अंत:करणात सारखी जाणीव राहत असल्यामुळे गीतेच्या प्रत्येक शब्दागणिक भगवंताविषयीचे प्रेम त्यांच्या ठिकाणी वाढत जाते. त्या वाढत्या प्रेमामुळेच भगवंताची सगुण मूर्ति त्यांच्या अंत:करणात स्थिरावत जाते. अर्थानुसंधान ठेऊन पठन करण्यामुळे जी ज्ञानाची प्राप्ती झाली असती, तीच प्राप्ती भगवंताविषयीच्या वाढत्या प्रेमामुळे होणार असल्यामुळे सश्रद्धा अंत:करणाने केवळ पठन किंवा श्रवण करणाऱ्यांनाही मोक्षाचा लाभ होतो हे माउलीचे म्हणणे यथार्थच म्हणावे लागेल. ''श्रद्धावान् लभते ज्ञान'' (गी० अ०४-३८) यातही भगवंतांनी श्रद्धेने ज्ञानाची प्राप्ती होते हे स्पष्टपणे सांगितलेच आहे.

वेद हे ज्याप्रमाणे भगवंतापासून निर्माण झालेत त्याप्रमाणे भगवद्‌गीता ही परब्रह्मस्वरूप असलेल्या सगुण साकार भगवंताच्या मुखातून निघाली असल्यामुळे जसे वेद अपौरुषेय आहेत तशीच गीताही अपौरुषेयच आहे. श्री गुलाबराव महाराजांनी गीतेला जागृत्‌श्रुति म्हटले आहे. वेदांतील प्रत्येक शब्दाला जसे मंत्रत्व आहे त्याचप्रमाणे गीताही मंत्ररूपच आहे. ''आत्मा अवतरिते मंत्र'' असे माउलींनीही गीतेविषयी पंधराव्या अध्यायांत म्हटले आहे. मंत्राचा अर्थ कळला न कळला तरी त्यांच्या उच्चाराने देखील ज्याप्रमाणे चित्तशुद्धी होते त्याप्रमाणेच भगवद्‌गीतेच्या पाठाने अर्थ न कळताही चित्त शुद्ध होऊन अंत:करण भगवदनुग्रहाला पात्र होते. त्यातून ज्ञानाचा उदय होऊन साधकाला मोक्षाचा लाभ होतो; असा भाव.

**आतां सप्तदशापाठीं। अध्याय कैसेनि उठी। तो संबंधु सांगों दिठी। दिसे तैसा॥ ५०॥**
**कां गंगायमुनाउदक। वोघबगें वेगळिक। दावी होऊनि एक। पाणीपणें॥ ५१॥**
**न मोडतां दोन्ही आकार। घडिलें एक शरीर। हें अर्धनारीनटेश्वर। रूपीं दिसे॥ ५२॥**
**ना ना वाढिली दिवसें। कळा बिंबीं पैसे। परी सिनानें लेवे जैसें। चंद्रीं नाहीं॥ ५३॥**
**तैसीं सिनानीं चारीं पदें। श्लोक श्लोकावच्छेदें। अध्यावो अध्यायभेदें। गमे कीर॥ ५४॥**
**परी प्रमेयाची उजरी। आनान रूप न धरी। नाना रत्नमणीं दोरी। एकचि जैसी॥ ५५॥**

**मोतियें मिळोनि बहुवें। एकावळीचा पाडु आहे। परी शोभे रूप होये। एकचि तेथ॥ ५६॥**
**फुलां फुलासरां लेख चढे। द्रुतीं दुजी अंगुळी न पडे। श्लोक अध्याय तेणें पाडें। जाणावे हे॥ ५७॥**
**सात शतें श्लोक। अध्यायां अठरांचे लेख। परी देवो बोलिले एक। जें दुजें नाहीं॥ ५८॥**
**आणि म्यांही न सांडूनि ते सोये। ग्रंथ व्यक्ती केली आहे। प्रस्तुत तेणें निर्वाहें। निरूपण आइका॥ ५९॥**

**अर्थ**—आता सतराव्या अध्यायानंतर या अध्यायाचा कसा प्रारंभ होतो तो मला कळला तसा सांगतो॥ ५०॥ ज्याप्रमाणे गंगेयमुनेचे पाणी ओघाचा संबंध लक्षात घेता भिन्न दिसते, पण पाणीपणाने ते एकच आहे॥ ५१॥ स्त्री पुरुषाचे दोन भिन्न आकार नाहीसे न होता ज्याप्रमाणे अर्धनारी नटेश्वराच्या ठिकाणी शरीर एक झाले॥ ५२॥ किंवा चंद्रबिंबाचे ठिकाणी दिवसेंदिवस कळा वाढली असे दिसते पण चंद्राचे ठिकाणी कळेची निराळी पुटे दिली जात नाहीत॥ ५३॥ त्याप्रमाणे प्रत्येक श्लोकाची चार निराळी पदे पडल्यामुळे श्लोकांना मर्यादा आली व श्लोकांच्या मर्यादेमुळे अध्याय वेगळे पडले, असा खरोखर भेद वाटतो॥ ५४॥ तरीपण ज्याप्रमाणे नाना रत्नात ओवलेला दोरा एकच असतो, त्याप्रमाणे (गीतेतही) सिद्धान्ताची स्पष्टता निरनिराळी नाही॥ ५५॥ पुष्कळशी मोत्ये (सुतात एके ठिकाणीं) मिळाली असता त्यांना एकसरी हार असा मान मिळतो, परंतु त्यांच्या योगाने शोभणारे रूप एकच असते॥ ५६॥ फुलावर फूल चढले असता फुलांची मंख्या वाढते, परंतु त्यांचा सुवास एकच असतो. सुवासाला एकापेक्षा जसे दुसरे बोट मोजावे लागत नाही, त्याप्रमाणे श्लोक व अध्याय यांची गणती जाणावी॥ ५७॥ श्लोकांची संख्या सातशे आहे व अध्याय अठरा आहेत; पण देवांनी मात्र एकच (तत्त्वज्ञान) सांगितले त्याहून दुसरे सांगितले नाही॥ ५८॥ आणि मीहि ती व्यवस्था न सोडता ग्रंथाचे निरूपण केले आहे. आता त्या घोरणानेच केलेले निरूपण ऐका॥ ५९॥

**गूढार्थदीपिका—परी देव बोलिले एक। जें दुजें नाहीं**

सर्व भगवद्गीतेतून भगवंताला एकच अर्थ सांगावयाचा आहे असे श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात. संपूर्ण गीता ही मोत्यांच्या सराप्रमाणे आहे. मोती निरनिराळे दिसत असले तरी संपूर्ण सर जसा एकच त्याप्रमाणे प्रश्नांचे पैलू अनेक दिसत असले तरी त्यांच्या उत्तरांचे तात्पर्य एकच आहे.

भारतीय तत्त्वज्ञानांत मोक्षप्राप्तीचा विचार करणाऱ्या निरनिराळ्या विचारसरणी आहेत, ज्यांना दर्शनशास्त्रे म्हणतात. त्या दर्शनग्रंथात वरवर मतभिन्नता किंवा विरोध दिसत असला तरी त्यांनी अधिकाऱ्यानुसार आपआपल्या दर्शनाची रचना केली असून शेवटीं त्यांच्या प्रतिपादनांचे पर्यवसान साक्षात् किंवा परंपरेने अद्वैत परब्रह्माचे प्रतिपादन करण्यांत आहे. ''सर्वेषां प्रस्थानकर्तृणां मुनीनां विवर्तवादपर्यवसानेनाद्वितीये परमेश्वरे एव प्रतिपाद्ये तात्पर्यम्'' असेच मधुसूदन सरस्वतींनी शिवमहिम्नस्तोत्रांवरील टीकेत सांगितले आहे. अठरावा अध्याय हा एकाध्यायी गीताच असल्यामुळे भगवंताच्या मुखांतून निघालेले एकरूप तत्त्वज्ञान (म्हणजे सर्व दुःख निवृत्ति व परमानंद प्राप्तिरूप उपाय) या अध्यायांत सांगितले आहे, असा अर्थ.

**तरी सतरावा अध्यावो। पावतां पुरता ठावो। जें संपतां श्लोकीं देवो। बोलिले ऐसें॥ ६०॥**
**अर्जुना ब्रह्मनामाच्या विखीं। बुद्धि सांडूनि आस्तिकीं। कर्में कीजती तितुकीं। असंतें होतीं॥ ६१॥**
**हा ऐकोनि देवाचा बोलु। अर्जुना आला डोलु। म्हणे कर्मनिष्ठां मळु। ठेविला देखों॥ ६२॥**
**तो अज्ञानांधु तंव बापुडा। ईश्वरुचि न देखे एवढा। तेथ नाम एक पुढां। कां सुझे तया॥ ६३॥**
**आणि रजतमें दोन्ही। गेलियावीण श्रद्धा सानी। ते कां लागे अभिधानीं। ब्रह्माचिये॥ ६४॥**
**मग कोता खेंव देणें। वार्तेवरील धांवणें। सांडीं पडे खेळवणें। नागिणीचें तें॥ ६५॥**
**तैसी कर्में दुवाडें। तयां जन्मांतराची कडे। दुर्मेळावे येवढे। कर्मामाजीं॥ ६६॥**
**ना विपायें हें उजू होये। तरी ज्ञानाची योग्यता लाहे। एऱ्हवीं येणेंचि जाये। निरयालया॥ ६७॥**

**अर्थ**—सतरावा अध्याय संपत असता शेवटच्या श्लोकात भगवान् असे म्हणाले॥ ६०॥ हे अर्जुना! परब्रह्माच्या

ॐ तत् सत् या नामाच्या ठिकाणी श्रद्धा न ठेवतां जी कर्मे केली जातात ती व्यर्थ होतात॥ ६१ ॥ हे भगवंताचे बोलणे ऐकून अर्जुन डोलू लागला आणि म्हणाला की शेवटी भगवंताने कर्मनिष्ठेच्या ठिकाणी दोष ठेवलाच, हे दिसून आले॥ ६२ ॥ जेथें अज्ञानाने अंध झालेल्या बापड्या मनुष्याला सर्व व्यापक असलेला एवढा मोठा भगवानच कळत नाही, तेथे त्याला त्याच्यापुढे असलेले एक नाम कसे कळणार॥ ६३ ॥ रजोगुण तमोगुण नाहीसे झाल्यावाचून असलेली अल्पशी श्रद्धा परब्रह्माच्या ॐ, तत्, सत् या नामाच्या ठिकाणी काय टिकून राहणार आहे?॥ ६४ ॥ मग शस्त्राला आलिंगन देणे, दोरीवर धावणे किंवा नागिणीला खेळवणे ह्या गोष्टी जशा घातक आहेत त्याप्रमाणे ब्रह्मनामाशिवाय केलेली कर्मे सदोष आहेत. कारण ती नाना जन्म प्राप्त करून देणारी असतात. असे या कर्मामध्ये वाईट गोष्टी प्राप्ति करून देण्याचे सामर्थ्य असते॥ ६५-६६ ॥ किंवा जर कदाचित् हीच कर्मे शास्त्रानुसार झाली तर त्यांच्या योगाने अंत:करणशुद्धिद्वारा ज्ञानाची योग्यता प्राप्त होते. नाहीतर याच कर्मांनी नरक प्राप्ति होते॥ ६७ ॥

**कर्मीं हा ठायवरी। आहाती बहुवा अवसरी। आतां कर्मठां कैं ये वारी। मोक्षाची हे॥ ६८ ॥**
**तरी फिटो कर्माचा पांगु। कीजो अवघाचि त्यागु। आदरिजो अव्यंगु। संन्यासु तो॥ ६९ ॥**
**कर्मबाधेची कहीं। जेथ भयाची गोठी नाहीं। तें आत्मज्ञान जिहीं। स्वाधीन होय॥ ७० ॥**
**ज्ञानाचे आवाहनमंत्र। जें ज्ञानपिकतें सुक्षेत्र। ज्ञानआकर्षितें सूत्र-। तंतु जे का॥ ७१ ॥**
**ते दोनी संन्यास त्याग। अनुष्ठूनि सुटे जग। तरी हेंचि आतां चांग। व्यक्त पुसों॥ ७२ ॥**
**ऐसें म्हणोनि पार्थे। त्यागसंन्यास व्यवस्थे। रूप होआवया जेथें। प्रश्नु केला॥ ७३ ॥**
**तेथ प्रत्युत्तरें बोली। श्रीकृष्णें जे चावळिली। तया व्यक्ती जाली अष्टादशा॥ ७४ ॥**

**अर्थ**—कर्मामध्ये अशा प्रकारच्या पुष्कळ अडचणी आहेत, तेव्हा कर्मठाला मोक्षाची वारी केव्हा करता येणार?॥ ६८ ॥ कर्माची ताबेदारी नाहीशी व्हावी, संपूर्ण त्याग घडावा व व्यंगरहित संन्यासाचा आदर करावा॥ ६९ ॥ कधीही कर्माची बाधा होईल, अशी भयाची गोष्ट राहणार नाही, ते आत्मज्ञान ज्याच्या योगाने प्राप्त होते॥ ७० ॥ जे ज्ञानप्राप्तीचा मंत्रच होय. जे ज्ञानरूपी पीक देणारे उत्तम शेतच होय. किंवा ज्ञानाला आकर्षण करणारी दोरीच होय॥ ७१ ॥ ज्याचे आचरण केले असता जग मुक्त होते असे जे त्याग व संन्यास, त्यांचेच आता स्पष्ट स्वरूप चांगल्या रीतीने विचारू॥ ७२ ॥ असे अर्जुनाने मनात म्हणून त्याग व संन्यास या दोन्ही शब्दाची व्यवस्था समजून घेण्याकरितां येथे प्रश्न केला॥ ७३ ॥ तेव्हा त्याला उत्तर म्हणून श्रीकृष्णांनी जे बोलणे केले तोच अठरावा अध्याय झाला॥ ७४ ॥

**एवं जन्यजनकभावें। अध्यावो अध्यायातें प्रसवे। आतां ऐका बरवें। पुसिलें जें॥ ७५ ॥**
**तरी पांडुकुमरें तेणें। देवाचें सरतें बोलणें। जाणोनि अंत:करणें। काणी घेतली॥ ७६ ॥**
**एऱ्हवीं तत्त्वविषयीं भला। तो निश्चितु असे कीर जाहला। परी देवो राहे उगला। तें साहावेना॥ ७७ ॥**
**वत्स धालयाही वरी। धेनु न वचावी दुरी। अनन्य प्रीतीची परी। ऐसीच आहे॥ ७८ ॥**
**तेणें काजेंवीणही बोलावें। तें देखिलें तरी पाहावें। भोगितां चाड दुणावे। पढियंतयाठायीं॥ ७९ ॥**
**ऐसी प्रेमाची हे जाती। आणि पार्थ तंव तेचि मूर्ती। म्हणूनि करूं लाहे खंती। उगेपणाची॥ ८० ॥**

**अर्थ**—याप्रमाणे उत्पन्न होणारा व उत्पन्न करणारा या नात्याने मागच्या अध्यायाचे सूत्र पुढील अध्याय उत्पन्न करतो. आतां अर्जुनाने जे विचारले ते चांगले ऐका॥ ७५ ॥ तेव्हा पांडूचा मुलगा अर्जुन देवाचे बोलणे संपत आलेले पाहून मनात खिन्न झाला॥ ७६ ॥ येऱ्हवी पाहता, अद्वैतब्रह्म तत्त्वाविषयी तो पूर्ण नि:संशय झाला होता. परंतु आता देव पुढे बोलणार नाहीत, उगे राहतील, हे त्याला सहन होत नव्हते॥ ७७ ॥ दूध पिऊन वासरू पूर्ण तृप्त झाले तरी आपली माय आपल्यापासून दूर होऊ नये. असे त्याला वाटत असते. अनन्य प्रेमाचे लक्षण हेच आहे॥ ७८ ॥ प्रेमाच्या माणसाने काही कारण नसताही बोलावे, त्याला पाहिले तरी पुन: पुन: पाहावे. ज्याप्रमाणे प्रेमवस्तूचा भोग घेउनही तिचा पुन: पुन: भोग घ्यावा अशीच इच्छा त्या वस्तूचे प्रेम असणाऱ्या माणसाचे ठिकाणी वाटत असते॥ ७९ ॥ असा

प्रेमाचा स्वभावच आहे. आणि अर्जुन तर प्रेमाची मूर्तिच होता. म्हणूनच भगवंत उगे राहतील या भगवंताच्या उगेपणाची त्याला खंती वाटत होती॥ ८०॥

**आणि संवादाचेनि मिषें। जें अव्यवहारी वस्तु असे। तेचि भोगिजे कीं जैसें। आरिसां रूप॥ ८१॥**
**मग संवादु तोही पारुखे। तरी भोगितां भोगणें थोके। हें कां साहावेल सुखें। लंचावलेया॥ ८२॥**
**यालागीं त्याग संन्यास। पुसावयाचें घेऊनि मिस। मग उपलविले दुस। गीतेचें तें॥ ८३॥**
**अठरावा अध्याय नोहे। हे एकाध्यायी गीताचि आहे। जैं वत्सचि धेनू दुहे। तैं वेळु कायसा॥ ८४॥**
**तैसी संपतां अवसरीं। गीता आदरविली माघारीं। स्वामी भृत्याचा न करी। संवादु काई॥ ८५॥**
**परी हें असो ऐसें। अर्जुनें पुसिजत असे। म्हणे विनंती विश्वेशें। अवधारिजो॥ ८६॥**

**अर्थ**—येऱ्हवी न पाहता येण्याजोगे आपले मुख जसे आरशाच्या साहाय्याने पाहता येते, त्याप्रमाणे कोणत्याही व्यवहाराचा विषय न होणारे आपले परब्रह्मस्वरूप संवादांच्या मिषाने अनुभविता येते॥ ८१॥ मग संवादही, बंद पडून वस्तूचे स्वरूप भोगत असता भोगणेही थांबेल, अशी स्थिती केवळ सुखरूप होऊन राहण्याला जो लांचावला त्याला संवाद सोडून भगवंताचे उगे राहणे कसे सहन होईल॥ ८२॥ म्हणूनच त्याग व संन्यास यांची लक्षणे काय हे विचारण्याचे निमित्त करून गीतेचे वस्त्र उकलविले॥ ८३॥ हा गीतेचा अठरावा अध्याय नसून एकाध्यायी गीताच आहे. जर गायीचे वासरू गायीचे दोहन करू लागले तर गायीला पान्हा सुटायला काय वेळ लागणार?॥ ८४॥ त्याप्रमाणे संवादरूप गीता संपत आली असली तरी तिचा पुन: सेवकाने मोठ्या आदराने संवाद सुरू केला असता स्वामी आपल्या सेवकाशी संवाद करणार नाही काय?॥ ८५॥ पण हे असो. अर्जुन असा विचार करीत, म्हणाला की हे भगवंता! विश्वेशा, माझी विनंती आहे. इकडे लक्ष द्या॥ ८६॥

*अर्जुन उवाच*

**सन्न्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम्। त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन॥ १॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो, हे पराक्रमी कृष्णा! हे हृषीकेशा! हे केशिराक्षसाचा वध करणाऱ्या भगवंता! संन्यासाचे तत्त्व काय व त्यागाचे तत्त्व काय अलग अलग मी जाणू इच्छितो॥ १॥

**हां जी संन्यासु आणि त्यागु। इयां दोहीं एक अर्थी लागु। जैसा संघातु आणि संघु। संघातेंचि बोलिजे॥ ८७॥**
**तैसेंचि त्यागें आणि संन्यासें। त्यागुचि बोलिजत असे। आमचेनि तंव मानसें। जाणिजे हेंचि॥ ८८॥**
**ना कांही आथी अर्थभेदु। तो देव करोतु विशदु। तेथ म्हणती श्रीमुकुंदु। भिन्नचि पै॥ ८९॥**
**तरी अर्जुना तुझ्या मनीं। त्याग संन्यास दोनी। एकार्थ गमले हें मानीं। मी ही साच॥ ९०॥**
**इहीं दोहीं कीर शब्दीं। त्यागुचि बोलिजे त्रिशुद्धी। परी कारण एथ भेदीं। येतुलेंचि॥ ९१॥**

**अर्थ**—हे भगवंता! संन्यास आणि त्याग हे दोन्ही शब्द एकाच अर्थी वाटतात. ज्याप्रमाणे संघात आणि संघ या दोन्ही शब्दांचा 'संघात' असा एकच अर्थ होतो, त्याप्रमाणे त्याग आणि संन्यास यांचाही त्याग हाच अर्थ आहे. असेच आमच्या मनाला वाटते॥ ८७-८८॥ किंवा दोन्ही शब्दांच्या अर्थात काही फरक असल्यास तो देवच स्पष्ट करतील. तेव्हा, भगवान श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना! या दोन्ही शब्दांचा अर्थ भिन्नच आहे॥ ८९॥ तरी अर्जुना! त्याग आणि संन्यास हे दोन्ही शब्द एकार्थीच तूं समजलास हे तुझे म्हणणे खरे आहे, असे मीही मानतो॥ ९०॥ या दोन्ही शब्दांनी निश्चयाने खरोखर त्यागच बोलला जातो, हे त्रिवार सत्य आहे. पण दोघांच्या अर्थात भेद आहे, त्याचे एवढेच कारण आहे॥ ९१॥

**जें निपटूनि कर्म सांडिजे। तें सांडणें संन्यासु म्हणिजे। आणि फलमात्र कां त्यजिजे। तो त्यागु गा॥ ९२॥**
**तरी कोणा कर्माचें फळ। सांडिजे कोण कर्म केवळ। हेंही सांगों विवळ। चित्त दे॥ ९३॥**
**तरी आपैसीं दांगीं डोंगर। झाडें लागती अपार। तैसें लांबे राजागर। नुठिती ते॥ ९४॥**
**न पेरितां सैंघ तृणें। उठती तैसें साळीचें होणें। नाहीं गा राबाउणें। जियापरी॥ ९५॥**

**कां अंग जाहलें सहजें। परी लेणें उद्यमें कीजे। नदी आपैसी आपादिजे। विहिरी जेवीं॥ ९६ ॥**
**तैसें नित्य नैमित्तिक। कर्म होय स्वाभाविक। परी न कामितां कामिक। न निफजे॥ ९७॥**

**अर्थ**—कर्माचा विधिपूर्वक त्याग करून पुन: ते कधीच न करणे या कर्मत्यागाला संन्यास म्हणतात. कर्माने प्राप्त होणाऱ्या फळाची मुळीच इच्छा न करता केवळ कर्म करणे याला त्याग म्हणतात॥ ९२ ॥ अर्जुना! तरी कोणत्या कर्माच्या फळाचा त्याग करावयाचा व कोणते कर्म सोडून द्यावयाचे हे स्पष्ट करून सांगतो, ऐक॥ ९३ ॥ ज्याप्रमाणे डोंगरावर व अरण्यात आपोआप पुष्कळशी झाडे झुडपे उत्पन्न होतात; पण बागा व भाताची शेते तशी आपोआप उगवत नाहीत॥ ९४॥ पेरल्यावाचून गवत जसे सर्वत्र उगवते तशी भाताची शेते, मेहनत केल्याशिवाय उगवत नाहीत॥ ९५ ॥ किंवा शरीर सहज प्राप्त होते, पण अलंकार प्रयत्नाने घडवावे लागतात. नदी आपोआप अस्तित्वात येते पण विहीर प्रयत्न केल्यावांचून तयार होत नाही॥ ९६ ॥ त्याप्रमाणें विहित अशी नित्यनैमित्तिक कर्मे प्रकृति स्वभावानुसार प्राप्त आहेत. पण काम्यकर्मे, त्यांच्यापासून प्राप्त होणाऱ्या फळाची इच्छा केल्याशिवाय, घडून येत नाहीत॥ ९७ ॥

*श्रीभगवानुवाच*

**काम्यानां कर्मणां न्यासं सन्न्यासं कवयो विदुः। सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः॥ २॥**

**अर्थ**—शाहाणे लोक काम्य कर्माचा त्याग करणे याला संन्यास म्हणतात व सर्व कर्मांच्या फळांचा त्याग करणे याला त्याग म्हणतात॥ २ ॥

**का कामनेचेनि दळवाडें। जें उभरावया घडे। अश्वमेधादिक फुडे। याग जेथ॥ ९८॥**
**वापी कूप आराम। अग्रहारें हन महाग्राम। आणीकही नानासंभ्रम। व्रतांचे ते॥ ९९॥**
**ऐसें इष्टापूर्त सकळ। जया कामना एक मूळ। जें केलें भोगवी फळ। बांधोनियां॥ १००॥**
**देहाचिया गांवा आलिया। जन्ममृत्यूचिया सोहळया। ना म्हणों नये धनंजया। जियापरी॥ १०१॥**
**का ललाटींचें लिहिलें। न मोडे गा कांही केलें। काळेगोरेपण धुतलें। फिटों नेणे॥ १०२॥**
**केलें काम्य कर्म तैसें। फळ भोगावया धरणें बैसे। न फेडितां ऋण जैसें। वोसंडीना॥ १०३॥**
**का कामनाही न करितां। अवसांत घडे पांडुसुता। तरी वायकांडें न झुंझतां। लागे जैसें॥ १०४॥**
**गूळ नेणतां तोंडीं। घातला देचि गोडी। आगी मानूनि राखोंडी। चेपिला पोळी॥ १०५॥**
**कामकर्मीं हें एक। सामर्थ्य आथी स्वाभाविक। म्हणोनि नको कौतुक। मुमुक्षू एथ॥ १०६॥**

**अर्थ**—जे अश्वमेधादिक यागासारखे कर्म केवळ कामाचा विस्तार करण्याकरितांच केले जाते॥ ९८॥ लोकाकरिता रस्त्यावर पायऱ्याची विहीर करणे, विहीर खोदणे, बगीचा लावणे, मोठमोठी गावे इनाम देणे, आणखी नाना प्रकारच्या व्रतांची खटपट करणे॥ ९९ ॥ सर्व कामनेला जी मूळ आहेत अशी केवळ इष्ट व पूर्त कर्मे केली असता कर्ता फळाने बांधला जाऊन ते फळ त्याला भोगावे लागते॥ १०० ॥ अर्जुना! ज्याप्रमाणे देह प्राप्त झाला असता, मी जन्ममृत्यूचा अंगीकार करीत नाही, असे म्हणता येत नाही॥ १०१ ॥ किंवा कपाळाची अक्षरे काही केले तरी पुसली जात नाहीत. अथवा शरीराचे काळेगोरेपण धुतल्यानेही बदलत नाही॥ १०२॥ कर्जाऊ आणलेले पैसे परत दिल्याशिवाय जसा पाठी लागलेला तगादा सुटत नाही, त्याप्रमाणे केलेले काम्यकर्म कर्त्याला कर्माचे फळ भोगविण्याकरिता त्याचे ठिकाणी धरणे धरून बसते॥ १०३ ॥ युद्धाला सज्ज न होता (लटुपटूचे) युद्ध करणाऱ्याला जसे बोथट तरी बाण सहन करावे लागतात, त्याप्रमाणें कामना न करता अकस्मात् कामनिक कर्म घडले तरी त्या कर्माचे फल भोगावे लागते॥ १०४॥ हा गूळ आहे, हे न जाणता तोंडात घातला तरी तो आपली गोडी देतोच. आगीच्या निखाऱ्यावर राखोंडी समजून, पाय दिला तर पाय पोळतोच॥ १०५ ॥ काम्य कर्माचे ठिकाणी असे हे एक स्वाभाविक सामर्थ्य आहे, म्हणून मुमुक्षूने कौतुकाने उगेच देखील काम्यकर्म करू नये॥ १०६ ॥

**किंबहुना पार्था ऐसें। जें काम्यकर्म गा असे। तें त्यजिजे विष जैसें। वोकूनियां॥ १०७॥**

**मग तया त्यागातें जगीं। संन्यासु ऐसिया भंगीं। बोलिजे अंतरंगीं। सर्वद्रष्टा॥ १०८॥**
**हें काम्यकर्म सांडणें। तें कामनेतेंचि उपडणें। द्रव्यत्यागें दवडणें। भय जैसें॥ १०९॥**

**अर्थ**—फार काय सांगू अर्जुना! असे जे हे काम्यकर्म आहे, ते विषाप्रमाणे ओकून टाकून द्यावे॥ १०७॥ मग अशा काम्यकर्माच्या त्यागाला लोकांमध्ये संन्यास हे नाव देतात असे सर्वदृष्टे भगवान म्हणतात.॥ १०८॥ द्रव्याचा त्याग केला की त्याचे भय नाहीसे होते, त्याप्रमाणे काम्यकर्माचा त्याग करणे म्हणजे अंत:करणातून कामनाच नाहीशी करणे होय.॥ १०९॥

**आणि सोमसूर्यग्रहणें। येऊनि करविती पार्वणें। कां मातापितरमरणें। अंकित जे दिवस॥ ११०॥**
**अथवा अतिथी हन पावे। हे ऐसैसें पडे जें करावें। तें तें कर्म जाणावें। नैमित्तिक गा॥ १११॥**
**वार्षिया क्षोभे गगन। वसंतें दुणावे वन। देहा शृंगारी यौवन-। दशा जैसी॥ ११२॥**
**का सोमकांतु सोमें पघळे। सूर्ये फांकती कमळें। एथ असे तेंचि पाल्हाळे। आन नये॥ ११३॥**
**तैसें नित्य जें का कर्म। तेंचि निमित्ताचे लाहे नियम। एथ उंचावे तेणें नाम। नैमित्तिक होय॥ ११४॥**

**अर्थ**—आणि मातापितरांच्या उद्देशाने पार्वणे करावयास लावणारी जी चंद्रसूर्यादि ग्रहणे किंवा माता पिता मरण पावले असता त्या दिवशी किंवा प्रत्येक वर्ष, मास, तिथि या दिवशी जे श्राद्ध करावयाचे असते अथवा अनायासे अतिथि आला असता त्याचा सत्कार करावयाचा असतो इत्यादि जी कर्मे ती नैमित्तिक कर्मे होत, असे समज॥ ११०-१११॥ ज्याप्रमाणे वर्षाऋतूत ढगांच्या येण्याजाण्याने व त्यांच्या आवाजाने आकाश क्षुब्ध होते. वसंतऋतूत झाडांना नवी कोवळी पाने फुटून अरण्याची शोभा अधिक वाढते. यौवनदशा देहाला शोभा आणते॥ ११२॥ किंवा चंद्राच्या योगाने सोमकांतमणी पाझरतो अथवा सूर्य प्रकाशाने सूर्यकमले विकसित होतात. या सर्व ठिकाणी असलेले गुणच प्रगट होतात. दुसरे बाहेरून काही येत नाही॥ ११३॥ त्याप्रमाणे जे कर्म नित्य करायचे असते, तेच पण निमित्ताने केले जाते. त्यायोगाने त्याला नैमीत्तिक असे मोठे नाव प्राप्त होते॥ ११४॥

**आणि सायंप्रातर्मध्यान्हीं। जें कां करणीय प्रतिदिनीं। परी दृष्टि जैसी लोचनीं। अधिक नोहे॥ ११५॥**
**कां नापादितां गती। चरणीं जैसी आथी। नातरी ते दीप्ती। दीपबिंबीं॥ ११६॥**
**वास नेदितां जैसें। चंदनीं सौरभ्य असे। अधिकाराचें तैसें। रूपचि जें॥ ११७॥**
**नित्य कर्म ऐसें जनीं। पार्था बोलिजे तें मानीं। एवं नित्य नैमित्तिक दोन्हीं। दाविलीं तुज॥ ११८॥**

**अर्थ**—आणि जे कर्म दररोज सकाळ-दुपार-संध्याकाळ करायचे असते, परंतु ज्याप्रमाणे डोळ्याचे ठिकाणी दृष्टि कमी अधिक होत नाही. सारखीच राहते॥ ११५॥ किंवा पायात असलेली गति जशी संपादन केलेली नसून ती मूळचीच त्याचे ठिकाणी असते. किंवा बिंबरूप दीपाचे ठिकाणी जसे तेज स्वाभाविक असते॥ ११६॥ सुवास, न लावता तो चंदनाचे ठिकाणी मूळचाच असतो, त्याप्रमाणे जे कर्म ब्राह्मणादिकांच्या अधिकाराचे स्वरूपच होय॥ ११७॥ अर्जुना त्या कर्माला लोकात नित्यकर्म म्हणतात, असे जाण. याप्रमाणे नित्यनैमित्तक अशा दोन्ही कर्मांची तुला ओळख करून दिली॥ ११८॥

**हेंचि नित्यनैमित्तिक। अनुष्ठेय आवश्यक। म्हणोनि म्हणों पाहती एक। वांझ ययातें॥ ११९॥**
**परी भोजनीं जैसें होये। तृप्ति लाभे भूक जाये। तैसें नित्य नैमित्तिकीं आहे। सर्वांगीं फळ॥ १२०॥**
**कीड आगिठां पडे। तरी मळु तुटे वानी चढे। यया कर्मा तया सांगडें। फळ जाणावें॥ १२१॥**
**जे प्रत्यवाय तंव गळे। स्वाधिकार बहुवें उजळे। तेथ हातोफळिया मिळे। सद्गतीसी॥ १२२॥**
**येवढेवरी ढिसाळ। नित्यनैमित्तिकीं आहे फळ। परी तें त्यजिजे मूळ। नक्षत्रीं जैसें॥ १२३॥**
**लता पिके आघवी। तंव च्यूत बांधे पालवी। मग हात न लावित माधवीं। सोडूनि घाली॥ १२४॥**
**तैसी नोलांडितां कर्म रेखा। चित्त दीजे नित्यनैमित्तिका। पाठीं फळा कीजे अशेखा। वांतिचिये वानी॥ १२५॥**
**यया कर्मफळत्यागातें। त्यागु म्हणती पैं जाणते। एवं त्याग संन्यास तूतें। परिसविले॥ १२६॥**

**अर्थ**—या नित्यनैमित्तिक कर्माचे अवश्य अनुष्ठान केले पाहिजे असे शास्त्र म्हणते; म्हणून कित्येक लोक नित्य-नैमित्तिक कर्मांना वांझ म्हणजे त्याचे काही फळच होत नाही असे समजतात॥ ११९ ॥ पण भोजन करणे या कर्माचे ठिकाणी भूक नाहीशी करून सुख देण्याचे जसे सामर्थ्य आहे, असेच नित्यनैमित्तिक कर्माचे ठिकाणीं सर्वांगाने फळ देण्याचे सामर्थ्य आहे॥ १२० ॥ हीणकट सोने अग्नीमध्ये पडले असता त्यात मिश्रित असलेला इतर धातूचा मळ निघून जातो व सोन्याचा शुद्ध कस वाढतो. त्या प्रमाणे नित्यनैमित्तिक कर्माचे फळ आहे, असे जाणावे॥ १२१ ॥ कारण नित्य-नैमित्तिक कर्म केल्याने जो प्रत्यवाय (म्हणजे निषिद्ध कर्म घडून होणारे पाप) होतो ते पाप नित्यनैमित्तिक कर्म केल्याने नाहीसे होते आणि ब्राह्मणादि अधिकार वाढत जातो. असे झाले असता मृत्युनंतर तात्काळ सद्गति प्राप्त होते॥ १२२ ॥ एवढे या नित्यनैमित्तिक कर्माचे ढोबळ फळ आहे. परंतु ज्याप्रमाणे नक्षत्रात मूळ नक्षत्राचा सर्वथा त्याग करतात त्याप्रमाणे नित्यनैमित्मिक कर्माच्या फळाचा त्याग करून ते कर्म केले पाहिजे॥ १२३ ॥ वसंतऋतु आला असता सर्व बेली पानांनी भरून जातात. त्यावेळी आंब्याच्या झाडाला नवी कोवळी पाने व फळे येतात. इतके होऊनही मग वनश्री त्या पानांचा व फळांचा भोग न घेता त्यांना सोडून जाते॥ १२४॥ कर्माची मर्यादा यत्किंचितही उल्लंघिली जाणार नाही असे सावध असून नित्यनैमित्तिक कर्माकडे चित्त द्यावे व त्या कर्माच्या फळाविषयीं मात्र ओकारीप्रमाणे किळसवाणे मन असावे॥ १२५ ॥ अशा या कर्मफळाच्या त्यागाला, जाणते लोक त्याग म्हणतात. याप्रमाणे त्याग व संन्यास यांची लक्षणे तुला ऐकविली॥ १२६ ॥

**हा संन्यासु जैं संभवे। तैं काम्य बाधूं न पावे। निषिद्ध तंव स्वभावें। निषेधें गेलें॥ १२७॥**
**आणि नित्यादिक जें असे। तें येणें फळत्यागें नासे। शिर लोटलिया जैसें। येर आंग॥ १२८॥**
**मग सस्य फळपाकांत। तैसें निमालिया कर्मजात। आत्मज्ञान गिंवसित। आपैसें ये॥ १२९॥**
**ऐसिया निगुती दोनी। त्याग संन्यास अनुष्ठानीं। पडले गा आत्मज्ञानीं। बांधती पाट॥ १३०॥**
**नातरी हे निगुती चुके। मग त्यागु कीजे हाततुकें। तैं कांहीं न त्यजे अधिकें। गोवींचि पडे॥ १३१॥**
**जें औषध व्याधी अनोळख। तें घेतलिया परतें विख। का अन्न न मानितां भूक। न मारी काय॥ १३२॥**
**म्हणोनि त्याज्य जें नोहे। तेथ त्यागातें न सुवावें। त्याज्यालागीं नोहावें। लोभपर॥ १३३॥**
**चुकलिया त्यागाचें वोझें। केला सर्वत्यागही होय वोझें। निषिद्धें त्या सर्वत्र जुंझे। वीतराग ते॥ १३४॥**

**अर्थ**—असा हा संन्यास साधला असता (म्हणजे संन्यासाचे आचरण केले असता काम्यकर्म बाधक होत नाही व शास्त्राने करू नये म्हणून सांगितलेल्या निषिद्ध कर्माचा तर निषिद्ध म्हणून त्यागच केला जातो॥ १२७॥ आणि ज्याप्रमाणे शीर कापून पडल्याबरोबर सर्व शरीरच लोटले जाते त्याप्रमाणे नित्यादिक कर्मे, त्यांच्या फळांचा त्याग केला असता आपोआप निरर्थक होतात॥ १२८ ॥ ज्याप्रमाणे धान्याला बीजरूप फळ प्राप्त झाल्यानंतर ते (गवत) नाश पावते त्याप्रमाणे सर्व कर्मे नाहीशी झाल्यानंतर (म्हणजे काम्यकर्म सोडून देऊन नित्यनैमित्तिक कर्माच्या फळांचा त्याग केल्यानंतर) आत्मज्ञान आपोआप त्या पुरुषाचा शोध करीत येते॥ १२९ ॥ या रीतीने त्याग व संन्यास या दोघांचे व्यवस्थित अनुष्ठान केले असता ते आत्मज्ञानापर्यंत चित्ताच्या प्रवाहाचा पाट बांधतात॥ १३० ॥ किंवा असे या त्याग व संन्यास यांचे अनुष्ठान सावधान चित्ताने लक्षपूर्वक न घडल्यास मग जो अंदाजाने त्याग केला जातो तसे करण्यात कशाचाच त्याग होत नाहीं, उलट मनुष्य त्यात अधिक गोवला जातो॥ १३१ ॥ घेतले जाणारे औषध, त्या रोगावर उपयुक्त आहे किंवा नाही हे माहित नसता, घेतले तर जसे ते विषच होते किंवा भूक आहे किंवा नाही याचा विचार न करता अन्न सेवन केले असता ते मारणार नाही काय?॥ १३२॥ म्हणून ज्याचा त्याग करण्याची आवश्यकता नाही त्याचा त्याग करू नये आणि ज्याचा त्याग करायला पाहिजे त्याच्या अनुष्ठानाचा लोभ धरू नये॥ १३३ ॥ कर्माचे अनुष्ठान करताना त्यागाचे वर्म चुकले असता सर्व अनुष्ठित त्यागच ओझ्यासारखा व्यर्थ दु:खदायक होतो. तशा निषिद्ध कर्माशी विरक्त पुरुष सर्वत्र झुंज देतात म्हणजे विरक्त पुरुष तसे आचरण कधीच करीत नाहीत॥ १३४॥

**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिण:। यज्ञदानतप:कर्म न त्याज्यमिति चापरे॥ ३॥**

**अर्थ**—काही विचारी लोक कर्म दोषयुक्त असल्यामुळे त्याच्या त्याग करावा असे म्हणतात, तर काही विचारी लोक यज्ञ, दान, तप या कर्मांचा त्याग करू नये असे म्हणतात. ॥ ३ ॥

**एकां फलत्याग न ठाके। ते कर्मांतें म्हणती बंधकें। जैसें आपण नग्न भांडकें। जगातें म्हणे॥ १३५ ॥**
**का जिव्हालंपट रोगिया। अन्नें दूषी धनंजया। आगां न रुसे कोढिया। मासियां कोपे॥ १३६ ॥**
**तैसें फळकाम दुर्बळ। म्हणती कर्मचि किडाळ। मग निर्णयो देती केवळ। त्यजावें ऐसा॥ १३७॥**

**अर्थ**—ज्या प्रमाणे आपणच नंगे भांडखोर असताना दुसऱ्यास भांडखोर म्हणतात त्या प्रमाणे कित्येकांना कर्माच्या फलाचा त्याग करणे साधत नाहीं म्हणून ते, कर्मच करू नये, त्याचा त्यागच करावा असे प्रतिपादन करतात॥ १३५ ॥ किंवा अर्जुना! वाटेल ते खावेसे वाटणारा रोगी जसे ते खाता येत नाही म्हणून अन्नाची निंदा करतो किंवा ज्याप्रमाणे कुष्ठरोगी कुष्ठ झालेल्या शरीरावर न रागावता तेथे बसणाऱ्या माश्यांवर रागावतो॥ १३६ ॥ त्याप्रमाणे कर्माच्या फलाची इच्छा ज्याच्यांने सोडवत नाही ते कर्मच वाईट आहे असे म्हणतात व मग कर्माचा त्यागच करावा असा निर्णय देतात॥ १३७ ॥

**एक म्हणती यागादिक। करावेचि आवश्यक। जे यावांचूनि शोधक। आन नसे॥ १३८ ॥**
**मनशुद्धीच्या मार्गीं। जैं विजयी व्हावें वेगीं। तैं कर्म सबळालागीं। आळसु न कीजे॥ १३९ ॥**
**भांगार आथी शोधावें। तरी आगी जेवीं नुबगावें। कां आरिसयालागीं सांचावें। अधिक रज॥ १४० ॥**
**ना ना वस्त्रैं चोखें होआवीं। ऐसें आथी जरी जीवीं। तरी संवदणी न मानावी। मलिन जैसी॥ १४१ ॥**
**तैसीं कर्में क्लेशकारें। म्हणोनि न न्यावीं अव्हेरें। कां अन्न लाभे अरुवारें। रांधितिये उणें॥ १४२ ॥**
**इहीं इहीं गा शब्दी। एक कर्मीं बांधती बुद्धी। ऐसा त्यागु विसंवादीं। पडोनि ठेला॥ १४३ ॥**
**तरी विसंवादु तो फिटे। त्यागाचा निश्चयो भेटे। तैसें बोलों गोमटें। अवधान देईं॥ १४४॥**

**अर्थ**—कोणी म्हणतात, यागादिकांवाचून अंत:करणाची शुद्धि करणारे दुसरे काहीच नाही, म्हणून ते अवश्य केलेच पाहिजेत॥ १३८ ॥ जर लवकर चित्ताची पूर्ण शुद्धि करून विजयी व्हावयाचे असेल तर चित्तशुद्धि करण्याच्या कामी समर्थ असलेली यागादिक कर्मे करण्यास आळस करू नये॥ १३९ ॥ सोने शुद्ध करावयाचे असेल तर त्याला अग्नीत घालण्याची उपेक्षा करता कामा नये किंवा आरसा स्वच्छ करावयाचा असल्यास त्याकरिता स्वच्छ करणाऱ्या पदार्थाचे पुष्कळसे रजोकण संग्रही ठेवावयास पाहिजे॥ १४० ॥ किंवा वापरण्याची वस्त्रे स्वच्छ असावी असे मनात वाटत असेल तर परीटाच्या कपडे धुण्याच्या भांड्यास घाणेरडे म्हणण्यात हाशील नाही॥ १४१ ॥ त्याप्रमाणे कर्माचे अनुष्ठान क्लेशदायक असते म्हणून त्यांचा अव्हेर करू नये. अन्न जर चांगले शिजविले गेले नाही तर नरम, मृदू अशा अन्नाचा लाभ कसा होणार?॥ १४२ ॥ अशा अशा शब्दांनी कोणी कर्माचे ठिकाणी बुद्धीला बांधून ठेवतात म्हणजे कर्म केले पाहिजे असा निश्चय बुद्धीत धरून ठेवतात. अशा रीतीने त्यागाविषयी विवाद उत्पन्न झाला आहे॥ १४३ ॥ म्हणून, अर्जुना! त्यागाविषयी विवाद राहणार नाही व त्यागाचे निश्चित स्वरूप हाती लागेल असे सुंदर निरूपण करतो. लक्ष दे॥ १४४॥

**निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम। त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः सम्प्रकीर्तितः॥ ४॥**

**अर्थ**—हे भरत कुलातील श्रेष्ठ पुरुषा अर्जुना! त्या त्यागाविषयी मी आपला निश्चय सांगतो, ऐक. हे शूर पुरुषा! त्यागही तीन प्रकारचा सांगितला आहे॥ ४॥

**तरी त्याग एथें पांडवा। त्रिविध पैं जाणावा। तया त्रिविधाही बरवा। विभाग सांगों॥ १४५ ॥**
**त्यागाचे तिन्हीं प्रकार। कीजती जरी गोचर। तरी तूं इत्यर्थाचें सार। इतुलें जाण॥ १४६ ॥**
**मज सर्वज्ञाचिये बुद्धी। जें आलोट माने त्रिशुद्धी। निश्चयतत्त्व तें आधीं। अवधारीं पां॥ १४७॥**
**तरी आपुलीये सोडवणे। जो मुमुक्षु जागों म्हणे। तया सर्वस्वें करणें। हेंचि एक॥ १४८ ॥**

**अर्थ**—तरी अर्जुना! येथे त्यागही तीन प्रकारचा सांगितला आहे, असे जाण. त्या तिन्हीही प्रकारच्या त्यागाचा

चांगला विभाग करून सांगतो॥ १४५॥ त्यागांचे तीनही प्रकार जरी समजले तरी त्या विवरणाचा सारभूत अर्थ इतकाच आहे की॥ १४६॥ माझ्या सारख्या सर्वज्ञाच्या बुद्धीस जे केलेच पाहिजे-म्हणजे जे सोडता येत नाही-असे जे वाटते ते अगोदर ऐक॥ १४७॥ ज्या मुमुक्षुला आपण या संसारबंधनापासून सोडवून घेण्यास नेहमी जागरूक व्हावे असे वाटत असेल त्याने सर्वतोपरी हीच एक गोष्ट केली पाहिजे॥ १४८॥

**यज्ञदानतपः कर्म न त्याज्यं कार्यमेव तत्। यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम्॥ ५॥**

**अर्थ**—यज्ञ, दान, तप ही कर्मे टाकून देऊ नयेत. ती केलीच पाहिजेत. कारण यज्ञदानतपादि कर्मे करीत असताना कर्मांनी प्राप्त होणाऱ्या फलांची यत्किंचितही इच्छा न करणाऱ्या विचारी माणसांच्या चित्ताची, ती कर्मे, शुद्धि करतात॥ ५॥

**जियें यज्ञदानतपादिकें। इयें कर्मे आवश्यकें। तियें न सांडावीं पांथिकें। पाउलें जैसीं॥ १४९॥**
**हरपले न देखिजे। तंव तयाचा मागु न सांडिजे। कां तृप्त न होता न लोटिजे। भाणें जेवीं॥ १५०॥**
**नाव थडी न पवतां। न सांडिजे केळी न फळतां। कां ठेविलें न दिसतां। दीप जैसा॥ १५१॥**
**तैसी आत्मज्ञानविखीं। जंव निश्चिती नाहीं निकी। तंव नोहावें यागादिकीं। उदासीन॥ १५२॥**

**अर्थ**—प्रवाशाला मुक्काम गाठेपर्यंत जसे चालणें सोडतां येत नाही, त्याप्रमाणे मुमुक्षुनेही यज्ञदानतपादि कर्मे सोडू नयेत. ती कर्मे करणे आवश्यक आहे॥ १४९॥ ज्याप्रमाणे हारवलेली वस्तू, सांपडत नाही, तोपर्यंत तिचा शोध करणे सोडता येत नाही. किंवा तृप्ती होत नाही तोपर्यंत समोरील अन्नाचे ताट दूर करता येत नाही॥ १५०॥ नदीच्या तीराला नाव लागत नाही तोपर्यंत तिचा आश्रय सोडता येत नाही. किंवा केळीच्या झाडाला फळाचा घड येत नाही तोपर्यंत त्याला काढून टाकता येत नाही. किंवा ठेवलेली वस्तू दिसत नाही तोपर्यंत दिवा सोडता येत नाही॥ १५१॥ त्याप्रमाणे आत्मज्ञानाविषयी जोपर्यंत दृढ निश्चय झाला नाही तोपर्यंत यागादिक कर्मे करण्याविषयी उदासीन राहू नये॥ १५२॥

**तरी स्वाधिकारानुरूपें। तियें यज्ञदानें तपें। अनुष्ठावींचि साक्षेपें। अधिकेंवर॥ १५३॥**
**जें चालणें वेगावत जाये। तो वेगु बैसावयाचि होये। तैसा कर्मातिशयो आहे। नैष्कर्म्यालागीं॥ १५४॥**
**अधिकें जंव जंव औषधी। सेवायाचि मांडी बांधी। तंव तंव मुकिजे व्याधी। तयाचिये॥ १५५॥**
**तैसीं कर्मे हातोपातीं। जैं कीजती यथानिगुती। तैं रजतमें झडती। झाडा देऊनी॥ १५६॥**
**का पाठोवाटीं पुटें। भांगारा खार देणें घटे। तैं कीड झडकरी तुटे। निर्व्याज होय॥ १५७॥**
**तैसें निष्ठा केलें कर्म। तें झाडी करूनि रजतम। सत्त्वशुद्धीचें धाम। डोळां दावी॥ १५८॥**
**म्हणोनियां धनंजया। सत्त्वशुद्धी गिंवसि तया। तीर्थांचिया सावाया। आलीं कर्मे॥ १५९॥**
**तीर्थे बाह्यमळ क्षाळे। कर्मे अभ्यंतर उजळे। एवं तीर्थे जाण निर्मळें। सत्कर्मेचि॥ १६०॥**

**अर्थ**—म्हणून आपल्या अधिकारानुसार जी यज्ञदानतपादिक कर्मे आपल्याला करण्यास योग्य असतील ती अधिक अगत्येने करावी॥ १५३॥ चालण्याचा वेग वाढविला असता जसा तो वेग ठिकाणाला प्राप्त करून देऊन (बसण्याकरितां म्हणजे) विश्रांती घेण्याकरिताच असतो, त्याप्रमाणे यज्ञदानतपे ही कर्मे करण्याची निकड वाढविणे, हे कर्मरहित (नैष्कर्म्य) होण्याकरिताच उपयोगी पडते॥ १५४॥ औषधि घेण्याचा निश्चय जितका दृढ होतो तितका तो व्याधीपासून मुक्त करतो॥ १५५॥ त्याप्रमाणे ही यज्ञदानतपादि कर्मे जेव्हा यथायोग्य वारंवार केली जातात तेव्हा रज तम हे दोन गुण झाडून नाहीसे होतात॥ १५६॥ किंवा सोन्याला एकामागून एक अशी पुटे दिली असता त्याचा हीणकटपणा नाहीसा होऊन ते सोने अत्यंत शुद्ध होते॥ १५७॥ त्याप्रमाणे निष्ठेने झालेले कर्म अंत:करणातून रजोगुण तमोगुण नाहीसे करून अंत:करणाला शुद्ध सात्विकगुणाचे घर स्पष्ट दाखविते॥ १५८॥ म्हणून, अर्जुना! अंत:करणाची शुद्धी त्याचा शोध करीत येते. अशा रीतीने यज्ञ-दान-तप ही कर्मे तीर्थक्षेत्राप्रमाणे चित्तशुद्धीला साह्यभूत आहेत॥ १५९॥ तीर्थे शरीराचे ठिकाणी असलेले बाह्य पापरूप मल नाहीसे करतात; पण कर्मे अंत:करणातील मल नाहीसे करून चित्त शुद्ध करतात. या प्रमाणे कर्मे हीच शुद्ध तीर्थे आहेत॥ १६०॥

**तृषार्ता मरुदेशीं। झळे अमृतें वोळली जैसी। कीं अंधालागीं डोळ्यांसीं। सूर्य आला॥ १६१॥**
**बुडतया नदीच धाविन्निली। पडतया पृथ्वीच कळवळिली। निमतया मृत्यूनें दिधली। आयुष्यवृद्धी॥ १६२॥**
**तैसें कर्मे कर्मबद्धता। मुमुक्षु सोडविले पांडुसुता। जैसा रसरीती मरतां। राखिला विषें॥ १६३॥**
**तैसीं एके हातवटिया। कर्मे कीजती धनंजया। बंधकेंचि सोडवावया। मुख्यें होती॥ १६४॥**
**आतां हेचि हातवटी। तुज सांगों गोमटी। जया कर्मांते किरीटी। कर्मचि रुसे॥ १६५॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे, पाणी मिळणे दुर्मिळ अशा मारवाड देशात तृषेने पीडित झालेल्याला उन्हाचे चटके लागत असता, अमृताने येऊन वर्षाव केला किंवा आंधळ्या डोळयाचे ठिकाणी प्रकाशरूप सूर्य आला॥ १६१॥ नदीत बुडणाऱ्या मनुष्याला वाचविण्याकरिता नदीच साहाय्य करण्याकरिता धावून आली. पडणाऱ्याचा पृथ्वीलाच कळवळा आला. मृत्यूनेच मरणाऱ्याचे आयुष्य वाढविले॥ १६२॥ त्याप्रमाणे अर्जुना! कर्मानेच मुमुक्षू कर्मबंधनापासून सोडविले जातात. ज्याप्रमाणे विषाला रसरूप करण्याच्या पद्धतीने बनविले तर ते मरणाऱ्यालाही वाचविते॥ १६३॥ त्याप्रमाणे धनंजया! एका विवक्षित रीतीने कर्म केले असता ते कर्म बंधन करणारे असले तरी बंधनापासून सोडविण्यास मुख्य साधन होते॥ १६४॥ आता ज्या हातवटीने कर्म केले असता कर्मच कर्मबंधापासून सोडविते ती उत्तम हातवटी, अर्जुना! तुला सांगतो॥ १६५॥

**एतान्यपि तु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च। कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम्॥ ६॥**

**अर्थ**—अर्जुना! ही कर्मे सुद्धा कर्तृत्वाभिमान व फळाची आशा सोडून देऊनच केली पाहिजेत असे माझे निश्चित उत्तम मत होय॥ ६॥

**तरी महायाग प्रमुखें। कर्मे निफजतांही अचुकें। कर्तेपणाचें न ठाके। फुंजणें आंगीं॥ १६६॥**
**जो मोलें तीर्था जाये। तया मी यात्रा करित आहें। ऐसीये श्लाघ्यतेचा नोहे। तोष जीवीं॥ १६७॥**
**का मुद्रा समर्थाचिया। जो एकवटु झोंबे राया। तो मी जिणता ऐसिया। नयेची गर्वा॥ १६८॥**
**जो कांसे लागोनि तरे। तया पोहती उर्मी नुरे। पुरोहितु नाविष्करे। दातेपणें॥ १६९॥**
**तैसें कर्तृत्व अहंकारें। नेघोनि यथा अवसरें। कृत्यजातांचे मोहरे। सारीजती॥ १७०॥**

**अर्थ**—ज्यात महायागादिक प्रमुख आहेत अशी यज्ञादी कर्मे यथासांग उपजवीत असताना यत्किंचित् देखील कर्तृत्वाभिमान जो मनात स्फुरू देत नाही॥ १६६॥ जो दुसऱ्याच्या पैशाने यात्रा करतो तो, मी यात्रा करीत आहे अशी बढाई मिरवित नाही व त्याचा त्याला मोठेपणा वाटत नाही, म्हणून त्याला आनंदही होत नाही॥ १६७॥ किंवा अर्जुना! समर्थ पुरुषाने आपल्या सहीशिक्यानिशी दिलेल्या पदाच्या मोठेपणाच्या भरवश्यावर जो सर्व सैन्य एकत्रित करून राजाशी झुंज देतो. पण तो जिंकला तरी, मी जिंकलो, असा जसा जिंकण्याचा अभिमान तो वागवित नाही॥ १६८॥ जो दुसऱ्याच्या आधाराने नदी तरून जातो त्याच्या अंत:करणात मी नदी तरून आलो. अशी कधी उर्मी राहत नाही. किंवा पुरोहित यजमानाला दानाचा मंत्र सांगतो म्हणून मी दान करणारा असा अभिमान धरीत नाहीं॥ १६९॥ त्याप्रमाणे कर्तृत्वाचा यत्किंचित्‌ही अभिमान न वागविता ज्यावेळी जे जे कर्म करायचे म्हणून समोर येईल ते ते कर्म करतो॥ १७०॥

**आणि केल्या कर्मीं पांडवा। जो आथी फळाचा यावा। तया मोहरा हों नेदावा। मनोरथ॥ १७१॥**
**आधींचि फळीं आस तुटिया। कर्मे आरंभावीं धनंजया। परावें बाळ धाया। पाहिजे जैसें॥ १७२॥**
**पिंपरुवांचिया आशा। न शिंपिजे पिंपळ जैसा। तैसिया फळनिराशा। कीजती कर्मे॥ १७३॥**
**सांडूनि दुधाची टकळी। गोंवारी गांवधेनु वेंटाळी। किंबहुना कर्मफळीं। तैसें कीजे॥ १७४॥**
**ऐसी हे हातवटी। घेऊनि जे क्रिया उठी। आपुलिया आपण गांठी। लाहेचि तो॥ १७५॥**
**म्हणोनि फळीं लागु। सांडोनी देहसंगु। कर्मे करावीं हा चांगु। निरोपु माझा॥ १७६॥**
**जो जीव बंधें शिणला। सुटके जाचे आपला। तेणें पुढतपुढतीं या बोला। आन न कीजे॥ १७७॥**

**अर्थ**—पण अर्जुना! या केलेल्या कर्माने जे फळ प्राप्त होते म्हणून शास्त्रांनी सांगितले असेल ते प्राप्त व्हावे अशी मनांत यत्किंचितही इच्छा असू नये॥ १७१॥ ज्या प्रमाणे दाई प्रेमभावाने परक्याच्या मुलाचा सांभाळ करते, त्याप्रमाणे अर्जुना! कर्म करण्यापूर्वीच त्या कर्मापासून प्राप्त होणाऱ्या फळाची आशा नि:शेष सोडून कर्माला आरंभ करावा॥ १७२॥ ज्याप्रमाणे पिंपळाच्या फळाच्या आशेने पिंपळाला कोणी पाणी घालून वाढवित नाही, त्याप्रमाणे कर्मांच्या फलाची इच्छा सोडून देऊन कर्मे करावी॥ १७३॥ फार काय सांगावे! ज्याप्रमाणे दुधाच्या प्राप्तीचा यत्किंचितही ध्यास मनात न ठेविता गायी राखणारा गावांतील गायी गोळा करतो, त्याप्रमाणे कर्म करतेवेळी, कर्मफळाच्या ठिकाणी "मला या कर्माचे फळ प्राप्त व्हावे" अशी यत्किंचितही आशा नसावी॥ १७४॥ अशा प्रकारची कर्म करण्याची हातोटी साधून जे कर्म केले जाते त्या कर्माची त्या कर्माशीच गांठ बांधली जाते म्हणजे ते कर्म बंधनकारक होत नाही, असा अर्थ॥ १७५॥ म्हणून कर्मफळाच्या ठिकाणी यत्किंचितही आसक्ती न धरता व कर्तृत्वाभिमान सोडून देऊन कर्म करावे हे माझे निश्चित सांगणे आहे॥ १७६॥ जो जीवरूपी बंधनाने त्रस्त झाला असेल व ज्याला त्यातून मुक्त होण्याची सारखी रुखरुख लागली असेल, त्याने या मझ्या म्हणण्याहून दुसरे निराळे काही करू नये, असे माझे वारंवार सांगणे आहे॥ १७७॥

**नियतस्य तु सन्न्यासः कर्मणो नोपपद्यते। मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः॥ ७॥**

**अर्थ**—या शास्त्रविहित नित्यनैमित्तिक कर्मांचा संन्यास (म्हणजे त्याग) सर्वस्वी करता येत नाही (सांगितलेल्या मार्गाने) विचार न करता केला जाणारा कर्माचा त्याग अविचारपूर्वक होत असल्यामुळे तो तामस त्याग म्हटला जातो॥ ७॥

**नातरी आंधाराचेंनि रोखें। जैसीं डोळां रोंविजती नखें। तैसा कर्मद्वेषें अशेखें। कर्मेंचि सांडी॥ १७८॥**
**तयाचें जे कर्म सांडणें। तें तामस पैं मी म्हणें। शिसाराचें रागें लावणें। शिसचि जैसें॥ १७९॥**
**हां गा मार्ग दुवाड होये। तरी निस्तरितील पाये। कीं तेचि खांडणें आहे। मार्गापराधें॥ १८०॥**
**भुकेलियापुढें अन्न। हो का भलतैसें उन्ह। तरी बुद्धी न घेतां लंघन। भाणें पापरां हाल्या॥ १८१॥**
**तैसा कर्माचा बाध कर्में। निस्तरिजे करितेनि वर्में। हें तामस नेणे भ्रमें। माजविला॥ १८२॥**
**कीं स्वभावें आलें विभागा। तें कर्मेचि वोसंडी पैं गा। परी झणें आतला त्यागा। तामसा तया॥ १८३॥**

**अर्थ**—ज्या प्रमाणे काळ्याकुट्ट आंधारावर सूड उगविण्याकरिता डोळ्यात बोट घालून डोळे फोडून घेऊन अंध व्हावे त्याप्रमाणे कर्माच्या द्वेषामुळे जो नि:शेष कर्माचा त्याग करतो॥ १७८॥ ज्याप्रमाणे अर्धशीशीच्या दु:खाच्या रागाने कपाळच कापावे, त्याप्रमाणे त्याचा संपूर्ण कर्मांचा त्याग तामस असतो, असे मी म्हणतो॥ १७९॥ हे अर्जुना! मार्ग वाईट असला तरी, पायच तो कसा तरी चालून जातील. मार्गाच्या दोषामुळे पायच तोडायचे असतात काय?॥ १८०॥ अत्यंत भुकेल्यापुढे ठेवलेले ताटभर अन्न अत्यंत उन्ह असले तरी थोडा बुद्धीने विचार करून ते घेतले नाही व रागाने लाथाडले तर तो (भुकेला) उपाशीच राहील॥ १८१॥ याप्रमाणे कर्म करूनही कर्म बंधनकारक होणार नाही अशी जी कर्म करण्याची मार्मिक हातोटी ती अज्ञानभ्रमाने माजलेला तामसपुरुष जाणत नसतो॥ १८२॥ जे कर्म प्रकृति-स्वभावानुसार आपल्या वाटेला आले त्या कर्माचा जो त्याग करतो त्याचा तो त्याग तामसत्यागात पडतो. अर्जुना! अशा तामसत्यागाचा तू स्पर्श होऊ देऊ नकोस॥ १८३॥

**दु:खमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत्। स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत्॥ ८॥**

**अर्थ**—शरीराच्या दु:खाच्या भयाने कर्म हे दु:खदायक आहे, असे वाटून कर्माचा त्याग करणे, याला राजस त्याग म्हणतात. या राजसत्यागाने खऱ्या सात्विकत्यागाचे फल मिळत नाही॥ ८॥

**अथवा स्वाधिकार बुझे। आपलें विहितही सुझे। परी करितया उभजे। निबरपणा॥ १८४॥**
**जे कर्माची ऐली कड। नावेक होय दुवाड। जे वाहतिये वेळे जड। शिदोरी जैसी॥ १८५॥**
**जैसा निंब जिभे कडवटु। हिरडा पहिलें तुरटु। तैसा कर्मा ऐल शेवटु। खणुवाळा होय॥ १८६॥**

**कां गाई दुवाड शिंग। शेंवतीये अडव आंग। भोजनसुख महाग। पाक करितां॥ १८७॥**
**तैसें पुढतपुढती कर्म। आरंभींच अति विषम। म्हणोनि तो तें श्रम। करितां मानी॥ १८८॥**
**एऱ्हवीं विहितत्त्वें मांडी। परी घालितां असुरवाडीं। तेथ पोळला ऐसा सांडीं। आदरिलेंही॥ १८९॥**
**म्हणे वस्तु देहासारिखी। आली बहुती भाग्यविशेखीं। मा जाचूं कां कर्मादिकीं। पापिया जैसा॥ १९०॥**
**केले कर्मी जें द्यावें। तें झणें मज होआवें। आजि भोगूं ना कां बरवे। हातींचे भोग॥ १९१।**

**अर्थ**—अथवा नित्य विहित कर्म हे आपला ब्राह्मण्यादि अधिकार कायम ठेवणारे आहे, हे तो जाणतो. आणि ते आपणाला विहितच आहे असेही जाणतो. परंतु कर्म करण्याकडे मन वळतच नाहीं किंवा ते कर्म करावेसे वाटतच नाही॥ १८४॥ ज्याप्रमाणे शिदोरी वाटेने घेऊन जाताना जड वाटते, त्याप्रमाणे कर्म, करते वेळी शरीराला (प्रारंभी) क्षणभर दुःखदायक वाटते॥ १८५॥ ज्याप्रमाणे रोग निवारण करण्याकरिता घेतलेला निंब प्रथम कडू वाटतो. तसेच हिरडा प्रथम तुरट वाटतो, त्याप्रमाणे कर्माची सुरुवातच फक्त प्रथम कठीण वाटते॥ १८६॥ गायीचे शिंगच भीतिदायक असते. कांटेरी शेवंतीचा आडवा भाग काट्यामुळे प्रथमतः तापदायक होतो. भोजनाने सुख होते, पण त्याकरिता कराव्या लागणाऱ्या स्वयंपाकाचा त्रास सहन करावा लागतो॥ १८७॥ त्याप्रमाणे नित्यनैमित्तिक कर्मे वारंवार करताना आरंभीच त्रासदायक वाटतात; म्हणून मनुष्याला ती कर्मे करण्याचे श्रम वाटतात॥ १८८॥ नाही तरी हा राजस त्यागकर्ता नित्यनैमित्तिक कर्मे शास्त्रांनी सांगितली आहेत असे प्रतिपादन करतोच; पण ते कर्म करीत असता क्लेश झाले की मध्येच अग्नीने पोळल्याप्रमाणे सोडून देतो॥ १८९॥ राजसत्यागकर्ता मनात म्हणतो मोठ्या भाग्याने हा मनुष्य देह प्राप्त झाला असताना पापभोग भोगणाऱ्या दुर्दैवी मनुष्याप्रमाणे कर्मादिक करण्याचे कष्ट या देहाला देऊन त्या देहाचा छळ कां करू?॥ १९०॥ केलेल्या कर्माचे फळ पुढे ते कदाचित् मला मिळणारही नाही, मग आजच जे भोग प्राप्त झाले आहेत ते भोगून घेणे बरे नाही काय?॥ १९१॥

**ऐसा शरीराचिया क्लेशा-। भेणें कर्मे वीरेशा। सांडी तो परियेसा। राजसु त्यागु॥ १९२॥**
**एऱ्हवीं तेथही कर्म सांडे। परी त्यागफळ न जोडे। जैसें उतलें आगीं पडे। तें नलगेचि होमा॥ १९३॥**
**का बुडोनि प्राण गेले। ते अर्धोदकीं निमाले। हें म्हणों नये जाहलें। दुर्मरणचि॥ १९४॥**

**अर्थ**—याप्रमाणे कर्म करताना शरीराला होणाऱ्या क्लेशाच्या भीतीने कर्म सोडून देणे याला, वीरश्रेष्ठा अर्जुना! राजसत्याग म्हणतात.॥ १९२॥ तापावयास मांडलेल्या, पण उतू गेलेल्या दुधाचा होम झाला असे ज्याप्रमाणे समजले जात नाही, त्याप्रमाणे तेथेही वास्तविक पाहतां (कर्माच्या राजस त्यागात) कर्म सुटले जाते. पण त्याला सात्विक त्यागाचे फळ मिळत नाही॥ १९३॥ किंवा देहाच्या अर्ध्या इतक्या गंगेच्या पाण्यात अकस्मात् बुडणाऱ्यांना अर्धोदकी मेले असे म्हणता येत नाही. त्याचे ते दुर्मरणच होय॥ १९४॥

**गूढार्थदीपिका—अर्धोदके तु जान्हव्यां म्रियतेऽनशनेन यः। स याति न पुनर्जन्म ब्रह्मसायुज्यमेति च॥**

(अग्निपुराण)

आधले दिवशी उपोषण करून दुसरे दिवशी देहाच्या अर्ध्याभागापर्यंत खोल असलेल्या गंगेच्या पाण्यात, ब्रह्मपद प्राप्त व्हावे या भावनेने, जो प्राणोत्क्रमण करतो, त्याला पुनर्जन्म प्राप्त होत नाही व सायुज्यतामुक्ति मिळते, असे अग्निपुराणात वचन आहे. अर्थात् अर्धोदकात मरणारे, समाधानाने, ब्रह्मप्राप्तीच्या भावनेने मेले पाहिजेत असे वरील वचनात सांगितले असल्यामुळे व बुडून मरणाऱ्याच्या ठिकाणी त्या भावना राहत नसल्यामुळे त्यांचे ते मरण माउलींनी दुर्मरणच ठरविले आहे.

**तैसें देहाचेनि लोभें। जेणें कर्मा पाणी सुभे। तेणें साच न लभे। त्यागाचें फळ॥ १९५॥**
**किंबहुना आपुलें। जैं ज्ञान होय उदया आलें। तैं नक्षत्रातें पाहलें। गिळीं जैसें॥ १९६॥**
**तैशा सकारण क्रिया। हारपती धनंजया। तो कर्मत्यागु ये जया। मोक्षफळासी॥ १९७॥**
**तें मोक्षफळ अज्ञाना। त्यागिया नाहीं अर्जुना। म्हणोनि तो त्यागु न माना। राजसु तो॥ १९८॥**

श्रीमाउलींनी दोघांना पक्षी व नर अशा दोन उपमा देऊन नर ज्याप्रमाणे 'हळु हळु ढाळे ढाळे। केउतेनि एके वेळे। तया मार्गाचेनि बळें। निश्चित ठाके "(ज्ञा ३-४२) एका खांदीवरून दुसऱ्या खांदीवर जात जातच निश्चित फळाला प्राप्त होतो, त्याप्रमाणे कर्मयोग निष्ठा आचरणारा पुरुष" विहितेचि निजाचारे। पूर्णता अवसरे। पावते होती" काही काळाने पूर्णावस्थेला पोहोचतो असे सांगितले.

जोपर्यंत आपल्या ठिकाणी असलेली विषयसुखाची वासना नाहीशी होत नाही तोपर्यंत आपणाला प्रयत्न हा करावा लागणारच. विषयावाचून मन सदा संतुष्ट राहू लागले की प्रयत्न करण्याचे आपोआप थांबते.

नित्यनैमित्तिक कर्मे केवळ कर्तव्य म्हणून व भगवंतांची आज्ञापालन म्हणून केली असता कर्तृत्वाभिमान व फळाकांक्षा राहण्यास जागा राहत नाही. अशा रीतीने कर्म करूनही कर्माचा त्याग अनायासेच घडतो. यालाच "सात्विक त्याग" असे म्हणतात हा सात्विक त्यागच नैष्कर्म्य स्थिति प्राप्त करून देण्याला कारणीभूत आहे.

नैष्कर्म्य म्हणजे आपण मूळचे कर्मरहित केवळ सच्चिदानंद स्वरूप आहोत असे जाणणे होय. कर्माच्या सात्विक त्यागाच्या अनुष्ठानाने भगवंतांनी निर्माण केलेल्या धर्मानुसार वागण्याचा इंद्रियांना अभ्यास लागून चित्त परमेश्वराचे ठिकाणी स्थिर होत जाते. व परमेश्वराच्या कृपेने तो कर्मयोगी आत्मज्ञान प्राप्त होऊन कर्म व कर्तृत्व याहून आपल्याला पूर्णतः अलग समजतो. त्यामुळे त्याच्या ठिकाणी खरी प्रवृत्तिनिवृत्तिरहित साक्षीदशा किंवा समता बाणली जाते. म्हणूनच माउली अशा या सात्विकत्यागाला मोक्षरूपी मोठे फळ येते असे म्हणते.

**आतां जाळुनि बीज जैसें। झाडा कीजे निर्वंशें। फळ त्यागूनि कर्म तैसें। त्यजिलें जेणें॥ २०८॥**
**तया लागतखेंवो परिसीं। धातूची गंधिकाळिक जैसी। जाती रजतमें तैसीं। तुटलीं दोन्ही॥ २०९॥**
**मग सत्त्वें चोखाळे। उघडती आत्मबोधाचे डोळे। तेथ मृगांबु सांजवेळे। होय जैसें॥ २१०॥**
**तैसा बुद्ध्यादिकांपुढां। असतु विश्वाभास हा येवढा। तो न देखे कवणीकडां। आकाश जैसें॥ २११॥**

**अर्थ**—आता ज्याप्रमाणे बीजच जाळले तर झाडाचा निर्वंश होतो त्याप्रमाणे ज्याने कर्माच्या फळाचा त्याग करून कर्माचा त्याग केला॥ २०८॥ ज्याप्रमाणे परिसाचा लोखंडाला स्पर्श झाल्याबरोबर लोखंडाचा जंग व काळेपणा नाहीसा होतो त्याप्रमाणे सात्विकत्याग साधला तर रज तम हे दोन्ही गुण नाहीसे होतात॥ २०९॥ ज्याप्रमाणे सायंकाळी मृगजळ निरास पावते त्याप्रमाणे मग शुद्ध अशा सात्विकत्यागाने आत्मबोधाचे डोळे उघडतात (म्हणजे आत्मबोध अंतःकरणात रुजेल अशी भूमिका प्राप्त होते). व आकाशाला मेघ केव्हा आले व केव्हा नाहीसे झाले याची वार्ताही नसते त्याप्रमाणे तो सात्विकत्यागी बुद्धी, मन, प्राण इत्यादिकांपुढे भासणारा एवढा मोठा जगताचा भास कोठेही पाहत नाही. (याप्रमाणे आत्मबोधामुळे अनात्मपदार्थाचा निरास होतो)॥ २१०-२११॥

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते। त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः॥ १०॥**

**अर्थ**—जो अशुभ कर्माचा द्वेष करीत नाही व शुभकर्मात आसक्त होऊन राहत नाही तोच त्यागशील, सत्त्वगुण युक्त, बुद्धिमान् व निःशंक (पुरुष) होय॥ १०॥

**म्हणोनि प्राचीनाचेनि बळें। आलीं कृत्ये कुशलाकुशलें। तियें व्योमाआंगी आभाळें। जिरालीं जैसीं॥ २१२॥**
**तैसीं तयाचिये दिठी। कर्मे चोखाळलीं किरीटी। म्हणोनि सुखदुःखीं उठी। पडे ना तो॥ २१३॥**
**तेणें शुभकर्म जाणावें। मग तें हर्षे करावें। का अशुभालागीं होआवें। द्वेषिया ना॥ २१४॥**
**तरी इया विषयींचा कांहीं। तया एकुही संदेहो नाहीं। जैसा स्वप्नाच्या ठायीं। जागिन्नलिया॥ २१५॥**
**म्हणऊनि कर्म आणि कर्ता। या द्वैतभावाची वार्ता। नेणे तो पांडुसुता। सात्त्विक त्यागु॥ २१६॥**
**ऐसेनि कर्मे पार्था। त्यजिलीं त्यजिती सर्वथा। अधिकें बांधती अन्यथा। सांडिलीं तरी॥ २१७॥**

**अर्थ**—आणि प्रारब्धाच्या योगाने जी शुभ किंवा अशुभ कर्मे प्राप्त झाली ती त्याच्या दृष्टीने सात्विकत्यागामुळे शुद्ध झाली असल्याकारणाने ज्याप्रमाणे आकाशात अभ्रे नाहीशी व्हावी त्याप्रमाणे शुभकर्माने मिळालेल्या सुखाने तो उल्हास पावत नाही किंवा अशुभ कर्माने मिळालेल्या दुःखाने गलित होत नाही॥ २१२-२१३॥ त्याने शुभ कर्माची

ओळख करून घेऊन ते आनंदाने करावे किंवा अशुभ कर्माचा द्वेष करावा असे त्याच्याकडून घडत नाही॥ २१४॥ ज्याप्रमाणे स्वप्नातील घडलेला दृश्य पसारा जाग आल्यावर मिथ्या वाटतो त्याप्रमाणे शुभाशुभ कर्मापासून प्राप्त होणारे सुखदु:ख मिथ्या आहेत, याबद्दल त्याला काहीच संशय नसतो.॥ २१५॥ म्हणून अर्जुना! हे कर्म व मी करणारा कर्ता या द्वैतभावाची गोष्टही तो जाणत नाही. हा सात्विक त्याग होय॥ २१६॥ अर्जुना! अशा प्रकारे (द्वैतरहित होऊन) कर्मे केली गेली असता ती खरोखर सोडली जातात. त्या व्यतिरिक्त अन्य प्रकाराने सोडलेली कर्मे अधिकच बंधनात पाडतात॥ २१७॥

**न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः। यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते॥ ११॥**

**अर्थ**—शरीरधारी जीवाला सर्व कर्मे संपूर्णत: टाकून देणे शक्य नाही; परंतु जो कर्माच्या फलाचा त्याग करतो, तो खरा त्यागी होय॥ ११॥

**आणि हां गा सव्यसाची। मूर्ति लाहोनि देहाची। खंती करिती कर्माची। ते गांवढे गा॥ २१८॥**
**मृत्तिकेचा वीटु। घेऊनि काय करील घटु। केउता तंतू पटु। सांडील तो॥ २१९॥**
**तेवींचि वन्हित्व आंगी। आणि उबे उबगणें आगी। कीं तो दीपु प्रभेलागीं। द्वेष करील काई॥ २२०॥**
**हिंगु त्रासिला घाणी। तरी कैचें सुगंधत्व आणी। द्रवपण सांडूनि पाणी। कें राहे तें॥ २२१॥**
**तैसा शरीराचेनि आभासें। नांदतु जंव असे। तंव कर्मत्यागाचें पिसे। काइसें तरी॥ २२२॥**
**आपण लाविजे टिळा। म्हणोनि पुसों ये वेळोवेळा। मा घाली फेडी निडळा। कां करूं ये गा॥ २२३॥**
**तैसें विहित स्वयें आदरिलें। म्हणोनि त्यजूं ये त्यजिलें। परी कर्मचि देह आतलें। तें कां सांडील गा॥ २२४॥**
**जें श्वासोच्छ्वासवरी। होत निजेलियाही वरी। कांही न करणेंचि परी। होती जयाची॥ २२५॥**
**या शरीराचेनि मिसकें। कर्मचि लागलें असिकें। जिता मेलया न ठाके। इया रीती॥ २२६॥**
**यया कर्माते सांडिती परी। एकीचि ते अवधारीं। जे करितां न जाइजे हारी। फळाशेचिये॥ २२७॥**

**अर्थ**—आणि हे पाहा, अर्जुना! देह धारण करून जे कर्माचा तिटकारा करतात ते गांवढळ होत॥ २१८॥ मातीचा तिटकारा करून घट काय करील? वस्त्राला तंतूचा कसा त्याग करता येईल?॥ २१९॥ त्याचप्रमाणे उष्णता हेच ज्याचे स्वरूप आहे असा अग्नि आपल्या उष्णतेला त्रासेल काय? किंवा दिवा आपल्या प्रकाशाचा द्वेष करील काय?॥ २२०॥ हिंग आपल्या वासाला कंटाळला तरी तो आपले ठिकाणी सुगंधत्व कोठून आणील? पाणी आपला पातळपणा टाकून कोठे राहील?॥ २२१॥ त्याप्रमाणे शरीराच्यारूपाने जोपर्यंत (जीवंत) आहे तोपर्यंत कर्मत्यागाचा वेडेपणा तरी कसा करता येईल?॥ २२२॥ अर्जुना! कपाळाला आपणच गंध लावतो म्हणून ते सहज पुसताही येते. परंतु कपाळालाच लावणे व काढणे करता येईल काय?॥ २२३॥ त्याप्रमाणे विहित (म्हणजे आपल्या अधिकारानुसार प्राप्त झालेले कर्म) कर्माचा आपणच आदर केला असल्यामुळे त्या कर्माचा त्याग केला तर तो त्याग करता येतो. पण कर्मानेच देहाला व्यापिले असल्यामुळे ते देहाला कसे सोडता येईल?॥ २२४॥ निजले असता काहीही कर्म घडले नसले तरी श्वास घेणे व सोडणे हे कर्म ज्याचे होत राहते॥ २२५॥ या शरीराचे निमित्ताने कर्म हे पाठीला लागले आहे. जीवंत असताना वा मेल्यावरही या प्रकारे ते थांबत नाही॥ २२६॥ कर्माचा त्याग करण्याचा एकच उत्तम मार्ग आहे. तो असा ऐक, कर्म करीत असताही त्याच्यापासून प्राप्त होणाऱ्या फलाच्या इच्छेच्या स्वाधीन होऊ नये॥ २२७॥

**कर्मफळ ईश्वरीं अर्पे। तत्प्रसादें बोधु उद्दीपे। तेथ रज्जुज्ञानें लोपे। व्याळशंका॥ २२८॥**
**तेणें आत्मबोधें तैसें। अविद्येसीं कर्म नाशे। पार्था त्यजिजे जैं ऐसें। तैं त्यजिलें होय॥ २२९॥**
**म्हणोनि इयापरी जगीं। कर्मे करितां मानूं त्यागी। येर मूर्च्छने नांव रोगीं। विश्रांति जैसी॥ २३०॥**
**तैसा कर्मी शिणे एकीं। तो विसांवों पाहे आणिकीं। दांडेयाचे घाय बुकी। धाडणें जैसें॥ २३१॥**
**परी हें असो पुढती। तोचि त्यागी त्रिजगतीं। जेणें फळत्यागें निष्कृती। नेलें कर्म॥ २३२॥**

**अर्थ**—कर्मापासून प्राप्त होणारे फल ईश्वराच्या ठिकाणी समर्पण करावे. ईश्वराच्या प्रसादाने आत्मज्ञान प्रगट होते तेव्हा दोराच्या ज्ञानाने ज्याप्रमाणे सर्पाची शंका दूर होते, त्याप्रमाणे त्या आत्मबोधाने अविद्येसहित कर्माचा बंध तुटतो. अर्जुना! अशा प्रकारचा त्याग जेव्हा घडतो तेव्हाच तो खरा त्याग होतो. ॥ २२८-२२९ ॥ म्हणून या प्रकाराने जगात जो कर्माचा त्याग करतो तो (खरा) महात्यागी होय. त्यावाचून दुसरा त्याग म्हणजे जसे रोग्याला मूर्छा आली असता तो विश्रांति घेतो असे समजण्यासारखे आहे ॥ २३० ॥ तसे तो एका कर्माने शिणला म्हणून दुसऱ्या कर्माचा आश्रय घेऊन विसावा घेउ पाहतो. असे करणे म्हणजे दंडुक्याचे घाव चुकविण्याकरितां बुक्क्यांचा मार सहन करण्यासारखे आहे ॥ २३१ ॥ परंतु याचा आता पुढील विस्तार पुरे. कर्माच्या फळाचा त्याग करून कर्माला ज्याने कर्मरहित स्थितीस पोहोचविले तोच त्रैलोक्यात खरा त्यागी होय. ॥ २३२ ॥

**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् । भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु सन्न्यासिनां क्वचित् ॥ १२ ॥**

**अर्थ**—जो कर्माचा वर सांगितल्याप्रमाणे खरा त्याग करीत नाही त्याला मेल्यानंतर अनिष्ट, इष्ट व मिश्र अशी तीन प्रकारची कर्माची फळे मिळतात. ज्ञानप्रधान संन्यास करणाऱ्याला ही फळे मिळत नाहीत ॥ १२ ॥

**एऱ्हवीं तरी धनंजया। त्रिविधा कर्मफळा गा यया। समर्थ ते कीं भोगावया। जे न सांडितीचि आशा ॥ २३३ ॥**
**आपणचि विऊनि दुहिता। कीं न मम म्हणे पिता। तो सुटे कीं प्रतिग्रहिता। जांवाई शिरके ॥ २३४ ॥**
**विषाचे आगरही वाहती। ते विकितां सुखें लाभें जिती। येर निमाले जे घेती। वेंचोनि मोलें ॥ २३५ ॥**
**तैसें कर्ता कर्म करूं। अकर्ता फळाशा न धरूं। एथ न शके आवरूं। दोहींते कर्म ॥ २३६ ॥**
**वाटे पिकलिया रुखाचें। फळ अपेक्षी तयाचें। तेवीं साधारण कर्माचें। फळ घे तया ॥ २३७ ॥**
**परी करूनि फळ नेघे। तो जगाच्या कामीं न रिघे। जे त्रिविध जग अवघें। कर्मफळ हें ॥ २३८ ॥**
**देव मनुष्य स्थावर। यया नांव जगडंबर। आणि हे तंव तिन्हीप्रकार। कर्मफळाचे ॥ २३९ ॥**
**तेंचि एक गा अनिष्ट। एक तें केवळ इष्ट। आणि एक इष्टानिष्ट। त्रिविध ऐसें ॥ २४० ॥**

**अर्थ**—वास्तविक पाहता अर्जुना! जे कर्माच्या फलाची आशा सोडून देत नाहीत, तेच या तीन प्रकारच्या कर्माचा भोग भोगण्यास योग्य आहेत ॥ २३३ ॥ बाप आपणच मुलीच्या जन्माला कारणभूत होऊन कन्यादान करतो त्यावेळी, ती माझी नाही, असे म्हणतो व तो सुटतो, पण दान घेणारा जांवाई मात्र त्यात गुंततो ॥ २३४ ॥ विषाच्या बागाची लागवड करणारे किंवा विषाचा सांठा डोक्यावर वाहणारे विषाच्या बागा किंवा गठ्ठे विकून विषबाधेपासून सुटतात व जीवंत राहतात, पण जे दुसरे पैसे देऊन ते विकत घेतात (व सेवन करतात) ते मात्र प्राणास मुकतात ॥ २३५ ॥ त्याप्रमाणे अहंकार धारण करणारा कर्माचा कर्ता कर्म करो किंवा अहंकाररहित झालेला अकर्ता कर्माच्या फलाची आशा (इच्छा) न करो येथे कर्म दोघांनाही सोडू शकत नाही ॥ २३६ ॥ ज्याप्रमाणे वाटेवर असणाऱ्या झाडाचे पिकले फळ जो त्याची इच्छा करील त्याला ते प्राप्त होते, त्याप्रमाणे कर्माचा अहंकार धारण करणाऱ्या प्राकृत पुरुषाला कर्माच्या फळाची अपेक्षा असल्यामुळे यच्चयावत् कर्माचे फल त्याला मिळते ॥ २३७ ॥ हे सर्व तीन प्रकारचे जग कर्माचे फल आहे. जो कर्म करून कर्माच्या फलाची इच्छा करीत नाही, तो जगातील सुख-दुःखात्मक भोगापासून अलिप्त असतो ॥ २३८ ॥ देव, मनुष्य, स्थावर यालाच जगडंबर (जगत) असे म्हणतात आणि हे तीनही प्रकार कर्माच्या फलापासून प्राप्त होतात ॥ २३९ ॥ ते कर्मफल एक अनिष्ट, एक केवल इष्ट आणि एक इष्ट व अनिष्ट मिश्र तीन प्रकारचे आहे ॥ २४० ॥

**परी विषयमंती बुद्धी। आंगीं सूनि अविधी। प्रवर्तती जे निषिद्धीं। कुव्यापारीं ॥ २४१ ॥**
**तेथ कृमि कीट लोष्ट। हे देह लाहती निकृष्ट। तया नाम तें अनिष्ट। कर्मफळ ॥ २४२ ॥**

**अर्थ**—परंतु विषयाधीन झालेली बुद्धि शास्त्रबाह्य कर्माच्या ठिकाणी उपयुक्त होऊन धर्माने निषिद्ध ठरविलेली वाईट अविधियुक्त कर्मे जेव्हा करू लागते ॥ २४१ ॥ तेव्हा त्यांना कृमी, कीटक, पाषाण हे नीच देह प्राप्त होतात. त्याला अनिष्ट कर्मफल म्हणतात ॥ २४२ ॥

**का स्वधर्मा मान देतां। स्वाधिकार पुढां सूतां। सुकृत कीजे पुसतां। आम्नायातें॥ २४३॥**
**तैं इंद्रादिक देवांचीं। देहें लाहिजती सव्यसाची। तया कर्मफळा इष्टाची। प्रसिद्धि गा॥ २४४॥**

**अर्थ**—किंवा स्वत:च्या धर्माचा आदर करून व स्वत:चा अधिकार (पात्रता) पुढे ठेवून वेदाज्ञेच्या अनुरोधाने पुण्यकर्म केले जाते, तेव्हा अर्जुना! इंद्रादिक देवांचे देह प्राप्त होतात. त्याला इष्टकर्माचे फल असे म्हणतात॥ २४३-२४४॥

**आणि गोड आंबट मिळे। तेथ रसांतर फरसाळें। उठी दोहीं वेगळें। दोहीं जिणतें॥ २४५॥**
**रेचकचि योगवशें। होय स्तंभावयादोषें। तेवीं सत्यासत्य समरसें। सत्यासत्यचि जिणिजे॥ २४६॥**

**अर्थ**—गोड व आंबट रस एके ठिकाणी मिळाले असता दोहोंहून वरचढ असा भिन्न रुचीचा तिसराच रस तयार होतो॥ २४५॥ योगप्रक्रियेने रेचकच कुंभक साधणारा होतो किंवा आयुर्वेद शास्त्रांत सांगितल्याप्रमाणे रेचन करणारे औषधच मिश्र द्रव्याच्या योगाने स्तंभन करण्यास कारणीभूत होते, त्याप्रमाणे सत्य व असत्य यांच्या सामरस्याने सत्य असत्याहून निराळेच असे कर्मफल निर्माण होते.

**गूढार्थदीपिका**—सत्व, रज व तम या तीन गुणांच्या कमी जास्त प्रमाणामुळे चांगली अथवा वाईट कर्मे आपल्याकडून घडतात. चांगल्या कर्माचे फळ पुण्यरूप व वाईट कर्माचे फळ पापरूप असते. यानांच दुसरी इष्ट व अनिष्ट ही नांवे दिली गेली आहेत.

सत्त्वगुणाच्या प्राधान्याने पुण्यरूप कर्मे होत असल्याकारणाने त्याचे फळ इष्ट मिळते व इंद्रादि देवतांच्या योनीत जन्म मिळतो. तमोगुणाच्या प्राधान्याने अत्यंत पापरूप कर्म होत असल्यामुळे त्याचे फळ अनिष्ट मिळते व कृमी, कीटक व दगडादि योनीत जन्म मिळतो. सत्व व तमाच्या सामरस्याने काही पुण्यरूप व काही पापरूप कर्मे होत असल्यामुळे त्याचे फळ इष्टानिष्ट किंवा मिश्र असे मिळते व मनुष्य योनीत जन्म मिळतो. मिश्रफळरूप असलेली ही मनुष्ययोनी सत्त्वप्रधानरूप इंद्रादि देवादिकांच्या योनीहून व तमप्रधानरूप कृमीकीटकपाषाणादि योनीहून कशी अलग आहे व तिचे स्वरूप दोघांपेक्षा तृतीय असे निराळेच कसे आहे हे ''रेचकचि योगवशे'' या पदाने माउली सांगत आहे.

**योगवशें**—हा शब्द आयुर्वेद व योगशास्त्र या दोन्ही शास्त्रांच्या दृष्टीने वापरण्यात आल्याचे दिसते. आयुर्वेदात औषध योगाने म्हणजे मिश्रण करून घटक द्रव्यांच्या कार्याहून अगदी निराळे कार्य देखील होऊ शकते. रेचक म्हणजे सारक औषध मिश्रद्रव्य युक्त झाले तर त्याचीच परिणती रेचक कार्य थांबविण्यात होऊन त्याच्याहून निराळी अशी स्तंभन क्रिया करण्यातही होऊ शकते. योगाशास्त्रात रेचक करीत असता वायू स्तब्ध होतो व तो रेचक व पूरक याहून निराळ्या अशा कुंभकास कारणीभूत होतो, असे सांगितले आहे. तेव्हा योग अथवा आयुर्वेद या दोघीं पैकी कोणतीही उपमा घेतली तरी ती लागू होते.

**सत्यासत्यसमरसे। सत्यासत्यचि जिणिजे**

श्रीज्ञानेश्वर माउलींनी मनुष्ययोनीचे वैशिष्ट्य या पंक्तींने ध्वनित केले आहे.

सत्वाचा गुण प्रकाशरूप किंवा ज्ञानरूप असून तमाचा गुण असत्य म्हणजे जाड्यरूप आहे. मनुष्ययोनी ही दोहींचेही मिश्रण असल्यामुळे प्रकृतीने किंवा स्वभावाने सत्य व असत्य यांचा विलक्षण मिलाफ त्याच्या ठिकाणी झालेला आहे. पश्वादी योनी काय किंवा देवादी योनी काय त्या दोन्हीही केवळ भोगयोनी आहेत. पहिल्यात केवळ दु:खाचा भोग तर दुसऱ्यात केवळ सुखाचा भोग. या दोन्ही योनीत मनुष्ययोनी प्रमाणे आत्मानात्मविवेकाची संधी प्राप्त होत नाही. मनुष्ययोनी मात्र सुखदु:खात्मक भोगरूप असूनही आत्मज्ञान प्राप्त करून देणारी आहे. अध्यात्मशास्त्राच्या अध्ययनाने व श्रीगुरुच्या उपदेशामृताने मनुष्य कृतार्थ होऊन भोगप्रवृत्तीच्या विरुद्ध अशी निर्वृत्तिक स्थिति या मनुष्ययोनीत प्राप्त करून घेऊ शकतो.

सत्य व असत्य अथवा पुण्य व पाप हे सम झाले असताच मनुष्य जन्म येतो व याच जन्मात मनुष्यजन्माचे

सार्थक होउ शकते असे ''सत्यासत्य समरसें। सत्यासत्यचि जिणिजे'' या पंक्तीने सुचविले आहे.

**म्हणौनि समभागें शुभाशुभें। मिळोनि अनुष्ठानाचें उभें। तेणें मनुष्यत्व लाभे। तें मिश्र फळ॥ २४७॥**

**अर्थ**—म्हणून पुण्यरूप व पापरूप अशा समभाग कर्माचे आचरण घडले असता जे फळ प्राप्त होते त्यायोगे मनुष्ययोनीत जन्म येतो. ते (कर्माचे) मिश्रफळ होय.॥ २४७॥

**ऐसें त्रिविध यया भागीं। कर्मफळ मांडलेंसे जगीं। हें न संडी तयांसी भोगीं। जें सूदले आशा॥ २४८॥**
**जेथें जिव्हेचा हातु फांटे। तंव जेवितां वाटे गोमटें। परि परिणामीं शेवटें। अवश्य मरण॥ २४९॥**
**संवचोरमैत्री चांग। जंव न पविजे तें दांग। सामान्या भली आंग। न शिवे तंव॥ २५०॥**
**तैसीं कर्में करितां शरीरीं। लाहती महत्त्वाची फरारी। पाठीं निधनीं एकसरी। पावती फळें॥ २५१॥**
**जैसा समर्थु आणि ऋणिया। मार्गो आला बाइणिया। न लोटे तैसा प्राणिया। पडे तो भोगु॥ २५२॥**
**मग कणिसौनि कणु झडे। तो विरूढला कणिसा चढे। पुढती भूमी पडे। पुढती उठी॥ २५३॥**
**तैसें भोगीं जें फळ होय। तें फळांतरें वीत जाय। चालतां पावो पाय। जिणिजे जैसा॥ २५४॥**
**उताराचिये सांगडी। ठाके ते ऐलीच थडी। तेवीं न मुकिजती वोढी। भोग्याचिये॥ २५५॥**
**पैं साध्यसाधनप्रकारें। फळभोगु तो पसरे। एवं गोंविले संसारें। अत्यागी ते॥ २५६॥**

**अर्थ**—याप्रमाणे कर्माचे फळ या जगात तीन प्रकारच्या विभागात पडले. जे कर्मफळाच्या आशेत सांपडले त्यांना कर्मफल भोगावेच लागते. ते त्यांना सोडत नाही॥ २४८॥ खाण्याची वासना अनिवार वाढते तेव्हा खाण्याचे वेळी बरे वाटते, पण त्याचा परिणाम शेवटी अवश्य मरणात होतो॥ २४९॥ जोपर्यंत जंगलात प्रवेश होत नाही तो पर्यंतच सोबतच्या चोराची मैत्री चांगली, वेश्या तो पर्यंतच चांगली जोपर्यंत तिच्या अंगाचा स्पर्श होत नाही॥ २५०॥ त्याप्रमाणे शरीराने कर्म करीत असताच, त्या कर्माचा मोठेपणा असतो. शरीर पडल्यावर (मेल्यानंतर) एकदम त्या कर्माची फले प्राप्त होतात॥ २५१॥ सावकार ऋणकोला कर्जाची मुदत संपताच वायदा मागण्यास आला असता ते देणे चुकविता येत नाही. त्याप्रमाणे जीवाला कर्माचा भोग चुकविता येत नाही. तो भोगायला लागतो (अशी परंपरा चालू असते)॥ २५३॥ (एक पाय पुढे व एक पाय मागे नंतर पुढील पाय मागे व मागील पाय समोर असे) पायाने चालले असता जसे वाटचाल केली जाते त्याप्रमाणे शरीराकडून घडलेल्या कर्माचे फळ भोगीत असता आणखी कर्मे घडून ती नानाप्रकारची दुसरी फळें प्रसवतात॥ २५४॥ ज्याप्रमाणे ने आण करणाऱ्या नावेला ती ज्या तीरावर थांबेल ते तीर (पुन: परतीरावर जायचे असल्याने) तिला अलिकडीलच तीर असते. पलीकडचे तीर नसते म्हणून दोन्ही तीरे समानच त्याप्रमाणे भोग्य पदार्थाच्या ओढी थांबत नाहीत॥ २५५॥ साध्य-साधन प्रकाराने फलांचा भोग विस्तार पावत असतो. याप्रमाणे ज्यांना खरा त्याग साधला नाही ते संसाराच्या पाशात गुंतले जातात॥ २५६॥

**एऱ्हवी जांईचियां फुलां विकसणें। त्याचि नाम जैसें सुकणें। तैसें कर्ममिषें न करणें। केलें जिहीं॥ २५७॥**
**बीजचि वरोसि वेंचे। तेथ वाढती कुळवाडी खांचे। तेवीं फळत्यागें कर्माचें। सारिलें काम॥ २५८॥**
**ते सत्त्वशुद्धी साहाकारें। गुरुकृपामृततुषारें। सासिन्नलेनि बोधें वोसरे। द्वैतदैन्य॥ २५९॥**
**तेव्हां जगदाभासमिषें। स्फुरे तें त्रिविध फळ नाशे। येथ भोक्ता भोग्य आपैसें। निमालें हें॥ २६०॥**
**घडे ज्ञानप्रधानु हा ऐसा। संन्यासु जयां वीरेशा। तेचि फळभोग सोसा। मुकले गा॥ २६१॥**

**अर्थ**—वास्तविक पाहता जाईच्याफुलाचे उमलणे म्हणजेच जसे त्या फुलाचे सुकणे होय (जाईचे फूल फार वेळ प्रफुल्लित राहत नाही. ते लवकर सुकते) त्याप्रमाणे ज्याने कर्माच्या निमित्ताने कर्म निष्कृत केले म्हणजे कर्माला निमित्त झाला तरी कर्तृत्व जो आंगी लावून घेत नाही॥ २५७॥ बीजच जर पोटगी करता संपवले तर भरभराटीस येणारा शेतकीचा व्यवहार जसा नाश पावतो त्याप्रमाणे कर्माच्या फलाच्या त्यागाने कर्माचे मूळ नाहीसे होते॥ २५८॥ असे निष्कृत (म्हणजे फळाचा संबंध सुटलेले) कर्म सत्वशुद्धीच्या साहाय्याने (अंत:करण शुद्ध झाल्यामुळे) व गुरुकृपारूपी अमृताच्या ओलाव्याने तरतरीत झाले असतां द्वैतरूपी दैन्य नाहीसे होते॥ २५९॥ जगताच्या भासामुळे

स्फुरणारे इष्ट, अनिष्ट व मिश्रित असे जे तीन प्रकारचे कर्माचे फळ प्रतीतीस येते, तेच (सात्विक त्यागाने) नाहीसे झाले असता भोक्ता व भोग्य हे आपोआपच नाहीसे होतात. ॥ २६० ॥ वीरश्रेष्ठा अर्जुना! अशा प्रकाराचा ज्ञानप्रधान संन्यास ज्यांना साधला ते फलभोगाच्या हव्यासापासून मुक्त झाले॥ २६१ ॥

**आणि येणें कीर संन्यासें। जैं आत्मरूपीं दिठी पैसे। तैं कर्म एक ऐसें। देखणें आहे॥ २६२॥**
**पडोनि गेलिया भिंती। चित्रांची केवळ होय माती। कां पाहालेया राती। आंधारें उरे॥ २६३॥**
**जैं रूपचि नाहीं उभें। तैं साउली काह्याची शोभे। दर्पणेवीण बिंबे। वदन कें पां॥ २६४॥**
**फिटलिया निद्रेचा ठावो। कैंचा स्वप्नासि प्रस्तावो। मग साच का वावो। कोण म्हणे॥ २६५॥**
**तैसें गा संन्यासें येणें। मूळ अविद्येसीचि नाहीं जिणें। मा तियेचें कार्य कोणें। घेपे दीजे॥ २६६॥**

**अर्थ**—आणि खरोखर असा संन्यास साधून आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं दृष्टी स्थिरावली असता कर्म एक अशी वस्तु आहे, असे भासेल तरी काय?॥ २६२॥ भिंत पडली तर भिंतीवर काढलेल्या चित्रांची केवल मातीच होते किंवा रात्र संपून उजाडल्यावर आंधार राहतो काय?॥ २६३॥ जेथे मूळात वस्तुच नाही तेथे छाया कशी शोभा देणार (म्हणजे सावली कोठून पडणार) आरशाशिवाय मुखाचे प्रतिबिंब कसे पडेल?॥ २६४॥ झोप नाहीशी झाली तर स्वप्नाचा प्रसंग कोठून येणार? मग स्वप्न खरे की खाटे हे तरी कोण म्हणणार?॥ २६५॥ त्याप्रमाणे या ज्ञानप्रधान संन्यासाने अविद्याच जीवंत राहत नाही; तर मग त्या अविद्येच्या कार्याशी (कर्मफलाशी) घेण्यादेण्याचा व्यवहार कोणी करावा?॥ २६६॥

**म्हणोनि संन्यासिये पाहीं। कर्माची गोठी कीजेल काई। परी अविद्या आपुला देहीं। आहे जैं कां॥ २६७॥**
**जैं कर्तेपणाचेनि थांवें। आत्मा शुभाशुभीं धांवे। दृष्टि भेदाचिये राणिवे। रचलीसे जैं॥ २६८॥**
**तैं तरी गा सुवर्मा। बिजावळी आत्मया कर्मा। अपाडें जैसी पश्चिमा। पूर्वेसि कां॥ २६९॥**
**नातरी आकाशा का आभाळा। सूर्या आणि मृगजळा। बिजावळी भूतळा। वायूसि जैसी॥ २७०॥**
**पांघरोनि नईचें उदक। असे नईचिमाजीं खडक। परी जाणिजे का वेगळिक। कोडीचि ते॥ २७१॥**
**हो कां उदकाजवळी। परी सीनानीचि ते बाबुळी। काय संगास्तव काजळी। दीपु म्हणों ये॥ २७२॥**
**जरी चंद्रीं जाला कलंकु। तरी चंद्रेंसीं नव्हे एकु। आहे दिठी डोळ्यां विवेक। अपाड जैसा॥ २७३॥**
**नाना वाटा वाटे जातया। वोघा वोघीं वाहतया। आरसा आरसां पाहतया। अपाडु जेतुला॥ २७४॥**
**पार्था गा तेतुलेनि मानें। आत्मेनिसीं कर्म सिनें। परी घेवविजे अज्ञानें। तें कीर ऐसें॥ २७५॥**
**विकासें रवीतें उपजवी। द्रुती अलीकरवीं भोगवी। ते सरोवरीं कां बरवी। अब्जिनी जैसी॥ २७६॥**
**पुढतपुढती आत्मक्रिया। अन्यकारणकाचि तैशिया। करूं पांचांही तयां। कारणां रूप॥ २७७॥**

**अर्थ**—म्हणून, पाहा! संन्यासियाच्या ठिकाणी कर्माचा परिणाम काय होणार? परंतु आपल्या देहाच्या ठिकाणी जोपर्यंत अविद्या लागली आहे (म्हणजे देह म्हणजेच आत्मा अशी बुद्धि जोपर्यंत आहे) व जेव्हा दृष्टि भेदाच्या राज्यावर आरूढ होते, तेव्हा जीव, मी कर्माचा कर्ता आहे, या अहंकाराने पुण्यरूप किंवा पापरूप कर्म करण्याकडे धांव घेतो. तेव्हा तरी, चांगले वर्म जाणणाऱ्या अर्जुना! ज्याप्रमाणे पूर्व व पश्चिम यात महदंतर असते त्याप्रमाणे आत्मा व कर्म यांचा भिन्नपणा असतो॥ २६७-२६९॥ किंवा आकाश व मेघ, सूर्य व मृगजल, भूमि व वायू यांचा जसा भेद असतो॥ २७०॥ नदीचे पाणी वेष्टून नदीमध्ये खडक राहतात, परंतु खडक व पाणी यांत अनंतपटीने वेगळेपणा असतो, असे समज॥ २७१॥ किंवा पाण्याच्याच जवळ शेवाळ असते, पण शेवाळ व पाणी निराळे असतात. दीपाच्या संगतीने काजळ राहते म्हणून काय काजळाला दीप म्हणता येईल?॥ २७२॥ जरी चंद्राच्या ठिकाणी डाग आहे तरी तो (डाग) चंद्राशी एकरूप नाही. डोळा व दृष्टि यांच्यात जितका भेद आहे॥ २७३॥ किंवा वाट व वाटेने जाणारा, ओघ व ओघात वाहणारा, आरसा व आरशात पाहणारा यांच्यात जितका भिन्नभाव आहे॥ २७४॥ हे अर्जुना! याप्रमाणे तितक्या प्रमाणात आत्म्याहून कर्म निराळे आहे परंतु खरोखर त्यांचे (आत्मा

व कर्म यांचे) ऐक्य अशा प्रकारे अज्ञानाने ग्रहण केले जाते॥ २७५॥ ज्याप्रमाणे सुंदर कमलिनी सरोवरात असते. आपल्या विकासाने सूर्योदय घडवून आणणारी व आपल्या सुवासाने भ्रमराला भोग घडविणारी होते. त्याप्रमाणे आत्म्याच्या ठिकाणी जे कर्म भासते ते दुसऱ्या कारणामुळेच भासते. ती कारणे पांच आहेत. त्या कारणांचे स्वरूप वर्णन करू॥ २७६-२७७॥

**पञ्चैतानि महाबाहो कारणानि निबोध मे। साङ्ख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम्॥ १३॥**

**अर्थ**—सर्व कर्मांच्या सिद्धिकरिता वेदान्तात पांच कारणे सांगितली आहेत. ती अर्जुना! माझेकडून जाणून घे॥ १३॥

**आणि पांचही कारणें तियें। तूंही जाणसील विपायें। जे शास्त्रें उभऊनी बाहे। बोलती जयांतें॥ २७८॥**
**वेदरायाचिया राजधानीं। सांख्यवेदांताच्या भुवनीं। निरूपणाच्या निशाणध्वनीं। गर्जती जियें॥ २७९॥**
**जे सर्वकर्मसिद्धीलागीं। इयेंचि मुद्दलें हो जगीं। येथ न सुवावा अभंगीं। आत्मराज॥ २८०॥**
**या बोलाची डांगुरटी। तियें प्रसिद्धी आली किरीटी। म्हणोनि तुझ्या हन कर्णपुटीं। वसोंत कां जें॥ २८१॥**
**आणि मुखांतरीं आइकिजे। तैसें कायसें हें ओझें। मी चिद्रत्न तुझें। असतां हातीं॥ २८२॥**
**दर्पण पुढां मांडलेया। या लोकांचियां डोळियां। मान द्यावा पाहावया। आपुलें निकें॥ २८३॥**
**भक्त जैसेनि जेथ पाहे। तें तेथ तेंचि होत जाये। तो मी तुझें जाहलों आहें। खेळणें आजि॥ २८४॥**

**अर्थ**—आणि अर्जुना! जी पाच कारणे शास्त्रें हातवर करून सांगतात ती कदाचित् तूही जाणत असशील॥ २७८॥ वेदरूपी राजाच्या राजधानीत सांख्य-वेदान्ताच्या मंदिरामध्ये तत्वनिरूपणरूप पताका व घोष यांच्या समवेत जी पाच कारणे गर्जना करतात॥ २७९॥ जगामध्ये सर्व कर्माच्या सिद्धीकरिता हीच मूळ कारण आहेत. त्याठिकाणी अविनाशी आत्मरूपी राजाला मध्ये घालू नये॥ २८०॥ अर्जुना! असा सांख्य-वेदान्तशास्त्रात डंका वाजल्यामुळे ती प्रसिद्धीस आली. तेव्हा त्या डंकेची गर्जना तुझ्याही कानी आलेली बरी, असे मला वाटते॥ २८१॥ आणि मी चिद्रूपी रत्न तुझ्या स्वाधीन असता दुसऱ्याच्या मुखाने तू ऐकावे असे ओझे तरी घालण्यात काय अर्थ आहे?॥ २८२॥ आपले मुख पाहण्याकरिता आरसा समारे ठेवला असता व आपली दृष्टी स्वच्छ असता लोकांची दृष्टि कां प्रमाण मानावी॥ २८३॥ भक्त भगवंताला जेथे जेथे ज्या ज्या भावनेने पाहील तेथे तेथे व तसा तसा भगवान होत जातो, तो भगवान मी आज तुझ्या हातचे बाहुले झालो आहे॥ २८४॥

**ऐसें हे प्रीतीचेनि वेगें। देवो बोलतां से नेघे। तंव आनंदामाजीं आंगें। विरतसे पार्थ॥ २८५॥**
**चांदिणियाचा पडिभरु। होता सोमकांताचा डोंगरु। विघरोनि सरोवरु। हों पाहे जैसा॥ २८६॥**
**तैसें सुख आणि अनुभूती। या भावांची मोडूनि भिंती। आतलें अर्जुनाकृती। सुखचि जेथ॥ २८७॥**
**तेथ समर्थु म्हणोनि देवा। अवकाशु जाहला आठवा। मग बुडतयाचा धांवा। जीवें केला॥ २८८॥**

**अर्थ**—याप्रमाणे प्रेमाच्या भरात बोलत असता देव स्वतःला विसरले आणि इकडे आनंदामध्ये मग्न झालेला अर्जुन देहभाव विसरला व पूर्णतः निर्व्यापार झाला॥ २८५॥ चांदण्याचा वर्षाव झाला असता सोमकान्ताचा डोंगर विरघळून ज्याप्रमाणे त्याचे सरोवर होऊ पाहतो त्याप्रमाणे सुख व सुखप्रत्यय या दोहोंमधील असणारी भिंत मोडून अर्जुनाच्या रूपाने जेव्हा सुखच भरून राहिले (अर्जुन केवल सुखाची मूर्ति झाला)॥ २८६-२८७॥ तेथे भगवान् श्रीकृष्ण समर्थ होते म्हणून त्यांना आठवणीला सवड झाली. मग सुखात निमग्न होऊन देहाभिमान विसरलेल्या अर्जुनाला सांभाळण्यासाठी श्रीकृष्ण कळकळीने धावले॥ २८८॥

**अर्जुना येसणें धेंडें। प्रज्ञापसरेंसीं बुडे। आलें भरतें एवढें। तें सांवरूनि॥ २८९॥**
**देवो म्हणे हां गा पार्था। तूं आपणपें देख सर्वथा। तंव सांवरूनि येरें माथा। तुकियेला॥ २९०॥**
**म्हणे जाणसी दातारा। मी तुजसी व्यक्तिशेजारा। उबगला आदीं एकाहारा। येवों पाहें॥ २९१॥**
**तयाही हा ऐसा। लोभें देतसा जरी लालसा। तरी कां जी घालीतसां। आड आड जीवा॥ २९२॥**

**तेथ श्रीकृष्ण म्हणती निकें। अद्यापि नाहीं मा ठाऊकें। वेड्या चंद्रा आणि चंद्रिकें। न मिळणें आहे॥ २९३॥**
**आणि हाही बोलोनि भावो। तुज दाऊं आम्ही भिवों। जे रुसतां बांधे थांवो। तें प्रेम गा हें॥ २९४॥**
**एथ एकमेकांचिये खुणे। विसंवादु तंवचि जिणें। म्हणोनि असो हें बोलणें। इये विषयींचें॥ २९५॥**

**अर्थ**—अर्जुन येवढा थोर भक्त. त्याला आत्मस्वरूपाच्या आनंदाचे इतके भरते आले होते की, तो ज्ञानबोधासहित आनंदात विरून गेला; पण समर्थ परमेश्वरांनी त्याला सावरले॥ २८९॥ देव म्हणाले, अरे अर्जुना! तू सर्वस्वी आपल्याकडे पाहा. तेव्हा आपल्याला सावरून अर्जुनाने मान डोलावली॥ २९०॥ अर्जुन म्हणाला; हे उदारा श्रीकृष्णा! तू जाणतोस की मी तुझ्या सान्निध्यात असलो तरी, या द्वैतभावाला कंटाळून मी मूळच्या ऐक्य स्वरूपात येऊ पाहत होतो॥ २९१॥ माझ्या प्रेमाने जर तुम्ही माझी ऐक्याची ही उत्कट इच्छा पूर्ण करीत आहात तर जीवदशेस आणून पुन: आडकाठी कां करीत आहात?॥ २९२॥ तेव्हा श्रीकृष्ण म्हणतात, खरे आहे. पण वेड्या, चंद्र व चंद्राचा प्रकाश यांचा वियोग वेगळेपणा) नाही, हे तुला अझून कसे कळत नाही॥ २९३॥ आणि असे बोलून तुला जी जी आम्ही भिती दाखवितो त्यामुळे तू रुसलास तरी आपले प्रेम आणखीच दृढ होते. असेच हे प्रेम आहे॥ ५९४॥ येथे जोपर्यंत आपण एकमेकांच्या रूपाने निराळे आहोत, तोपर्यंत आपले गुरुशिष्यरूपाने जगणे शक्य आहे. म्हणून या विषयावरील आता बोलणे पुरे॥ २९५॥

**मग कसकसें ते आतां। बोलत होतों पांडुसुता। सर्व कर्मा भिन्नता। आत्मेनिसीं॥ २९६॥**
**तंव अर्जुन म्हणे देवें। माझिये मनींचेंचि स्वभावें। प्रस्ताविलें बरवें। प्रमेय तें जी॥ २९७॥**
**जें सकळ कर्मांचें बीज। कारणपंचक तुज। सांगेन ऐसी पैज। घेतली कां॥ २९८॥**
**आत्मया एथ कांहीं। सर्वथा लागु नाहीं। हें पुढारलासि तें देंई। लाहाणें माझें॥ २९९॥**
**यया बोला विश्वेशें। म्हणितलें तोषें बहुवसे। इयेविषयीं धरणें बैसे। ऐसें कें जोडे॥ ३००॥**

**अर्थ**—मग अर्जुना! मी आता आत्म्याशी सर्व कर्मांची भिन्नता कसकशी आहे म्हणजे आत्म्याहून सर्व कर्मे कसकशी निराळी आहेत, हे सांगत होतो॥ २९६॥ तेव्हा अर्जुन म्हणतो, माझ्या अंत:करणात असलेल्या सिद्धान्ताचीच सहजच देवाने प्रस्तावना केली हे चांगले झाले॥ २९७॥ ही पाच कारणे सर्व कर्मांचे मूळ आहे, हे सांगू अशी शपथ घेतली होती की॥ २९८॥ आत्म्याचा येथे मुळीच संबंध नाही हेही जे तू पुढे मांडलेस ते माझे देणे दे. म्हणजे ते मला समजावून सांग॥ २९९॥ या अर्जुनाच्या म्हणण्यावर सर्व जगाचा शासन करणारा श्रीकृष्ण अत्यंत आनंदित होत्साता म्हणाता, या पारमार्थिक विषयात धरणे धरून बसेल असा श्रोता मिळतो आहे कोठे!॥ ३००॥

**तरी अर्जुना निरूपिजेल। तें कीर भाषेआंतुल। परी मेचु ये होइजेल। ऋणिया तुज॥ ३०१॥**
**तंव अर्जुन म्हणे देवो। काई विसरले मागील भावो। इये गोठीं कीं राखत आहों। मीतूंपण जी॥ ३०२॥**
**एथ श्रीकृष्ण म्हणती हो का। आतां अवधानाचा पसरु निका। करूनियां आइका। पुढारलों तें॥ ३०३॥**
**तरी साचचि गा धनुर्धरा। सर्व कर्मांचा उभारा। होतसे बाहिरबाहिरा। करणीं पांचें॥ ३०४॥**
**आणि पंचकारण दळवाडें। जिहीं कर्माकारु मांडे। ते हेतु तंव उघडे। पांच आथी॥ ३०५॥**
**येर आत्मतत्त्व उदासीन। तें ना हेतु ना उपादान। ना तें अंगें करी संवाहन। कर्मसिद्धीचें॥ ३०६॥**
**तेथ शुभाशुभीं अंशीं। निफजती कर्में ऐसीं। राती दिवो आकाशीं। जियापरी॥ ३०७॥**

**अर्थ**—तरी अर्जुना! खरोखर जेवढे सांगता येईल तेवढे सांगू. पण प्रीति तुला गहाण ठेवावी लागेल॥ ३०१॥ तेव्हा अर्जुन म्हणाला, देवा! मागील अभिप्राय विसरले की काय? कारण आपण या गोष्टीने मीतूपण जोपासत आहोत॥ ३०२॥ येथे श्रीकृष्ण म्हणतात, होय की, आता चांगले पुरेपूर लक्ष देऊन काय सांगतो ते ऐक॥ ३०३॥ तरी अर्जुना! सर्व कर्मांची उभारणी खरोखर पांच कारणांनी बाहेरच्याबाहेरच होत असते. (आत्म्याला त्याचा स्पर्शही नाही)॥ ३०४॥ आणि ज्या पांच कारणांच्या समुदायाने कर्मांची मांडणी होते त्याचे हेतुही स्पष्ट पांच आहेत॥ ३०५॥ येथे आत्मतत्त्व उदासीन आहे. ते कर्माचे ना निमित्त कारण आहे ना उपादान कारण आहे. किंवा कर्माच्या

सिद्धीकरिता ते अंगानेही झटत नाही ॥ ३०६ ॥ ज्याप्रमाणे आकाशात रात्र व दिवस होत असतात त्याप्रमाणे तेथे पुण्यरूप व पापरूप अंशाने कर्मे आत्म्याचे ठिकाणी होतात (भासत असतात) ॥ ३०७ ॥

**तोय तेज धूमु। ययां वायूसीं संगमु। जालिया होय अभ्रागमु। व्योम तें नेणे॥ ३०८॥**
**नाना काष्ठीं नाव मिळे। ते नावाडेनि चळे। चाळविजे अनिळें। उदक तें साक्षी॥ ३०९॥**
**का कवणें एकें पिंडें। वेंचितां अवतरे भांडें। मग भवंडीजे दंडें। भ्रमें चक्र॥ ३१०॥**
**आणि कर्तृत्व कुलालाचें। तेथ काय तें पृथ्वीयेचें। आधारावांचूनि वेंचे। विचारीं पां॥ ३११॥**
**हेंही असो लोकांचिया। राहाटी होतां आघविया। कोण काम सवितया। आंगा आलें॥ ३१२॥**
**तैसें पांचहेतुमिळणीं। पांचेंचि इहीं कारणीं। कीजे कर्मलतांचि लावणी। आत्मा सिना॥ ३१३॥**
**आतां येंचि वेगळालीं। पांचही विवंचूं गा भलीं। तुकोनि घेतलीं। मोतियें जैसीं॥ ३१४॥**

**अर्थ—**पाणी उष्णता व धूर यांची वायूशी मिळणी झाली असता मेघ येतात, पण आकाशाला त्याची वार्ताही नसते ॥ ३०८ ॥ किंवा लाकडापासून नाव तयार होते, नावाड्यामुळे ती सरकते, वायूचे साहाय्याने ती गति घेते. पाणी तेथे साक्षी (तटस्थ) असते ॥ ३०९ ॥ किंवा कोणता एक मातीचा गोळा चाकावर ठेवून दंडाने चाक फिरवून भांडे तयार होते. येथे कुंभाराचे कर्तृत्व आहे. पृथ्वीला येथे आधारावाचून काय श्रम पडले याचा विचार कर बरे ॥ ३१०-३११ ॥ हेही असो. लोकांचे सर्व व्यवहार होत असता सूर्याला कोणते काम अंगाने करावे लागले ॥ ३१२ ॥ त्याप्रमाणे पांच हेतूंची मिळणी झाली असता या पांच कारणांनी कर्मरूपी वेलीची लावणी होते. आत्मा निराळाच असतो ॥ ३१३ ॥ या कारण व हेतु यांच्या अनुक्रमें वेगळ्या वेगळ्या स्वरूपांचे आतां उत्तमप्रकारे विवरण करू. ज्याप्रमाणे मोत्यें वजन करून घेतली जातात ॥ ३१४ ॥

**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम्। विविधाश्च पृथक् चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम्॥ १४॥**

**अर्थ—**अधिष्ठान (इच्छा, द्वेष, सुख, दुःख ज्ञान इत्यादिकांच्या अभिव्यक्तीचा आश्रय तेच शरीर), कर्ता, निरनिराळी इंद्रिये, प्राणादि वायूंचे व्यापार व इंद्रियांच्या अधिष्ठात्री देवता, ही कर्माची पांच कारणे आहेत ॥ १४ ॥

**तैसीं यथालक्षणें। आइकें पांच कारणें। तरी देह हें मी म्हणें। पहिलें एथ॥ ३१५॥**
**ययातें अधिष्ठान ऐसें। म्हणिजे तें याचि उद्देशें। जे स्वभोग्येंसी वसे। भोक्ता येथ॥ ३१६॥**
**इंद्रियांच्या दाहें हातीं। जाचोनियां दिवोराती। सुखदुःखें प्रकृती। जोडीजती जियें॥ ३१७॥**
**तियें भोगावया पुरुखा। आन ठावोचि नाहीं देखा। म्हणोनि अधिष्ठानभाखा। बोलिजे देह॥ ३१८॥**
**हें चोविसांही तत्त्वांचें। कुटुंब घर वस्तीचें। तुटे बंधमोक्षाचें। गुंथाडें एथ॥ ३१९॥**
**किंबहुना अवस्थात्रया। हे अधिष्ठान धनंजया। म्हणोनि देहा यया। हेंचि नाम॥ ३२०॥**

**अर्थ—**त्याप्रमाणे पांच कारणे यथार्थ लक्षणासह ऐक. तरी देह हे पहिले कारण होय, असे मी म्हणतो ॥ ३१५ ॥ भोक्ता आपल्या भोग्यासहित येथे असतो, याच उद्देशाने याला अधिष्ठान असे म्हणतात ॥ ३१६ ॥ दहाही इंद्रियांना रात्रं दिवस राबवून जी सुखदुःखे प्रकृतीच्या बलाने प्राप्त होतात ॥ ३१७ ॥ ती सुखदुःखे भोगावयाला दुसरे स्थानच नसल्यामुळे या देहाला अधिष्ठान असे म्हणतात ॥ ३१८ ॥ या चोवीसही तत्त्वांच्या कुटुंबाचे राहण्याचे हे घर असून येथेच बंध व मोक्ष यांचा गुंता सुटला जातो ॥ ३१९ ॥ फार काय सांगावे अर्जुना! जागृति, स्वप्न सुषुप्ति या तीन अवस्थांचे हे ठिकाण आहे, म्हणून या देहाला अधिष्ठान हेच नाव साजेसे आहे ॥ ३२० ॥

**आणि कर्ता हे दुजें। कर्माचें कारण जाणिजे। प्रतिबिंब म्हणिजे। चैतन्याचें जें॥ ३२१॥**
**आकाशचि वर्षे नीर। तें तळवटीं बांधे नाडर। मग बिंबोनि तदाकार। होय जेवीं॥ ३२२॥**
**कां निद्राभरें बहुवें। राया आपणपें ठाउवें नव्हे। मग स्वप्नींचिये सामावे। रंकपणीं॥ ३२३॥**
**तैसें आपुलेंनि विसरें। चैतन्यचि देहाकारें। आभासोनि आविष्करे। देहपणें जें॥ ३२४॥**
**जया विचाराच्या देशीं। प्रसिद्धि गा जीव ऐसी। जेणें भाष केली देहेंसी। आघवाविषयीं॥ ३२५॥**

**प्रकृति करी कर्में। तीं म्यां केलीं म्हणे भ्रमें। येथ कर्ता येणें नामें। बोलिजे जीव॥ ३२६॥**

**अर्थ**—आणि ज्याला चैतन्याचे प्रतिबिंब म्हणजे जीव असे म्हणतात, तो कर्ता हे कर्माचे दुसरे कारण आहे. हे लक्षात घे॥ ३२१ ॥ आकाशातूनच पाऊस पडून सखोल जागेत डबके साचते. मग त्यात पडलेले त्याच आकाशाचे प्रतिबिंब तेवढ्याच (उबक्याच्याच) आकाराचे जसे होते॥ ३२२ ॥ किंवा निद्रेच्या ऐन भरात राजाला मी राजा आहे हे ठाऊक नसते (आपले राजेपण तो विसरतो). मग स्वप्नात तो मी दरिद्री झालो असा अनुभव घेतो॥ ३२३॥ त्याप्रमाणे आपल्या मूळ चैतन्यस्वरूपाचा विसर पडून देहाच्या आकाराने चैतन्यच भासते व तेच मी देह आहे या रूपाने प्रगट होते॥ ३२४॥ ज्याला विचाराच्या प्रान्तात म्हणजे वेदान्तशास्त्रात जीव अशी प्रसिद्धी असून सर्व विषयांच्या बाबतीत ज्याने देहाबरोबरच राहण्याचे वचन दिले आहे॥ ३२५॥ प्रकृती कर्मे करते. (पण) तो विपरीत समजुतीने, मी ती केली, असे म्हणतो. येथे कर्ता या नावाने जीवाला संबोधिले जाते॥ ३२६॥

**मग पातेयांच्या केशीं। एकीच उठी दिठी जैसी। मोकळी चवरी ऐसी। चिरीव गमे॥ ३२७॥**
**कां घरा आंतुल एकु। दीपाचा तो अवलोकु। गवाक्षभेदें अनेकु। आवडे जेवीं॥ ३२८॥**
**कां एकचि पुरुष जैसा। अनुसरत नवां रसां। नवविधु ऐसा। आवडों लागे॥ ३२९॥**
**तेवीं बुद्धीचें एक जाणणें। श्रोत्रादिभेदें येणें। बाहेरी इंद्रियपणें। फांके जें कां॥ ३३०॥**
**तें पृथक्विध करण। कर्माचें इया कारण। तिसरें गा जाण। नृपनंदना॥ ३३१॥**

**अर्थ**—पापण्यांच्या केसातून एकच दृष्टि निघते. ती मोकळीच स्वच्छ अशी दृष्टि समोरून पाहणाऱ्याला केसामुळे जशी चिरल्या सारखी (विभक्त झाल्यासारखी) वाटते॥ ३२७॥ किंवा घरातील एका दिव्याचा प्रकाश अनेक खिडक्यामुळे अनेकसा वाटतो॥ ३२८॥ किंवा एकच पुरुष नव रसांच्या आविष्काराने नऊ प्रकारचा जसा वाटू लागतो॥ ३२९॥ त्याप्रमाणे बुद्धीची जाणण्याची शक्ति एकरूप असली तरी या श्रोत्रादिज्ञानेंद्रियरूपाने विभक्त होऊन बाहेर निरनिराळ्या इंद्रियरूपाने ती प्रगट होते॥ ३३०॥ ती निरनिराळी इंद्रिये अर्जुना! हे कर्माचे तिसरे कारण होय, असे समज॥ ३३१॥

**आणि पूर्वपश्चिमवाहणीं। निघालिया वोघाचिया मिळणी। होय नदी नद पाणी। एकचि जेवीं॥ ३३२॥**
**तैसी क्रियाशक्ति पवनीं। असे जे अनपायिनी। ते पडिली नानास्थानीं। नाना होय॥ ३३३॥**
**जैं वाचे करी येणें। तैं तेंचि होय बोलणें। हाता आली तरी घेणें। देणें होय॥ ३३४॥**
**अगा चरणाच्या ठायीं। तरी गति तेचि पाहीं। अधोद्वारीं दोहीं। क्षरणें तेचि॥ ३३५॥**
**कंदौनि हृदयवरी। प्रणवाची उजरी। करितां तेचि शरीरीं। प्राणु म्हणिजे॥ ३३६॥**
**मग उर्ध्वींचिया रिगानिगा। पुढती तेचि शक्ति पैं गा। उदानु ऐसिया लिंगा। पात्र जाहली॥ ३३७॥**
**अधोरंध्राचेनि वाहें। अपानु हें नाम लाहे। व्यापकपणें होये। व्यानु तेचि॥ ३३८॥**
**आरोगिलेनि रसें। शरीर भरी सरिसें। आणि न सांडितां असे। सर्वसंधीं॥ ३३९॥**
**ऐसिया इया राहटीं। मग तेचि क्रिया पाठीं। समान ऐसी किरीटी। बोलिजे गा॥ ३४०॥**
**आणि जांभई शिंक ढेंकर। ऐसैसा होतसे व्यापार। नाग कुर्म कृकर। इत्यादि होय॥ ३४१॥**
**एवं वायूची हे चेष्टा। एकीचि परी सुभटा। वर्तनास्तव पालटा। येतसे जे॥ ३४२॥**
**ते भेदली वृत्तिपंथें। वायुशक्ति गा एथें। कर्मकारण चौथें। ऐसें जाण॥ ३४३॥**

**अर्थ**—पूर्वे कडून किंवा पश्चिमेकडून निघालेले पाण्याचे ओघ नदी असो की नद असो एके ठिकाणी मिळाले असता एक पाणीच होऊन जाते॥ ३३२॥ त्याप्रमाणे वायुमध्ये जी अखंड क्रियाशक्ति आहे ती निरनिराळ्या स्थानी पडल्यामुळे निरनिराळ्या प्रकारची होते॥ ३३३॥ जेव्हा ती क्रियाशक्ति वाचेच्या ठिकाणी येते तेव्हा तेथे बोलणे होते. हाताचे ठिकाणी येते तेव्हा घेण्यादेण्याचा व्यवहार होतो॥ ३३४॥ अर्जुना! ती पायाच्या ठिकाणी येते, पाहा, तेव्हा पायाला गती येते. खालच्या दोन द्वारात येते तेव्हा मल मूत्र विसर्जन होते॥ ३३५॥ नाभी पासून हृदयापर्यंत ॐकार

प्रगट करते. म्हणून शरीरामध्ये असणाऱ्या त्याच क्रियाशक्तीला प्राण म्हणतात॥ ३३६ ॥ पुढे तीच शक्ति वर जाते येते म्हणून उदान अशा संज्ञेस पात्र झाली॥ ३३७॥ खालच्या रंध्रातून वाहते तेव्हा अपान हे नाव प्राप्त होते. सर्व शरीरात व्यापून राहते तीच व्यान होय॥ ३३८ ॥ सेवन केलेल्या सर्व रसाने ती शक्ति शरीराचा कोणताही कानाकोपरा न सोडता सर्व शरीरभर पसरते व जी सर्व सांध्यांच्या ठिकाणी असते॥ ३३९ ॥ अर्जुना! अशा या व्यापारामुळे मग त्याच क्रियाशक्तीला समान असे म्हणतात. ॥ ३४० ॥ जांभई, शिंक, ढेंकर अशा तऱ्हेचे जे व्यापार होतात त्यांना नाग, कूर्म, कूकर इत्यादि संज्ञा अनुक्रमे प्राप्त होतात॥ ३४१ ॥ याप्रमाणे एकाच वायूचे हे व्यापार होत, पण अर्जुना! तिच्या निरनिराळ्या कार्यामुळे तिला निरनिराळेपण येतो॥ ३४२ ॥ येथे वायुशक्ति निरनिराळ्या कार्यामुळे भेदाला पावली. ते कर्माचे चौथे कारण होय, असे जाण॥ ३४३ ॥

**आणि ऋतु बरवा शारदु। शारदीं पुढती चांदु। चंद्रीं जैसा संबंधु। पूर्णिमेचा॥ ३४४॥**
**कां वसंतीं बरवा आरामु। आरामींही प्रियसंगमु। संगमीं आगमु। उपचारांचा॥ ३४५॥**
**नाना कमळीं पांडवा। विकासु जैसा बरवा। विकासींही यावा। परागाचा तो॥ ३४६॥**
**वाचे बरवें कवित्व। कवित्वीं बरवें रसिकत्व। रसिकत्वीं परतत्त्व। स्पर्शु जैसा॥ ३४७॥**
**तैसी सर्ववृत्तिवैभवीं। बुद्धिचि एकली बरवी। बुद्धीही बरव नवी। इंद्रियप्रौढी॥ ३४८॥**

**अर्थ**—सर्व ऋतूंमध्ये शरदऋतु, त्यात चंद्रप्रकाश व त्याला जशी पौर्णिमेची जोड असावी किंवा वसंतऋतूत उद्यान ह्यातही प्रेयसीचा सहवास व तेथे पुन: प्रणयाराधानाची जोड असावी किंवा अर्जुना! कमल असून ते उमलावे व त्यांतही मकरंदाचा बहर असावा. वाङ्मयात साहित्य, त्यात रसाळपणा व त्यातही आत्मानुभूतीची जोड असावी. त्याप्रमाणे अंत:करणात उठणाऱ्या सर्व वृत्तीत एकटी बुद्धिवृत्तिच चांगली व बुद्धीचाही सतेजपणा इंद्रियांच्या सामर्थ्यामुळे आहे॥ ३४४-३४८ ॥

**गूढार्थदीपिका**—श्रुतीने "यो बुद्धे: परतस्तु स:" व "दृश्यते त्वग्रया बुद्ध्या" असे सांगून बुद्धीचा अशुद्ध व शुद्ध स्वरूपाचे वर्णन केले आहे. आत्मस्वरूपाहुन भिन्न अशा निरनिराळ्या पदार्थांचा निश्चय करणारे चैतन्य म्हणजेच "अशुद्ध बुद्धि" होय. हिलाच "अव्यवसायात्मिका बुद्धि" ही म्हणतात, हिच्या पलीकडे आत्मस्वरूप आहे, हीच बुद्धि एका परमेश्वराशिवाय दुसरी वस्तु नाही असा निश्चय करते तेव्हा तिलाच "शुद्ध बुद्धि" किंवा "व्यवसायात्मिका बुद्धि" म्हणतात.

सर्व विपरीत समजुतीला किंवा भ्रमाला कारण ही अशुद्ध बुद्धिच आहे. तीच आत्मस्वरूपाचा विसर पाडून भिन्न-भिन्न पदार्थाचा निश्चय करणारी आहे. हीच शास्त्राच्या अध्ययनाने व श्रीगुरुच्या कृपाप्रसादाने भिन्न-भिन्न पदार्थाचा निश्चय सोडून देऊन जेव्हा एका परब्रह्माचाच निश्चय करते तेव्हा तीच परब्रह्मस्वरूप होते.

संसाराच्या खोड्यात अडकविणारी व त्यांतून मुक्त करणारी ही बुद्धिच असल्याकारणाने सर्व कारण पंचकात हिचे स्थान अनन्यसाधारण आहे, हे उघड आहे. व म्हणूनच माउली "तैसी सर्व वृत्तिवैभवी। बुद्धीची एकली बरवी" अशी तिची कीर्त्ती गात आहे.

**इंद्रियप्रौढीमंडळा। श्रृंगारु एकचि निर्मळा। जैं अधिष्ठात्रियां कां मेळा। देवतांचा जो॥ ३४९॥**
**म्हणूनि चक्षुरादिकीं दाहें। इंद्रियां पाठीं स्वानुग्रहें। सूर्यादिकां कां आहे। सुरांचें वृंद॥ ३५०॥**
**तें देववृंद बरवें। कर्मकारण पांचवें। अर्जुना एथ जाणावें। देवो म्हणे॥ ३५१॥**
**एवं माने तुझिये आयणी। तैसी कर्मजातांचि हे खाणी। पंचविध आकर्णीं। निरूपिली॥ ३५२॥**
**आतां हेचि खाणी वाढे। मग कर्माची सृष्टि घडे। जिहीं ते हेतुही उघडे। दाऊं पांचै॥ ३५३॥**

**अर्थ**—जेव्हा इंद्रियांना अधिष्ठान असणाऱ्या देवतांचा समूह अनुकूल असतो तेव्हाच इंद्रियसामर्थ्याला उत्तम शोभा येते॥ ३४९ ॥ म्हणून चक्षुरादि दहा इन्द्रिये आहेत व त्यांच्यावर अनुग्रह करणारे सूर्यादिक देवतांचे समुदाय आहेत॥ ३५० ॥ देव म्हणतात, अर्जुना! उत्तम अनुग्रह करणारे देवतांचे समुदाय ते येथे कर्माचे पांचवे कारण होय

असे जाण॥ ३५१ ॥ याप्रमाणे तुझ्या समजुतीला पटेल अशा रीतीने आम्ही सर्व कर्मे ज्यापासून उत्पन्न होतात अशी पांच प्रकारची कारणे सांगितली ती तू ऐकलीस॥ ३५२॥ ज्या हेतूने ही पांच कारणे वाढीला लागून मग कर्माची सृष्टी उत्पन्न होते ते पांच हेतुही स्पष्ट सांगू॥ ३५३ ॥

**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः। न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतवः॥ १५॥**

**अर्थ**—शरीराने, वाचेने, मनाने, शास्त्राला अनुसरून वा शास्त्रविरुद्ध जे कर्म मनुष्य करतो त्या कर्माचीही (ही वरील) पांच कारणे आहेत॥ १५॥

**तरी अवसांत आली माधवी। ते हेतु होय नवपल्लवीं। पल्लव पुष्पपुंज दावी। पुष्प फळातें॥ ३५४॥**
**कां वार्षिये आणिजे मेघु। मेघें वृष्टिप्रसंगु। वृष्टीस्तव भोगु। सस्यसुखाचा॥ ३५५॥**
**नातरी प्राची अरुणातें विये। अरुणें सूर्योदयो होये। सूर्यें सगळा पाहे। दिवो जैसा॥ ३५६॥**
**तैसें मन हेतु पांडवा। होय कर्मसंकल्पभावा। तो संकल्पु लावी दिवा। वाचेचा गा॥ ३५७॥**

**अर्थ**—अकस्मात् वसंतऋतु आला तर तो वृक्षवेलींना नवी पालवी फुटण्यास कारण होतो. पालवीपासून फुलांचे घोस व फुले फळांना प्रगट करतात॥ ३५४॥ किंवा वर्षाऋतु मेघांना घेऊन येतो मेघामुळे पाऊस पडतो व पावसापासून धान्यसुखाचा लाभ होतो॥ ३५५॥ किंवा पूर्व दिशेला अरुणोदय होतो. अरुणोदयाने सूर्यादय होतो. सूर्य उगवला की पूर्ण दिवस ज्याप्रमाणे प्रगट होतो॥ ३५६॥ त्याप्रमाणे कर्माचा संकल्प होण्यास मन हे कारण आहे. तो संकल्प (वाणीचा) वाचेचा दिवा लावतो-म्हणजे वाणीने शब्द प्रगट करण्यास कारणीभूत होतो॥ ३५७॥

**मग वाचेचा तो दिवटा। दावी कृत्यजातांचिया वाटा। तेव्हां कर्ता रिगे कामठां। कर्तृत्वाच्या॥ ३५८॥**
**तेथ शरीरादिक दळवाडें। शरीरादिकां हेतूचि घडे। लोहकाम लोखंडें। निर्वाळीजे जैसें॥ ३५९॥**
**कां तांथुवाचा ताणा। ताथु घालितां वैरणा। तो तंतूचि विचक्षणा। होय पट॥ ३६०॥**
**तैसें मनवाचादेहांचें। कर्म मनादि हेतुचि रचे। रत्नीं घडे रत्नाचें। दळवाडें जेवीं॥ ३६१॥**

**अर्थ**—मग वाणीचा तो दिवा आपल्याला जे कर्म करावयाचे त्या सर्वाचा मार्ग दाखवितो. तेव्हा कर्म करणारा कर्ता (हे मला कर्म करावयाचे आहे) या कर्तव्याच्या व्यापारात सापडतो॥ ३५८॥ त्याप्रमाणे शरीरादिक समूह शरीरादिकांना कारण होते. ज्याप्रमाणे लोखंडी घडकाम लोखंडाच्या घडणाने घडले जाते॥ ३५९॥ हे विचारशील अर्जुना! किंवा ताणलेल्या तंतूत तंतू आडवा घातला असता वस्त्र तयार होते॥ ३६०॥ जसे रत्नाचे पैलू रत्नानेच होतात, त्याप्रमाणे मन, वाणी, देह यांच्याकडून होणाऱ्या कर्माचे कारण मनादीकच आहेत॥ ३६१॥

**एथ शरीरादिकें कारणें। तेचि हेतु केवीं हें कोणें। अपेक्षिजे तरी तेणें। अवधारिजो॥ ३६२॥**
**आइका सूर्याचिया प्रकाशा। हेतु कारण सूर्युचि जैसा। कां ऊंसाचें कांडें ऊंसा। वाढी हेतु॥ ३६३॥**
**नाना वाग्देवता वानावी। तैं वाचाचि लागे कामवावी। कां वेदां वेदेंचि बोलावी। प्रतिष्ठा जेवीं॥ ३६४॥**
**तैसें कर्मा शरीरादिकें। कारण हें कीर ठाउकें। परी हेंचि हेतु न चुके। हेंही एथ॥ ३६५॥**

**अर्थ**—येथे कारण जे शरीरादिक तेच हेतु कसे, अशी शंका कोणी करील तर त्यांनी लक्ष देऊन ऐकावे॥ ३६२॥ ऐका सूर्याच्या प्रकाशाला जसा सूर्यच कारण आहे किंवा उसाच्या वाढीला उसाचे पेरे कारण आहेत॥ ३६३॥ किंवा वाग्देवतेची (सरस्वतीची) स्तुती करण्याकरिता वाणीलाच राबवावे लागते. किंवा ज्या प्रमाणे वेदाचे महत्त्व वेदानेच सांगावे लागते॥ ३६४॥ त्याप्रमाणे कर्माला शरीरादिक साधनभूत आहेत हे खरोखर माहित असले तरीपण हेच पाच त्याचे कारणही आहे हेही विसरू नकोस॥ ३६५॥

**आणि देहादिकीं कारणीं। देहादी हेतुमिळणीं। होय जया उभारणी। कर्मजातां॥ ३६६॥**
**तें शास्त्रार्थें मानिलेया। मार्गा अनुसरे धनंजया। तरी न्याय तो न्याया। हेतु होय॥ ३६७॥**
**जैसा पर्जन्योदकाचा लोटु। विपायें धरी साळीचा पाटु। तो जिरे परी अचाटु। उपयोगु आथी॥ ३६८॥**
**कां रोषें निघालें अवचटें। पडिलें द्वारकेचिया वाटे। तें शिणे परी सुनाटें। न वचती पदें॥ ३६९॥**

**तैसें हेतुकारणमेळें। उठी कर्म जें आंधळें। तें शास्त्राचे लाहे डोळे। तैं न्याय्य म्हणिपे॥ ३७०॥**

**अर्थ**—आणि देहादिक साधनभूत व देहादिक कारणे यांच्या संयोगाने ज्या सर्व कर्मांची मांडणी होते॥ ३६६॥ शास्त्रांत सांगितलेल्या मार्गाला अनुसरून जर ते कर्म, अर्जुना! घडले असेल तर ते पुण्य कर्म होय. तो पुण्यमार्गच पुण्यकर्माला कारण होतो॥ ३६७॥ ज्याप्रमाणे पावसाच्या पाण्याचा लोट धानाच्या शेतात जर का बांधाच्या रूपाने ते पाणी स्थिर होईल व ते पाणी तेथे जिरेल तर त्या पाण्याचा मोठाच उपयोग होईल (पाणी जिरल्यामुळे पीक भरारून येईल)॥ ३६८॥ किंवा रागाने घराबाहेर पडला व अकस्मात् द्वारकेच्या मार्गाला लागला तर शीण होईल, पण मार्ग चालणारी पाऊले वाया जाणार नाहीत (सार्थकी लागतील)॥ ३६९॥ त्याप्रमाणे साधन व कारण यांच्या संयोगाने जे कर्म घडेल त्याचे फळ जरी माहित नसले तरी शास्त्रवचनानुकूल ते घडले असल्यामुळे त्याला पुण्यकर्म म्हणावे॥ ३७०॥

**ना दूध वाढितां ठावो पावे। तंव उतोनि जाय स्वभावें। तोही वेंचु परी नव्हे। वेंचिलें तें॥३७१॥**
**तैसें शास्त्र साह्येंवीण। केलें नोहे जरी अकारण। तरी लागो कां नागवण। दानलेखीं॥ ३७२॥**
**अगा बावन्ना वर्णापरता। कोण मंत्रु आहे पांडुसुता। कां बावन्नही नुच्चारितां। जीवु आथी॥ ३७३॥**
**परी मंत्राची कडसणी। जंव नेणिजे कोदंडपाणी। तंव उच्चारफळ वाणी। न पवे जेवीं॥ ३७४॥**
**तेवीं कारणहेतुयोगें। जें बिसाट कर्म निगे। तें शास्त्राचिये न लगे। कांसे जंव॥ ३७५॥**
**कर्म होतचि असे तेव्हाही। परी तें होणे नव्हे पाहीं। तो अन्यायो गा अन्यायीं। हेतु होय॥ ३७६॥**

**अर्थ**—(अग्नीवर ठेवलेले दूध) दूध वाढता वाढता काठापर्यंत येऊन स्वाभाविकपणे ते उतू जाते. ते दूध खर्च झाले, पण ते योग्यपणे कारणी लागले असे म्हणता येणार नाही॥ ३७१॥ त्याप्रमाणे शास्त्रवचनाच्या साहाय्याशिवाय केलेले कर्म जर व्यर्थ म्हणू नये तर लुबाडल्या गेलेल्या धनाची दानात गणना करावी काय?॥ ३७२॥ अगा अर्जुना! बावन वर्णाच्या पलीकडे कोणता मंत्र आहे? व या बावनही वर्णांचा उच्चार करीत नाही असा कोण मनुष्य आहे॥ ३७३॥ पण हे अर्जुना! मंत्राचे रहस्य जोपर्यंत कळत नाही, तोपर्यंत वाणी मंत्रोच्चाराच्या फळाला जशी प्राप्त होत नाही॥ ३७४॥ त्याप्रमाणे साधन व कारण यांच्या मेळाव्याने जे अनियमित कर्म घडते ते जेव्हा शास्त्राच्या कसोटीला लागत नाही॥ ३७५॥ तेव्हाही ते कर्मच असले तरी ते न होण्यासारखेच आहे. ते पापकर्मच त्या पापकर्मरूपफळाला कारण आहे, पाहा!॥ ३७६॥

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः। पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः॥ १६॥**

**अर्थ**—असे जरी आहे, तरी, जो (देह म्हणजे आत्मा असे समजून) आत्म्याला कर्माचा कर्ता मानतो त्याची बुद्धि शुद्ध नसल्यामुळे त्या मूर्खाला आत्म्याचे खरे स्वरूप कळत नाही॥ १६॥

**एवं पंचकारणां कर्मा। पांचही हेतु हे सुमहिमा। आतां एथें पाहें पां आत्मा। सांपडला असे॥ ३७७॥**
**भानु न होनि रूपें जैसीं। चक्षुरूपातें प्रकाशी। आत्मा न होनि कर्मे तैसीं। प्रकटित असे गा॥ ३७८॥**
**पाहीं प्रतिबिंब आरिसा। दोन्ही न होनि वीरेशा। दोहींतें प्रकाशी जैसा। न्याहाळिता तो॥ ३७९॥**
**कां अहोरात्र सविता। न होनि करी पांडुसुता। तैसा आत्मा कर्मकर्ता। न होनी दावी॥ ३८०॥**

**अर्थ**—याप्रमाणे श्रेष्ठ महिमा असलेल्या अर्जुना! कर्माची पाच साधने व पाच कारणे आहेत. आता याठिकाणी कर्माच्या साधनात व कारणात आत्मा गोवला गेला आहे काय?॥ ३७७॥ सूर्य वस्तु न होता चक्षुरिंद्रियाला गोचर असणाऱ्या रूपाला जसा प्रकाशित करतो, त्याप्रमाणे आत्मा कर्मरूप न होता कर्माला प्रगट करतो॥ ३७८॥ हे वीर श्रेष्ठा अर्जुना! प्रतिबिंब व आरसा हे दोन्ही न होता पाहणारा ज्या दोघांनाही पाहतो॥ ३७९॥ किंवा अर्जुना! ज्याप्रमाणे सूर्य दिवस रात्र न होता त्याना उत्पन्न करतो त्याप्रमाणे आत्मा कर्म व कर्ता न होताच कर्मरूप भासतो॥ ३८०॥

**परी देहाहंमानभुली। जयाची बुद्धि देहींच आतली। जया आत्मविषयीं जाली। मध्यरात्री गा॥ ३८१॥**
**जेणें चैतन्या ईश्वरा ब्रह्मा। देहचि केलें परमसीमा। तया आत्मा कर्ता हे प्रमा। अलोट उपजे॥ ३८२॥**

**आत्माचि कर्मकर्ता। हाही निश्चयो नाहीं तत्त्वतां। देहोचि मी कर्मकर्ता। मानी तो साच॥ ३८३॥**
**जे आत्मा मी कर्मातीतु। सर्वकर्मसाक्षिभूतु। हे आपली कहीं मातु। नायकेचि कानीं॥ ३८४॥**

**अर्थ**—पण ज्याची बुद्धि मीच देहरूप आहे या अभिमानाने (आत्मस्वरूपाला) भुलून देहातच गुरफटली त्याला आत्मतत्त्वाविषयीं मध्यरात्री झाली म्हणजे मध्यरात्रीं जसा अंधार काळोख असतो तसे आत्मतत्त्वाविषयीं अंध:कार झाला॥ ३८१ ॥ ज्याने चैतन्य, ईश्वर, ब्रह्म यांना सरतेशेवटी देहाच्याच मर्यादेत आणून ठेवले त्याला आत्मा कर्ता आहे असेच अबाधित ज्ञान होते॥ ३८२ ॥ आत्माच कर्मकर्ता आहे हाही त्याचा खरा निश्चय नसतो. मी देहच वस्तुत: कर्माचा कर्ता आहे, असे तो मानतो॥ ३८३ ॥ मी आत्मस्वरूप आहे, कर्मातीत आहे, सर्वकर्माचा साक्षी आहे ही जी आपली स्वरूपस्थिति आहे, ती गोष्ट कधीही कानी येऊ देत नाही॥ ३८४॥

**म्हणोनि उमपा आत्मयातें। देहचिवरी मविजे एथें। विचित्र काई रात्रि दिवसातें। डुडुळ न करी॥ ३८५॥**
**पैं जेणें आकाशींचा कहीं। साचु सूर्य देखिला नाहीं। तो थिल्लरींचें बिंब काई। मानूं न लाहे॥ ३८६॥**
**थिल्लराचेनि जालेपणें। सूर्यासि आणि होणें। त्याच्या नाशीं नाशणें। कंपें कंपु॥ ३८७॥**
**अगा निद्रिता चेवो नये। तंव स्वप्न साच हों लाहे। रज्जु नेणतां सापा बिहे। विस्मो कवण॥ ३८८॥**
**जंव कवळ आथि डोळां। तंव चंद्रु देखावा कीं पिंवळा। काय मृगींही मृगजळा। भाळावें नाहीं॥ ३८९॥**
**तैसा शास्त्रगुरुचेनि नांवें। जो वाराही टेंकों नेदी सिंवे। केवळ मौढ्याचेनिचि जीवें। जियाला जो॥ ३९०॥**
**तेणें देहात्मदृष्टीमुळें। आत्मया घापे देहाचें जाळें। जैसा अभ्राचा वेगु कोल्हें। चंद्रीं मानी॥ ३९१॥**

**अर्थ**—म्हणून (अमर्याद) अशा आत्म्याला मर्यादित देहाच्या मापाने मोजतो (देहा पुरताच समजतो) यात आश्चर्य काय. घुबड दिवसाला रात्र करीत नाही काय? (घुबडाला दिवसा दिसत नाही)॥ ३८५ ॥ ज्याने आकाशात असलेला खरा सूर्य कधीच पाहिला नाही तो डबक्यात पडलेल्या सूर्याच्या प्रतिबिंबाला सूर्य मानीत नाही काय?॥ ३८६ ॥ डबक्यांत सूर्य दिसला तर सूर्य प्रगट झाला, डबक्यातील पाणी नाहीसे झाले तर सूर्य नाश पावला व पाण्याच्या कंपनाने सूर्य कंपन पावला असे तो समजतो॥ ३८७॥ निजलेल्याला जोपर्यंत जाग येत नाही तोपर्यंत त्याला स्वप्न खरे वाटते. दोरी न जाणता दोरीवर भासणाऱ्या सर्पाला भ्यावे यात आश्चर्य ते काय?॥ ३८८ ॥ किंवा जोपर्यंत कावीळ रोग आहे तोपर्यंत, चंद्र पिवळाच दिसावा. किंवा मृगांनी मृगजळाला (पाणीसमजून) फसू नये काय?॥ ३८९ ॥ त्याप्रमाणे जो शास्त्र व गुरु यांच्या नांवाचा वारा देखील गावाच्या शिवेवर टिकू देत नाही व जो मूर्खपणाच्या जिवानेच जगत असतो॥ ३९० ॥ ज्याप्रमाणे कोल्ह्याने अभ्राचा वेग चंद्राचे ठिकाणी मानावा, त्याप्रमाणे मोहामुळे देह हाच आत्मा आहे अशी दृष्टि ठेवून तो आत्म्याला देहाच्या जाळ्यात घालतो म्हणजे आत्म्यावर देहाचा आरोप करतो॥ ३९१ ॥

**मग तया मानणयासाठी। देहबंदिशाळे किरीटी। कर्माच्या वज्रगांठी। कळासे तो॥ ३९२॥**
**पाहें पां बंधभावना दृढा। नळियेवरी तो बापुडा। काय मोकळेयाही चवडा। न ठकेचि पुंसा॥ ३९३॥**
**म्हणोनि निर्मळे आत्मस्वरूपीं। जो प्रकृतीचें केलें आरोपी। तो कल्पकोडीच्या मापीं। मवीचि कर्मे॥ ३९४॥**

**अर्थ**—मग अर्जुना! त्या देहाला आत्मा मानल्यामुळे देहरूपीबंदीशाळेत कर्माच्या पक्क्या गांठीने तो कडसला जातो॥ ३९२ ॥ पाहा! नळीवर बसलेला पोपट पायाचा चवडा मोकळा असूनही बांधला गेलो आहे या दृढ भावनेने तो बिचारा फसत नाही काय?॥ ३९३ ॥ म्हणून जो प्रकृतीचे कर्म शुद्ध आत्मस्वरूपाच्या ठिकाणी आरोपीत करतो तो कल्पाच्या अनंत कालाच्या मापने कर्मे मोजतच बसतो॥ ३९४॥

**गूढार्थदीपिका**—आधार किंवा अधिष्ठानरूप असलेल्या सच्चिदानंदरूप परब्रह्माच्या स्वरूपाचा विसर पडल्यामुळे जीव मर्यादित अशा देहाशी तादात्म्य करतो व देहाकडून होणाऱ्या सर्व क्रियांचे कर्तृत्व चुकीने आपल्या ठिकाणी कसे ओढून घेतो याचे माउलींनी वरील ओव्यात सुंदर वर्णन केले आहे.

नित्य प्रकाशरूप असलेल्या सूर्याच्या प्रकाशाच्या ठिकाणी दिवस व रात्र या रूपांनी भावाभाव पाहणारा सूर्याहून

भिन्न असलेला माणूसच दिवस व रात्र या विषयी बोलू शकतो. सूर्याला मात्र दिवस रात्र यांच्या संबंधीची कसलीही कल्पना राहत नाही. दिवस व रात्र यांचे कर्तृत्व चुकीने सूर्यावर मनुष्य लादतो व सूर्य हा दिवस व रात्र या कल्पनांना केवळ आधार होतो. त्याला त्या दोन्ही गोष्टींचा गंधही राहत नाहीं.

आत्मस्वरूप देखील सूर्याप्रमाणे नित्य ज्ञानस्वरूप आहे. म्हणजेच त्याला आपल्या सच्चिदानंद स्वरूपाची कधीही विस्मृति होत नाही. पण त्याचेच स्फुरण असलेला जीव मात्र ही गोष्ट विसरला जाऊन चुकीने मर्यादित अशा देहाशी तादात्म्य करून आपल्या अमर्यादित अशा स्वरूपाला मर्यादित समजूं लागतो. व देहाचे अर्थातच सर्व धर्म आपल्यावर ओढून घेतो. या मर्यादित त्याच्या जाणीवेमुळेच देश, काॅल, वस्तुत्व यांचा त्रिविध परिच्छेद त्याला भासू लागतो. कर्म, कर्ता, क्रिया हे भाव त्यातूनच उत्पन्न होतात. हेच चुकीचे किंवा विपरीत ज्ञान होय. शास्त्र व गुरु यांचा संबंध झाला असता हे विपरीत ज्ञान नाहीसे होऊन तो आपल्या मूळ स्वरूपाला प्राप्त होऊ शकतो असे माउलींनी येथे सुचविले आहे.

**आतां कर्मामाजीं असे। परी तयातें कर्म न स्पर्शे। वडवानळातें जैसें। समुद्रोदक॥ ३९५॥**
**तैसेनि वेगळेपणें। जयाचें कर्मीं असणें। तो कीर ओळखावा कवणें। तरी सांगों॥ ३९६॥**
**जे मुक्तातें निर्धारितां। लाभे आपलीच मुक्तता। जैसी दीपें दिसे पाहतां। आपली वस्तु॥ ३९७॥**
**ना तरी आरिसा जंव उटिजे। तंव आपणपयां आपण भेटिजे। कां पाणी पावतां पाणी होइजे। लवणें जेवीं॥ ३९८॥**
**हें असो परतोनि मागुतें। प्रतिबिंब पाहे बिंबातें। तंव पाहणें जाउनी आयितें। बिंबचि होय॥ ३९९॥**
**तैसें हारपलें आपणपें पावे। तैं संतांतें पाहातां गिंवसावें। म्हणोनि वानावे ऐकावे। तेचि सदा॥ ४००॥**

**अर्थ—**आता समुद्राचे पाणी जसे वडवाग्नीला स्पर्श करीत नाही, त्याप्रमाणे तो (आत्मा) कर्मामध्ये असतो परंतु त्याला कर्म स्पर्श करीत नाही. तसे वेगळेपणाने ज्याचे कर्मामध्ये असणे असते तो खरोखर कसा ओळखावा ते सांगतो॥ ३९५-३९६॥ ज्याप्रमाणे दिव्याने पाहिले असता अंधारात ठेविली असलेली आपली वस्तु सापडते त्याप्रमाणे ज्ञान्यांच्या लक्षणांचा किंवा त्यांच्या स्वरूपाचा निर्धार केला असता आपलीच मुक्तता प्राप्त होते॥ ३९७॥ किंवा जितका जितका आरसा स्वच्छ करावा तितके तितके आपले स्वच्छ स्वरूप त्यात दिसते. किंवा मीठ पाण्याला मिळाले असता मीठ पाणीरूप होऊन जाते॥ ३९८॥ हे असो. प्रतिबिंब मागे फिरून बिंबाला पाहील तर पाहणेपणा नाहीसा होऊन आयता ते बिंबच होईल॥ ३९९॥ त्याप्रमाणे आपली विसरलेली मूळ स्वरूपस्थिति आपल्याला प्राप्त व्हावी अशी जर इच्छा असेल तर संतांचा कित्ता पुढे ठेवून त्यांचीच कीर्ति नेहमी वर्णन करावी व श्रवण करावी॥ ४००॥

**गूढार्थदीपिका—म्हणोनि वानावे ऐकावे। तेचि सदा॥**

"आम्ही संत म्हणूं तया अवघी देवावरी माया" (तु० गा०) "माझ्या स्वरूपींच ज्याचे चित्त। अखंड जडलें भजनयुक्त। त्यासीच बोलिजे मद्भक्त। तेचि संतसज्जन" (ए० भा०) अद्वैतज्ञान प्राप्त होऊन सगुण भगवंताच्या ठिकाणी अखंड प्रेम ठेवणाऱ्याला संत म्हणतात अशी संताची व्याख्या श्रीं तुकाराम महाराज व नाथादि संतांनी केली आहे. ज्याच्या अहंतेचा व ममतेचा विषय एक सगुण भगवानच झाला आहे. त्यांना सर्व कर्मे करताना एका भगवंताशिवाय दुसरे काहीही अनुभवास येत नाही. त्यांच्या ठिकाणी ब्रह्मभाव पूर्णपणे बाणलेला असतो. एका ब्रह्मरूपभगवंताशिवाय दुसरा कोणताहीं संकल्प त्यांच्या मनात उठत नाही. त्यांच्याकडून होणारी सर्व कर्मे ब्रह्मरूपच होतात "ब्रह्मरूपाची ती कर्मे ब्रह्मरूप। अविकल संकल्प होती जाती" (तु० गा०)

अंधारात मार्गदर्शन करणारा जसा दिवा असावा त्याप्रमाणे आत्मस्वरूपाची ओळख करून देणारे ज्ञानीभक्त दीपस्तंभाप्रमाणेच आहेत. त्यामुळे त्या मुक्त पुरुषांचा विचार करणे म्हणजेच आपण आपल्या मुक्त स्वरूपाचा विचार करणे होय; हे वरील ओवी ३९७ मध्ये माउलींनी म्हटलेच आहे.

"ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति" या श्रुतीत सांगितल्या प्रमाणे ब्रह्मनिष्ठ भगवद्भक्त म्हणजे साकार परब्रह्मच होय.

या ब्रह्मनिष्ठ संतांच्या ठिकाणी अवतारा प्रमाणेच देहदेही भाव राहत नाही. ते देहासह सच्चिदानंदरूप असतात, त्यांचा प्रत्येक शब्द वेदवाणीच असतो "तयाचे बिसाट शब्द। का न सुखे म्हणों येती वेद। सदेह सच्चिदानंद। कां न होवावे ते" असे पुढे याच अध्यायात श्री माउलींनी म्हटले आहे.

अशा या सगुण साकार परब्रह्मरूप असलेल्या संताच्या ठिकाणी आपली प्रीति जडल्यास तीच आत्मस्थिति आपल्याही ठिकाणी कां बाणली जाणार नाही!

संताच्या चरित्राचे वर्णन केल्याने किंवा त्याचे श्रवण केल्याने त्यांच्या विषयी आपल्या अंत:करणात प्रीतीचा उमाळा निर्माण होतो व मनात त्यांची मूर्ति हळू हळू स्थिरावू लागते. मनात त्यांचे ध्यान वाणीने त्यांचे नामस्मरण होत राहते. अंत:करणाला अशा रीतीने त्यांचाच सारखा ध्यास लागतो. संतही प्रेमाचे सागर असल्यामुळे तेही आपल्या प्रेमाचा प्रवाह आपल्याकडे वळवितात. व आपल्याविषयी उत्पन्न झालेल्या कळवळयाने ते जेव्हा उपदेश करतात. तेव्हा त्या उपदेशात त्यांच्या शक्तीचा पात होत असल्याकारणाने आपल्या अंत:करणात दृढ ब्रह्मबोध ठसतो. मन निर्विकल्प होत जाते व विषयांचा विचारही मनाला शिवत नाही. अशारीतीने आपणही त्यांच्या प्रेमात वाहून जाऊ लागतो. प्रेमाच्या चढत्या श्रेणीत प्रेमाची जेव्हा अत्यंत तीव्र अशी अवस्था निर्माण होते, तेव्हा सर्व जगच संतमय वाटू लागते. संताचे व्यापक स्वरूप अशा रीतीने ध्यानात येताच तेच ज्ञान निर्विकल्प ज्ञानात परिणत होते व त्यांच्या विषयींचे असीम प्रेम पराप्रीतीत परिणत होते, माउलीविषयी नामदेव तुकारामादि संतांनी काढलेले उद्धार यादृष्टीने पाहण्यासारखे आहे.

"तिन्ही देव जैसे परब्रह्मीचे ठसे" (नाम० गा०) ज्ञानियाचा गुरु स्वामी महाराज। म्हणतो ज्ञानराज तुम्हा ऐसे "ब्रह्मादिकां जेथे तुम्हा ओळगण। इतका तुळण काय तेथे" (तु० गा०)

**परी कर्मी असोनि कर्में। जो नावरे समें विषमें। चर्मचक्षूंचेनि चामें। दृष्टि जैसी॥ ४०१॥**
**तैसा सोडवला जो आहे। तयाचें रूप आतां पाहें। उपपत्तीची बाहे। उभऊनि सांगो॥ ४०२॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे चर्मचक्षूच्या कातड्यामुळे दृष्टि लिप्त होत नाही (अडसर निर्माण न होता ती मोकळीच राहते) त्याप्रमाणे कर्म करून देखील बऱ्यावाईट कर्माने तो गुरफटला जात नाही॥ ४०१ ॥ अशा रीतीने जो कर्मापासून सुटला आहे त्याचे स्वरूप उपपत्तीची भुजा उभारून (कार्यकारण संबंध दाखवून) सांगतो ते पाहा॥ ४०२ ॥

**यस्य नाहङ्कृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते। हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते॥ १७॥**

**अर्थ**—ज्याच्याठिकाणी अहंभाव नाही व ज्याची बुद्धी महणजे अन्त:करण लिप्त होत नाही त्याने लोकांचा वध करूनही तो (वस्तुत:) वध (म्हणून) करीत नाहीं व त्या कर्माने तो बद्ध होत नाही॥ १७॥

**तरी अविद्येचिया निदा। विश्वस्वप्नाचा हा धांदा। भोगीत होता प्रबुद्धा। अनादि जो॥ ४०३॥**
**तो महावाक्याचेनि नांवें। गुरुकृपेचेनि थांवें। माथां हातु ठेविला नव्हे। थापटिला जैसा॥ ४०४॥**
**तैसा विश्वस्वप्नेंसी माया। नीद सांडूनि धनंजया। सहसा चेइला अद्वया-। नंदपणें जो॥ ४०५॥**

**अर्थ**—हे सूज्ञ अर्जुना! जो अज्ञानाच्या झोपेत विश्वाच्या घडमोडीचे स्वप्न अनादिकालापासून अनुभवित होता॥ ४०३ ॥ तो (तत्त्वमस्यादि) महावाक्याच्या बोधाने व श्री गुरुच्या कृपेच्या बलाने, मस्तकावर हात ठेऊन थापटल्यामुळे नव्हे, अर्जुना! बिना सायास विश्वाच्या स्वप्नासह अज्ञानाची झोप टाकून देऊन अद्वैतभावाच्या आनंदाने जागा झाला॥ ४०४-४०५ ॥

**तेव्हां मृगजळाचे पूर। दिसते एक निरंतर। हारपती कां चंद्रकर। फांकता जैसें॥ ४०६॥**
**कां बाळत्व निघोनि जाय। तैं बागुला नाहीं त्राय। पैं जळालिया इंधन न होय। रंधन जेवीं॥ ४०७॥**
**नाना चेवो आलिया पाठीं। तैं स्वप्न न दिसे दिठी। तैसी अहंममता किरीटी। नुरेचि तया॥ ४०८॥**

**अर्थ**—त्यावेळी ज्याप्रमाणे चंद्राची किरणे फाकताक्षणीच एकसारखे दिसणारे मृगजळाचे पूर नाहीसे होतात॥ ४०६ ॥ किंवा बालपण निघून गेल्यावर ज्याप्रमाणे बागुलबोवाचे (भीतीचे) सामर्थ्य राहत नाही किंवा

लाकूड जळून गेल्यावर ज्याप्रमाणे स्वयंपाक होऊ शकत नाही॥ ४०७॥ किंवा जागृतीत आल्यानंतर ज्याप्रमाणे दृष्टीला स्वप्न पडत नाही त्याच प्रमाणे, अर्जुना! अहंता व ममता त्याचे ठिकाणी राहत नाही॥ ४०८॥

**मग सूर्य आंधारालागी। रिघो का भलते सुरंगी। परी तो तयाच्या भागीं। नाहींचि जैसा॥ ४०९॥**
**तैसा आत्मत्वें वेष्टिला होये। तो जया तया दृश्यातें पाहे। ते दृश्य द्रष्टेपणेंसीं होत जाये। तयाचेचि रूप॥ ४१०॥**

**अर्थ**—मग सूर्य अंधार पाहण्यासाठी कोणत्याही भुयारात प्रवेश करनो का? तो अंधार कधी त्याच्या वाट्याला येतच नाही॥ ४०९॥ त्याप्रमाणे आत्मभावाने व्यापलेला ज्ञानी असलेले जे जे दृश्य पाहील ते ते सर्व दृश्य त्याला। त्याचे स्वत:चे द्रष्टृस्वरूप भासत जाईल किंवा तो पाहील॥ ४१०॥

**गूढार्थदीपिका—तैसा आत्मत्वें वेष्टिला होये।**

भोक्ता-भोग्य व द्रष्टा-दृश्य यांचे ज्ञानाच्या भूमिकेवरून विचार करता द्वैत राहत नाही. म्हणजे भोक्ता व भोग्य किंवा द्रष्टा व दृश्य यांच्या भिन्न सत्ता किंवा यांचे भिन्न वस्तुत्व भासत नाही. हे दोन्ही ही एका वस्तूचे तुकडे किंवा भाग नसून एक अफूट वस्तुच आपल्या प्रेमाकरिता एकाच सत्तेवर स्फुरण पावत असल्यामुळे दोन रूपाने भासते एवढेच. प्रेमामुळेच त्यांच्या दोनपणाचे ज्ञानही होत नाही. व दोनपणाचे ज्ञान होत नाही म्हणूनच त्यांच्यातील दोनपणातही एकच वस्तु (सच्चिदानंद ब्रह्म) आपले एकपण कायम ठेऊन दृष्टा-दृश्य किंवा भोक्ता भोग्य भावाने क्रीडा करते.

अज्ञानदशेत दृश्याला आपल्याहून भिन्नपणाने पाहत असता जी दृश्याची जाणीव होत होती ती ज्ञानानंतर उत्पन्नच होत नाही. अज्ञानदशेत द्रष्टा चेतन, दृश्य जड असा भेद असतो. म्हणूनच मी दृश्य पाहिले अशी जाणीव उत्पन्न होऊ शकते. पण ज्ञानदृष्टीने जेव्हा द्रष्टा-दृश्यही आत्मस्वरूपाने म्हणजे आपल्याच स्वरूपाचे पाहतो, तेव्हा तो जाणीवस्वरूप द्रष्टा आत्म्याच्या नित्यज्ञानदृष्टीशी ऐक्य पावून तोही नित्यज्ञान दृष्टिस्वरूपच होऊन जातो. जडरूप दृश्याचा भास संपूर्णपणे मावळून जातो.

आता आत्मा स्वसंवेद्य आहे तर मग आपली जाणीव उत्पन्न होणार नाही काय? हा प्रश्न उत्पन्न होतो. तर त्याचे उत्तर असे आहे की नित्यज्ञानस्वरूप असलेल्या आत्म्याला त्याची जाणीव उत्पन्न होण्याचे कारणच नाही. जाणीव ही द्वैतातच उत्पन्न होते. जीवब्रह्मैक्याची जाणीव देखील द्वैताचा भास राहतो म्हणूनच होते. द्वैताचा भास निवृत्त होऊन स्वाभाविक मूळची ऐक्य स्थिति प्राप्त झाली म्हणजे जीव ब्रह्मैक्याची जाणीव स्फुरणेही बंद पडते.

द्रष्टा दृश्यरूपाने स्फुरणे हा आत्म्याच्या स्वभावच असल्यामुळे स्वभावाची जाणीव वस्तूला कधी होत नाही, हा भाव.

माउलींनी अमृतानुभवाच्या सातव्या प्रकरणात हाच अर्थ स्पष्ट केला आहे. माउली म्हणते.

कल्लोळ जळीं धातलें। सोनेनि सोनें पांघरलें। दिठीचे पाय गुंतले। दिठीसीचि॥ २४७॥ श्रुतीसी मेळविली श्रुती। दृतीसी मेळविली दृती। कां जे तृप्तीसी तृप्ती। वोगरली॥ २४८॥ हा येणें पाहिला ऐसा। कांहीं न पाहिला जैसा। आणि न पाहताही आपैसा। पाहणेंचि हा॥ २५१॥

**जैसा वन्हि जया लागे। तें वन्हिचि जालिया आंगें। दाह्यदाहकविभागें। सांडिजे तें॥ ४११॥**
**तैसा कर्माकारा दुजेया। तो कर्तेपणाचा आत्मया। आळु आला तो गेलिया। कांहीं बाहीं जें उरे॥ ४१२॥**
**तिये आत्मस्थितीचा जो रावो। मग तो देहीं इये जाणेल ठावो। काय प्रलयांबूचा उन्नाहो। वोघु मानी॥ ४१३॥**
**तैसी ते पूर्ण अहंता। काई देहपणें पांडुसुता। आवरे काई सविता। बिंबें धरिला॥ ४१४॥**
**पै मथूनि लोणी घेपे। तें मागुती ताकीं घापे। तरी तें अलिप्तपणें सिंपे। तेणेंसीं काई॥ ४१५॥**
**नाना काष्ठौनी वीरेशा। वेगळाविलियां हुताशा। राहे काष्ठाचिया मांदुसा। कोंडलेपणें॥ ४१६॥**
**कां रात्रीचिया पोटाआंतु। निगाला जो हा भास्वतु। तो रात्री ऐसी मातु। ऐके कायी॥ ४१७॥**
**तैसें वेद्य वेदकपणेंसी। पडिलें कां जयाचे ग्रासीं। तया देह मी ऐसी। अहंता कैंची॥ ४१८॥**

**आणि आकाशें जेथें जेथुनी। जाइजे तेथ असे भरोनि। म्हणोनि ठेलें कोंदोनि। आपेंआप॥ ४१९॥**
**तैसें जें तेणें करावें। तो तेंचि आहे स्वभावें। मा कोणें कर्मीं वेष्टावें। कर्तेपणें॥ ४२०॥**
**नुरेचि गगनावीण ठावो। नोहेचि समुद्रा प्रवाहो। नुठीचि ध्रुवा जावों। तैसें जाहालें॥ ४२१॥**
**ऐसेनि अहंकृतिभावो। जयाचां बोधीं जाहाला वावो। तऱ्ही देहा जंव निर्वाहो। तंव आथी कर्मे॥ ४२२॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे अग्नि ज्याला ग्रासतो तो पदार्थ सर्वांगाने अग्निरूपच झाल्यामुळे दाह्य व दाहक (जाळणारा अग्नि व जळली जाणारी वस्तु) हा विभाग उरू देत नाही॥ ४११॥ त्याप्रमाणे आत्म्याहून भिन्न असलेल्या कर्मामुळे आत्म्याच्या ठिकाणी जो कर्तेपणाचा आरोप आला होता तो नाहिसा झाल्यावर जे काही अवशिष्ट राहते॥ ४१२॥ अशा आत्मस्थितीवर जो आरूढ झाला तो या देहापुरतेच आपल्याला समजेल काय? प्रलयसागराची भरती (प्रलयजलाचा तांडव करणाऱ्या ऊर्मी) स्वत:ला ओहोळ समजतील काय?॥ ४१३॥ त्याप्रमाणे मीच सर्व ब्रह्मरूप आहे ही व्यापक ज्ञानाहंता देहभावाने सिमित होईल काय? सूर्य काय आपल्या बिंबापुरताच मर्यादित होईल?॥ ४१४॥ ताक घुसळल्यावर लोणी काढून घेऊन ते पुन: ताकात घातले तरी ते ताकात एकरूप होऊन मिसळेल काय?॥ ४१५॥ हे वीरश्रेष्ठा! अथवा लाकडातून अग्नि मंथन करून वेगळा केलां असता तो काय लाकडाच्या पेटीत कोंडून राहतो.॥ ४१६॥ किंवा रात्रीच्या पोटात शिरलेला सूर्य रात्री नावाची गोष्ट आहे असे ऐकेल काय?॥ ४१७॥ त्याप्रमाणे जाणली जाणारी वस्तु व जाणणारा (ज्ञेय व ज्ञाता) यांचा ज्याठिकाणी एकच घास झाला (ऐक्य झाले) त्याच्या ठिकाणी 'मी देह' ही अहंता कोठून असणार!॥ ४१८॥ आणि आकाशाने जेथून जेथे जावे तेथे ते सारखे भरलेलेच असते. कारण ते स्वभावत:च सर्वत्र गच्च भरून असते.॥ ४१९॥ त्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाने जे जे करावे ते ते स्वभावत: त्याचेच रूप आहे. मग कोणत्या कर्माने कर्तेपणाच्या अभिमानाने त्याने गुंतावे (कोणत्या कर्माचा त्याने कर्तेपणा घ्यावा)॥ ४२०॥ अवकाशाला ज्याप्रमाणे दुसरे वसतिस्थान नसते, किंवा समुद्राला ज्याप्रमाणे प्रवाह नसतो किंवा ध्रुवाला ज्याप्रमाणे गती नसते त्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाची स्थिति असते (ज्ञानीपुरुष आत्मनिष्ठ असतो)॥ ४२१॥ अशा रीतीने आत्मबोधामुळे ज्याचा अहंकार व्यर्थ झाला (संपूर्ण नाहिसा झाला) तरी त्याचा देह आहे तोपर्यंत त्याच्याकडून कर्मे होतच असतात॥ ४२२॥

**गूढार्थदीपिका**—क्रिया किंवा गती दोन वस्तूंची कल्पना केल्याशिवाय संभवत नाही. अत्यंत व्यापक असलेल्या आकाशाला राहण्याचे ठिकाण आकाशाशिवाय दुसरे नसते. सर्व प्रवाह ज्याठिकाणी मिळतात त्या समुद्राचा प्रवाह, कसा निर्माण होणार? ध्रुव म्हणजेच निश्चळ. त्याला गती कशी येणार? त्याचप्रमाणे ज्ञानीपुरुष आकाशापेक्षाही व्यापक असलेल्या ब्रह्माशी एकरूप होत असल्यामुळे त्याच्याठिकाणी इतरांना भासणारे कर्मादी भाव त्याच्या ज्ञानात केवळ ब्रह्मरूप असतात. त्याच्या ठिकाणी अज्ञानाच्या ठिकाणी उठणारा त्रिपुटीचा भाव केव्हाही उमटत नाही. प्रारब्धाने त्याच्याकडून सर्व कर्मे होत असली तरी कर्मादी सर्व त्याला आपला स्वभावच म्हणजे चिन्मात्रस्वरूपच आहे असे वाटते, हा भाव.

**अगा वारा जरी वाजोनि वोसरे। तरी तो डोल रुखीं उरे। कां सेंदें द्रुति राहे कापुरें। वेंचलेनी॥ ४२३॥**
**कां सरलेया गीताचा समारंभु। न वचे राहवलेपणाचा क्षोभु। भूमी लोळोनी गेलिया अंबु। वोल थारे॥ ४२४॥**
**अगा मावळलेनि अर्कें। संध्येचिये भूमिके। ज्योतिदीप्ती कौतुकें। दिसे जैसी॥ ४२५॥**
**पैं लक्ष भेदिलियाहीवरी। बाण धांवेचि तंववरी। जंव भरली आथी उरी। बळाची तया॥ ४२६॥**
**नाना चक्रीं भांडें जालें। तें कुंलालें परतें नेलें। परी भ्रमेचि तें मागिले। भोवंडिलेपणें॥ ४२७॥**
**तैसा देहाभिमान गेलिया। देह जेणें स्वभावें धनंजया। जालें तें आपैसया। चेष्टवीच तें॥ ४२८॥**
**संकल्पेंवीण स्वप्न। न लावितां दांगीचें बन। न रचितां गंधर्वभुवन। उठी जैसें॥ ४२९॥**
**आत्मयाचेनि उद्यमेंवीण। तैसें देहादि पंचकारण। होय आपणयां आपण। क्रियाजात॥ ४३०॥**
**पैं प्राचीनसंस्कारशेषें। पांचही कारणें सहेतुकें। कामवीजती गा अनेकें। कर्माकारें॥ ४३१॥**

**अर्थ**—सोसाट्याने वाहणारा वारा जरी थांबला तरी झाडांच्या ठिकाणी हालचाल चालूच राहते. किंवा कापूर संपून गेला तरी करंड्याला सुगंध येतच असतो॥ ४२३॥ किंवा गाण्याची मैफल संपल्यानंतर गाण्याच्या तंद्रीचा भर संपत नाही. किंवा जमिनीवर सांडलेले पाणी निघून गेले तरी ओलेपणा कायम असतो॥ ४२४॥ सूर्य मावळल्यावर संध्याकाळी जशी सूर्याची प्रभा कौतुकवश दिसतच राहते॥ ४२५॥ जोपर्यंत बाणामध्ये वेगसामर्थ्य उरले असते तोपर्यंत तो बाण लक्ष्याचा वेध केल्यानंतरही ज्याप्रमाणे पुढे जातच असतो॥ ४२६॥ किंवा चाकावरील भांडे तयार झाल्यावर कुंभाराने ते काढून घेतले तरी चाकाचे गरगर फिरणे ज्याप्रमाणे पूर्वीच्या गतीमुळे चालूच राहते॥ ४२७॥ त्याप्रमाणे देहाचा अभिमान नाहीसा झाल्यावरही, अर्जुना! ज्या प्रकृतिगुणाने देह निर्माण झाला ते देहाकडून कर्मे घडवीत असतात॥ ४२८॥ कोणत्याही प्रकारे मनात इच्छा नसता जसे स्वप्न पडते किंवा रोपणी शिवाय झाडे लागतात किंवा आकाशात गंधर्वनगराची रचना न करताच ते निर्माण होतात॥ ४२९॥ त्याप्रमाणे आत्म्याकडून कोणताही उद्योग न होता देहादी पांच कारणामुळे' आपोआप सर्व कर्मे घडतात॥ ४३०॥ शिल्लक राहिलेल्या पूर्व जन्मीच्या संस्कारामुळे पांचही कारण व साधने अनेक प्रकारची कर्मे करवितात॥ ४३१॥

**तया कर्मामाजीं मग। संहरो आघवें जग। अथवा नवें चांग। अनुकरो॥ ४३२॥**
**परी कुमुद कैसेनि सुके। तें कमळ कैसें फाकें। हीं दोन्हीं रवी न देखे। जयापरी॥ ४३३॥**
**का वीजु वर्षोनि आभाळ। ठिकरिया आतो भूतळ। अथवा करू शाड्वळ। पर्जन्यवृष्टी॥ ४३४॥**
**परी तया दोहींतें जैसें। नेणिजेचि कां आकाशें। तैसा देहींच जो असे। विदेहदृष्टी॥ ४३५॥**
**तो देहादिकी चेष्टीं। घडतां मोडतां हे सृष्टी। न देखे स्वप्न किरीटी। चेइला जैसा॥ ४३६॥**
**एऱ्हवीं चामाचे डोळेवरी। जे देखती देहचिवरी। ते कीर तो व्यापारी। ऐसेंचि मानिती॥ ४३७॥**

**अर्थ**—त्या कर्मामध्ये सर्व जगाचा नाश होवो अथवा नवीन चांगले जग उत्पन्न होवो॥ ४३२॥ कमल कसे सुकते किंवा ते कसे उमलते ह्या दोन्हीही गोष्टी ज्याप्रमाणे सूर्य जाणत नाही॥ ४३३॥ वीज पडून जमिनीचे तुकडे होवोत अथवा पाऊस पडून हिरवळ निर्माण होवो ह्या दोन्ही गोष्टी आकाश ज्याप्रमाणे जाणत नाही, त्याच प्रमाणे देहात असूनच जो देहाभिमानरहित असतो॥ ४३४-४३५॥ ज्याप्रमाणे स्वप्नातून जागा झालेला स्वप्नातील जगत पाहत नाही त्याप्रमाणे देहादिकांकडून घडलेल्या क्रियांनी सृष्टी निर्माण झाली किंवा नाश पावली हे तो जाणत नाही॥ ४३६॥ एऱ्हवी जे देहपणाने मर्यादित अशा स्थूल दृष्टीने त्याला पाहतात तेच तो कर्म करणारा कर्ता आहे असे समजतात॥ ४३७॥

**कां तृणाचा बाहुला। जो आगरामेरे ठेविला। तो साचचि राखता कोल्हा। मानिजे ना॥ ४३८॥**
**पिसें नेसलें कां नागवें। हें लोकीं येऊनि जाणावें। ठाणोरियाचे मवावे। आणिकीं घाय॥ ४३९॥**
**का महासतीचे भोग। देखे कीर सकळ जग। परी ते आगी ना आंग। ना लोकु देखे॥ ४४०॥**
**तैसा स्वस्वरूपें उठिला। जो दृश्येंसी द्रष्टा आटला। तो नेणे काय राहटला। इंद्रियग्रामु॥ ४४१॥**
**अगा थोरी कल्लोळीं कल्लोळ साने। लोपतां तिरींचेनि जनें। एकीं एक गिळिलें हें मनें। मानिजे जऱ्हीं॥ ४४२॥**
**तऱ्ही उदकाप्रति पाहीं। कोण ग्रसितसे काई। तैसें पूर्णा दुजें नाहीं। जें तो मारी॥ ४४३॥**

**अर्थ**—शेताच्या कडेला ठेवलेले गवताचे बाहुल्याला हा खराच शेताचा रक्षणकर्ता आहे असे कोल्हा समजत नाही काय!॥ ४३८॥ पागल माणूस वस्त्र नेसला आहे की नागवा आहे हे लोकांनी पाहूनच ठरवावे (त्याला स्वत:चे भानच नसते) किंवा युद्धात ठार झाले त्यांच्या जखमा इतरांनी मोजाव्या॥ ४३९॥ सती जाणाऱ्या पतिव्रतेचे भोग (मळवट शृंगारादी) सर्व जग खरे समजतात, पण तिला मात्र ना आग, ना शरीर ना लोक यांचे भान असते, त्याप्रमाणे जो स्वस्वरूप झाला अर्थात ज्याचे द्रष्ट्रत्व दृश्यासह मावळले त्याला, इंद्रियांच्या समुदायाकडून काय व्यापार होतात हे कळत नाही॥ ४४०-४४१॥ अर्जुना! मोठ्या लाटेमुळे लहान लाट नाहीशी झाल्याचे पाहून तीरावरील लोकांना मोठ्या लाटेने लहान लाटेला गिळिले असे जरी वाटत असले, तरी पाण्याच्या दृष्टीने पाहता कोणी कोणाला गिळिले!

त्या प्रमाणे पूर्णस्वरूप झालेल्या ज्ञान्याला ज्याला तो मारील असे दुसरे काही नाहीच॥ ४४२-४४३ ॥

**गूढार्थदीपिका—मुक्त पुरुषांचा व्यवहार कसा होतो याचे वर्णन या सर्व ओव्यांतून माउली करीत आहे.**

अज्ञानी लोकांना ज्ञानी कर्म करताना दिसत असले तरी ज्ञानी पुरुषांना त्याचे ज्ञान नसल्यामुळे त्यांच्या दृष्टीने खरोखर कर्म किंवा व्यापार अशी वस्तुच अस्तित्वात नसते. अज्ञानी पुरुष ज्याला कर्म म्हणतो ते वस्तुत: चैतन्यच असते. म्हणून ज्ञान्याला सर्व कर्म आत्मस्वरूप वाटते. जड, विनाशी, दु:खरूप जगत् अज्ञान्याला भासते. कारण तशा तऱ्हेचेच ज्ञान त्याला होत असते व तसाच त्याला अनुभव असतो. कर्माचे ठिकाणी ज्ञान्याला सत्, चित् आनंदरूप ब्रह्माचेच दर्शन घडत असते.

जग म्हणजे एक नाना प्रकारच्या वस्तूंचा समुदाय आहे व त्या नाना प्रकारच्या वस्तूंची ती नामरूपे आहेत असे अज्ञानी समजतो तर चैतन्य ही एकच वस्तु आहे व तिचीच सर्व नामरूपे आहेत असे ज्ञानी समजतो. म्हणून त्यांच्याकडून काहीही व कितीही व्यापार झालेला दिसला तरी त्यांची अक्रियस्थिति कधीही भंगत नाही. माउलींनी हीच गोष्ट.

''व्यापाराचे गाडे। मोडताही अपाडे। अक्रियेचे न मोडे। पाउल केही॥'' (अमृ० ९-२०)

या ओवीत सांगितले आहे. माउली म्हणते ज्ञानी पुरूषांचे विषयसेवन म्हणजे चंद्रावर चंद्रप्रकाशाचे जसे पडणे किंवा समुद्रावर पाण्याचा वर्षाव होणे असे आहे (अमृ० ९-१८)

अग्नीला अग्नीचा संयोग झाला असता तो काय पोळणार? त्याचप्रमाणे जो ज्ञानी आत्मस्वरूपाशिवाय कर्माचा कोणताही पसारा जाणतच नाही त्याच्या बुद्धीला कोणते कर्म लिप्त करील? एवढे मात्र खरे की मुक्त पुरूषांचे देह प्राक्तनाने केवल व्यवहार करीत असतानाही मूर्ख अज्ञानी लोक मात्र त्यांना भ्रमाने कर्ता समजतात.

**सुवर्णाचिया चंडिका। सुवर्णशूळेंचि देखा। सुवर्णाचिया महिखा। नाशु केला॥ ४४४॥**
**तो देवलवसिया कडा। व्यवहारु गमला फुडा। वांचूनि शूळ महिष चामुंडा। सुवर्णचि तें॥ ४४५॥**
**पैं चित्रींचे पाणी हुताशु। तो दृष्टीचाचि आभासु। पटीं आगीवोलांशु। दोन्ही नाहीं॥ ४४६॥**
**मुक्ताचें देह तैसें। हालत संस्कारवशें। तें देखोनि लोक पिसे। कर्ता म्हणती॥ ४४७॥**

**अर्थ**—सोन्याच्या केलेल्या देवीने सोन्याच्याच शूलाने सोन्याच्याच महिषासुराचा केलेला वध, जवळच असलेल्या देवळातील पुजाऱ्याच्या दृष्टीने खराच वाटला तरी, महिषासुर, शूळ व देवी एका सोन्याशिवाय काहीच नाही. ते सर्व सोनेच आहे॥ ४४४-४४५॥ चित्रात दिसणारे पाणी व अग्नि केवळ पाहाणाऱ्याच्या दृष्टीला येणारा आभासरूप प्रत्यय आहे. (चित्राचा आधार असणाऱ्या) वस्त्राच्या ठिकाणी मात्र अग्नी किंवा पाण्याचा ओलावा दोन्हीही नाहीत॥ ४४६ ॥ त्याप्रमाणे मुक्त पुरुषाचे देह प्राक्तनाने (पूर्वीच्या कर्माने) केवळ व्यवहार करतात. पण ते पाहून मूर्ख (अज्ञानी) लोक त्यांना कर्ता समजतात. ॥ ४४७ ॥

**आणि तयां करणेयाआंतु। घडो तिहीं लोकां घातु। परी तेणें केला हे मातु। बोलोंचि नये॥ ४४८॥**
**तंव अंध:कार देखावा तेजें। मा तो फेडी जे हें कें बोलिजे। तैसें ज्ञानिया नाहीं दुजें। मारील कायी॥ ४४९॥**

**अर्थ**—आणि त्या मुक्त पुरुषाच्या कर्म करण्यात त्रैलोक्य पूर्णपणे नष्ट झाले तरी त्यांनी ते केले ही गोष्ट म्हणता येत नाही॥ ४४८॥ सूर्याने अंध:कार पाहिला व त्या अंध:काराचा त्याने नाश केला हे जसे म्हणणे त्याच प्रमाणे (ज्ञान्याला जग सत्य वाटले व त्याचा नाश करून त्या कर्माचा तो कर्ता झाला असे म्हणणें होय.) पण ज्ञान्याला दुसरा पदार्थच नाही की ज्याला तो मारील॥ ४४९ ॥

**म्हणोनि तयाची बुद्धी। नेणे पापपुण्याची गंधी। गंगा मीनलिया नदी। विटाळ जैसा॥ ४५०॥**
**अग्नीसी अग्नी झगटलिया। काय पोळे तो धनंजया। कीं शस्त्र रुपे आपणया। आपणचि॥ ४५१॥**
**तैसें आपणपयापरतें। जो नेणे क्रियाजातातें। तेथ काय लिंपवी बुद्धीतें। तयाचिये॥ ४५२॥**

**अर्थ**—ज्या प्रमाणे नदी गंगेला मिळाल्यावर नदीचा अमंगलपणा राहत नाही, म्हणून ज्ञानी पुरुषाच्या बुद्धीला

पापपुण्याचा स्पर्श नसतो ॥ ४५० ॥ अग्नीला अग्नीचा संयोग झाला असता तो पोळेल काय? किंवा शस्त्र आपणच आपल्याला कधी रुतेल काय? ॥ ४५१ ॥ त्याप्रमाणे जो ज्ञानी आत्मस्वरूपाशिवाय दुसरी कर्म नावाची वस्तु जाणतच नाही त्याच्या बुद्धीला कोणते कर्म लिप्त करील? ॥ ४५२ ॥

**म्हणोनि कार्य कर्ता क्रिया। हें स्वरूपचि जाहालें जया। नाहीं शरीरादिकीं तया। कर्मबंध ॥ ४५३ ॥**
**जे कर्ता जीव विंदाणी। काढूनि पांचही खाणी। घडित आहे करणीं। आउतीं दाहे ॥ ४५४ ॥**
**तेथ न्यावो आणि अन्यावो। हा द्विविधु साधूनि आवो। उभवितां न लवी खेंवो। कर्मभुवनें ॥ ४५५ ॥**
**या थोराडा कीर कामा। विरजा नोहे आत्मा। परी म्हणसी हन उपक्रमा। हात लावी ॥ ४५६ ॥**
**तो साक्षी चिद्रूपु। कर्मप्रवृत्तीचा संकल्पु। उठी तो कां निरोपु। आपणचि दे ॥ ४५७ ॥**
**तरी कर्मप्रवृत्तीहीलागीं। तया आयासु नाहीं आंगीं। जे प्रवृत्तीचेही उळिगीं। लोकुचि आथी ॥ ४५८ ॥**
**म्हणोनि आत्मयाचें केवळ। जो रूपचि जाहला निखिळ। तया नाहीं बंदिशाळ। कर्माची हे ॥ ४५९ ॥**

**अर्थ—**म्हणून कार्य, कर्ता व क्रिया हे सर्व ज्याचे आत्मस्वरूपच झाले त्याला शरीरादिकांनी केलेल्या कर्माचा बंध लागत नाही ॥ ४५३ ॥ स्वत:ला कर्ता मानणारा जो जीव तो आपल्या बुद्धीच्या कौशल्याने दहा इंद्रियांच्या अवजारांचे साहाय्य घेऊन कर्माची कारणे असलेले अधिष्ठानादी पाच खाणी बाहेर काढून कर्ममात्र तयार करीत असतो ॥ ४५४ ॥ तेथे (विधि) धर्म व (निषेध) अधर्म असे दोन प्रकारचे आकार साधून (कर्मे करून) कर्माचे विश्व उभारण्याला क्षणाचाही वेळ लागत नाही ॥ ४५५ ॥ या प्रचंड कामाला खरोखरच आत्म्याचे साहाय्य होत नाही. तरी तू म्हणशील या कामाच्या आरंभाला आत्मा हातभार लावतो की ॥ ४५६ ॥ तो आत्मा चिद्रूप असून साक्षीरूप असल्याकारणाने कर्म करण्याची वृत्ती त्याच्या ठिकाणी उठली तरी आपणच तो आज्ञा देईल काय? ॥ ४५७ ॥ ज्या कर्म प्रवृत्तीच्या बिगारीला सर्व लोकच कारणीभूत आहेत. आत्म्याला अंगाने प्रवृत्ति करताना काही श्रम करावे लागत नाही ॥ ४५८ ॥ म्हणून जो केवळ पूर्ण आत्मस्वरूपच झाला त्याला कर्माचा हा बंदिवास नाही ॥ ४५९ ॥

**गूढार्थदीपिका—**वेदान्तात विचार हा नेहमी दोन भूमिकेवरून कसा होत जातो याचे हे एक उदाहरण आहे. माउलींनी ओवी ४४७ ते ४५३ पर्यंत ज्ञान्याच्या भूमिकेचे वर्णन केले व आत्मस्वरूपाची ओळख झालेल्या पुरुषाला एका परब्रह्माशिवाय दुसरी वस्तूच भासत नसल्यामुळे त्याचा सर्वव्यवहार ज्ञाता ज्ञान, ज्ञेय या त्रिपुटीविरहित असा होतो; हे सांगितले. त्याच्या सर्व व्यवहारात सच्चिदानंदाचे अखंड अनुसंधान कायम राहते. त्याच्याठिकाणी उठणारी कर्ता, कर्म, क्रियारूप त्रिपुटी केव्हाही उठत नाही. म्हणूनच तो परब्रह्माप्रमाणे अकर्तृस्वरूप साक्षी होतो हे सांगितले. ही ज्ञान्याची भूमिका. पुढे ओवी ४५४ व ४५५ यात अज्ञान्याच्या भूमिकेचे वर्णन करतात.

वस्तुत: मी रूपाने आपल्या ठिकाणी होणारे स्फुरण हे परब्रह्माचे निरुपाधिक स्फुरण असते. स्फुरणाला आधार असणाऱ्या परब्रह्मरूप अधिष्ठानाकडे आपण लक्ष देत नाही. अधिष्ठानाकडे दुर्लक्ष झाल्याबरोबर अधिष्ठानाची विस्मृति होऊन अधिष्ठान व स्फुरण यांची फारकत होते. व वस्तुत: एकरूपच असलेला दोनपणा भिन्नसत्तेमुळे द्वैतात परिणत होतो. 'मी' म्हणताच अर्थातच अमर्यादित्वाची जाणीव आपण न बाळगता मर्यादितपणाची जाणीव बाळगून त्याचे देहाशी तादात्म्य करतो व देहाला दिलेल्या नावाने आपल्या 'मी' ची ओळख व्हावयाला सुरुवात होते.

द्वैताला सुरुवात झाल्याबरोबर देश, काल, वस्तु यांच्या मर्यादांच्या कल्पनांना अशा रीतीने सुरुवात होऊन त्रिविध परिच्छेदाची निर्मिती होते. अधिष्ठानरूप परब्रह्माच्या सच्चिदानंद धर्माच्या ठिकाणी आवरण पडत असल्यामुळे अर्थातच त्याच्या विपरीत धर्मांची प्रतीति मग आपल्याला येऊ लागते. आवरणाची परिणती अशा रीतीने विक्षेपात होते. हा सर्व प्रकार अधिष्ठानाच्या विस्मृतिरूप अज्ञानातून उद्भवतो.

आत्मस्वरूपाची विस्मृति अशा रीतीने विपरीत धर्माच्या दृश्याचा पसारा निर्माण करते. व सच्चिदानंदरूप द्रष्ट्याचा नामरूपांनी नटलेला हा सच्चिदानंदरूप विलास असत्-जडरूपादि जगत्प्रपंचरूपाने भासायला लागतो. अशा रीतीने द्रष्ट्याहून पूर्णपणे अलग व त्याच्या स्वरूपाहून ही पूर्णपणे विपरीत धर्माचे दृश्य द्रष्ट्याला भासते. त्रिविध

परिच्छेद म्हणून ज्याचा पूर्वी उल्लेख केला त्या त्रिविध परिच्छेदांनी युक्त असा विषयांचा पसारा निर्माण होतो.

द्रष्टा मर्यादित झाल्यामुळे व विषयही मर्यादित स्वरूपाचे भासत असल्यामुळे त्याला आवडणाऱ्या निरनिराळ्या विषयांच्या प्राप्तीत आनंद व न आवडणाऱ्या विषयांच्या संपर्कात दु:ख होऊ लागते. आवडणाऱ्या विषयांची प्राप्ती व न आवडणाऱ्या विषयांचा संपर्क टाळण्याचा त्याचा मग सारखा प्रयत्न दहा इंद्रियादिकांच्या द्वारा सुरू होतो.

या दोन्ही प्रकारच्या प्रयत्नामुळे निरुपाधिक 'मी' च्या स्फुरणाला देहतादात्म्यामुळे अहंकाराचे स्वरूप प्राप्त होते. कर्तृत्वादिकांची जाणीव तो आपल्याठिकाणी ओढून घेतो. अशा प्रकारे कर्माच्या जाळ्यात सापडून कर्माने पूर्णपणे जखडला जातो. अज्ञानाला कर्मांचा बंध कसा होतो याची ही अशी कहाणी आहे. अज्ञानाची दशा यालाच म्हणतात.

**परी अज्ञानाच्या पटीं। अन्यथा ज्ञानाचें चित्र उठी। तेथ चितारणी हे त्रिपुटी। प्रसिद्ध जे कां॥ ४६०॥**

**अर्थ**—परंतु अज्ञानाच्या पटावर विपरीत ज्ञानाचे चित्र उठते व प्रसिद्ध असलेली त्रिपुटीच चित्र काढणारी आहे॥ ४६०॥

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना। करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसङ्ग्रहः॥ १८॥**

**अर्थ**—ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता हे त्रिकुट कर्माचे प्रेरक आहेत व कारण, कर्म व कर्ता असे कर्माचे त्रिविध साहित्य आहे॥ १८॥

**जें ज्ञान ज्ञाता ज्ञेय। हें जगाचें बीजत्रय। तें कर्माची नि:संदेह। प्रवृत्ति जाण॥ ४६१॥**
**आतां ययाचि गा त्रया। व्यक्ती वेगळालिया। आइकें धनंजया। करूं रूप॥ ४६२॥**

**अर्थ**—ज्ञान, ज्ञाता, ज्ञेय ही त्रिपुटी जगाला कारणीभूत आहे. त्यामुळे हिच्यापासून कर्माची नि:संशय प्रवृत्ती होते॥ ४६१॥ आता या तिघांचे वेगवेगळे स्पष्ट स्वरूप सांगतो. अर्जुना ऐक॥ ४६२॥

**तरी जीवसूर्यबिंबाचे। रश्मी श्रोत्रादिकें पांचें। धांवोनि विषयपद्माचे। फोडिती मढ॥ ४६३॥**
**कीं जीवनृपाचे वारु उपलाणें। घेऊनि इंद्रियांचीं केंकाणें। विषयदेशींचें नागवणें। आणीत जे॥ ४६४॥**
**हें असो इहीं इंद्रियीं राहटे। जें सुखदु:खेंसीं जीवा भेटे। तें सुषुप्तिकाळीं वोहटे। जेथ ज्ञान॥ ४६५॥**
**तया जीवा नांव ज्ञाता। आणि जें हें सांगितलें आतां। तेंचि एथ पांडुसुता। ज्ञान जाण॥ ४६६॥**
**जें अविद्येचिये पोटीं। उपजतखेवों किरीटी। आपणयातें वांटी। तिहीं ठायीं॥ ४६७॥**
**आपुलिये धांवे पुढां। घालूनि ज्ञेयाचा गुंडा। उभारी मागिलीकडां। ज्ञातृत्वातें॥ ४६८॥**

**अर्थ**—श्रोत्रादि पांच इंद्रिये ही जीवरूपी सूर्याच्या बिंबाची किरणे असून ती विषयरूपी कमलाकडे धाव घेतात व त्यांच्या कळ्या उमलवितात॥ ४६३॥ किंवा जीवरूपी राजा शरीररूपी खोगीर असलेल्या घोड्यावर बसून व इंद्रियरूपी (युद्ध सामग्री) घेऊन व विषयरूपी देशावर आक्रमण करून सुखदु:खरूपी लूट आणतो॥ ४६४॥ हे असो. या इंद्रियांच्या होणाऱ्या व्यापारामुळे जे ज्ञान सुखदु:खासह जीवाला भेटते ते सुषुप्तीमध्ये जेथे लीन असते॥ ४६५॥ त्या अशा जीवाला ज्ञाता हे नाव आहे आणि ज्याविषयी आतापर्यंत मागील ओवीत सांगितले तेच या ठिकाणी अर्जुना! ज्ञान हे समज॥ ४६६॥ जे ज्ञान अविद्येचे पोटी जन्म घेताक्षणीच आपली, अर्जुना! तीन ठिकाणी वाटणी करते॥ ४६७॥ जे ज्ञान आपल्या धावेपुढे ज्ञेयाचा दगड टाकून आपल्या मागील बाजूला ज्ञातेपणाला (ज्ञात्याला) उभारते॥ ४६८॥

**मग ज्ञातया ज्ञेया दोघां। तो नांदणुकेचा बगा। माजीं जालेनि पैंगा। वाहे जेणें॥ ४६९॥**
**टाकूनि ज्ञेयाची शीव। पुरे जयाची धांव। सकळ पदार्थां नांव। सूतसे जें॥ ४७०॥**
**तें गा सामान्यज्ञान। या बोला नाहीं आन। ज्ञेयाचेंही चिन्ह। आइक आतां॥ ४७१॥**

**अर्थ**—अशा रीतीने ज्ञाता व ज्ञेय यांच्या परस्पर व्यवहाराचा मार्ग तयार झाल्यावर त्या ज्ञानाच्या मार्गाने राहाटी सतत चालू राहते॥ ४६९॥ ज्ञेयाची हद्द येताच ज्या ज्या ज्ञानाची धाव खूंटते आणि मग जे ज्ञान सर्व पदार्थनामांना जन्म देते॥ ४७०॥ याला सामान्य ज्ञान म्हणतात, हे म्हणणे अन्यथा नाही. आतां ज्ञेयाचें स्वरूपही ऐक॥ ४७१॥

**तरी शब्द स्पर्शु। रूप गंध रसु। हा पंचविध आभासु। ज्ञेयाचा जो॥ ४७२॥**
**जैसें एकेंचि चूतफळें। इंद्रियां वेगळवेगळें। रसें वर्णे परिमळें। भेटिजे स्पर्शें॥ ४७३॥**
**तैसें ज्ञेय तरी एकसरें। परी ज्ञान इंद्रियद्वारें। घे म्हणोनि प्रकारें। पांचें जालें॥ ४७४॥**
**आणि समुद्रीं वोघाचें जाणें। सरे लाणीपासीं धांवणें। कां फळीं सरे वाढणें। सस्याचें जेवीं॥ ४७५॥**
**तैसें इंद्रियांच्या वाहवटीं। धांवतया ज्ञाना जेथ ठी। होय तें गा किरीटी। विषय ज्ञेय॥ ४७६॥**
**एवं ज्ञातया ज्ञाना ज्ञेया। तिहीं रूप केलें धनंजया। हे त्रिविध सर्व क्रिया-। प्रवृत्ति जाण॥ ४७७॥**

**अर्थ**—शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध असे पांच प्रकारचे ज्ञेयाचे प्रत्यय आहेत॥ ४७२॥ जसा एकच आंबा गोडी, रंग व सुवास इत्यादि व स्पर्श प्रकारांनी भिन्न भिन्न इंद्रियांना भिन्न रीतीने जाणवतो॥ ४७३॥ त्याप्रमाणे ज्ञेय जरी एकच असले तरीपण त्याचे ज्ञान, निरनिराळ्या इंद्रियांच्या द्वारे घेतल्यामुळे पांच प्रकाराने झाले॥ ४७४॥ ज्याप्रमाणे समुद्राकडे जाणारा पाण्याचा प्रवाह समुद्राला मिळताच संपतो किंवा मुक्काम येताच धावणे संपते किंवा फळ येताच धान्याच्या रोपट्याची वाढ खुंटते॥ ४७५॥ त्याप्रमाणे इंद्रियांच्या व्यापारात वृत्तीचे बहिर्गमन होऊन ज्ञानाला जेथे मर्यादा पडते त्या स्थानाला अर्जुना! ज्ञेय म्हणजे ज्ञानाचा विषय म्हणतात॥ ४७६॥ याप्रमाणे ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय या तिघांचेही स्वरूप अर्जुना! स्पष्ट केले, हे तीनही सर्व क्रियांना प्रवृत्त करणारे आहेत, असे समज॥ ४७७॥

**गूढार्थदीपिका**—कर्माची प्रवृत्ती निर्माण करण्यास कारणभूत असलेली ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ही त्रिपुटी आत्मविस्मृतिरूप अविद्येमुळे जीवाच्या ठिकाणी कशी निर्माण होते व त्रिपुटीतील प्रत्येकाचे स्वरूप काय आहे हे माउली वरील ओव्यांतून सांगत आहे.

श्रोत्रादी पांच इंद्रिये विषयाकडे कशी धाव घेतात याचे वर्णन रूपकाद्वारे प्रथम करून कर्मेंद्रियांची धडपड मग त्या विषय प्राप्तीकरता कशी होते याचे वर्णन दुसऱ्या रूपकाद्वारे करतात.

सूर्य विकासिनी कमळे ज्याप्रमाणे सूर्याच्या किरणांनी उमलतात त्याप्रमाणे श्रोत्रादी पांच ज्ञानेंद्रिये जीवरूपी सूर्यबिंबाची जणुकाय किरणे असून ती विषयरूपी कमळाकडे धाव घेतात व त्यांना उमलवितात.

कर्मेंद्रिये ही जीवरूपी राजाची जणुकाय सामग्री म्हणजे शस्त्रास्त्रेच आहेत. हा जीवरूपी राजा विषयरूपी देशावर स्वारी करून कर्मेंद्रियांच्या साहाय्याने लुटालूट करून आणतो (सुखदु:खांची)

अमर्याद सुखांचा साठा असलेल्या अधिष्ठानरूप ब्रह्माचा विसर पडल्यामुळे अधिष्ठानाकडे दुर्लक्ष झालेली ज्ञानवृत्ती, सुखाचा साठा बाहेर आहे, असे समजते. सुखाच्या तळमळीने तिची धाव मग बाह्य विषयाकडे वळते. ज्ञानेंद्रिये विषयांचे ज्ञान करून घेतात व कर्मेंद्रिये विषयांची प्राप्ती करून घेतात. आत्मविस्मृतिरूप अज्ञानातून निर्माण झालेले हे विपरीत ज्ञान म्हणजेच अज्ञान किंवा भ्रम होय. देश, काल व वस्तुत्व या त्रिविध परिच्छेदांनी विषय मर्यादित असल्याकारणाने विषयाकडे धावणारे ज्ञान विषयापर्यन्त पोहोचताच तेथे थांबते. ते ज्ञान विषयाला व्याप्त करून विषयाचा आकार धारण करते. विषय हा पूर्वी ज्ञात नसतो, तो नंतर ज्ञात होतो. म्हणून पदार्थाचे म्हणजेच विषयाचे ज्ञान झाले म्हणजे पूर्वी तो मला कळला नव्हता, आता तो मला कळला किंवा ज्ञात झाला, अशी जाणीव पदार्थाचे किंवा विषयाचे ज्ञान झाल्यावर आपल्या ठिकाणी उत्पन्न होते. अशा रीतीने विषयाचे ज्ञान करून घेणाऱ्या जीवाच्या ठिकाणी ज्ञातृत्वाची उभारणी होऊन तो ज्ञाता होतो व त्याला कळलेला विषय ज्ञेय होते.

याप्रमाणे ज्ञाता व ज्ञेय यांचा परस्पर ज्ञानव्यवहाराचा मार्ग तयार होतो.

ज्ञेयाच्या सरहद्दीवर येताच थांबणारे ज्ञान अशा रीतीने सर्व पदार्थाच्या नावांना जन्म देते. यालाच सामान्य ज्ञान म्हणतात. ज्ञाता, व ज्ञेय यांचे स्वरूप हे असे आहे. आत्मविस्मृतिरूप अज्ञानातूनच या त्रिपुटीची निर्मिती होत असल्याकारणाने आत्मज्ञान होताच या त्रिपुटीचा डोल्हारा कोलमडून पडतो व त्रिपुटीरहित चिन्मात्र अवस्थेचा अनुभव ज्ञान्याला येतो.

**जे शब्दादि विषय। हें पंचविध जें ज्ञेय। तेंचि प्रिय कां अप्रिय। एके परीचें॥ ४७८॥**

**ज्ञान मोटकें ज्ञातया। दावी ना जंव धनंजया। तंव स्वीकारा की त्यजावया। प्रवर्तेचि तो॥ ४७९॥**
**परी मीनातें देखोनि बकु। जैसा निधानातें रंकु। कां स्त्री देखोनि कामुकु। प्रवृत्ति धरी॥ ४८०॥**
**जैसें खालारा धांवे पाणी। भ्रमर पुष्पाचिये घाणीं। नाना सुटला सांजवणीं। वत्सचि पां॥ ४८१॥**
**अगा स्वर्गींची उर्वशी। ऐकोनि जेवीं माणुसीं। वारत्या लावीजती आकाशीं। यागांचिया॥ ४८२॥**
**पैं पारिवा जैसा किरीटी। चढला नभाचिये पोटीं। पारवी देखोनि लोटी। आंगचि सगळें॥ ४८३॥**
**हें ना घनगर्जनासरिसा। मयूर वोवांडे आकाशा। ज्ञाता ज्ञेया देखोनि तैसा। धांवचि घे॥ ४८४॥**
**म्हणोनि ज्ञान ज्ञेय ज्ञाता। हे त्रिविध गा पांडुसुता। होयचि कर्मा समस्तां। प्रवृत्ति येथ॥ ४८५॥**

**अर्थ**—ज्ञेय असणारे जे शब्द स्पर्शरसादि पांच विषय आहेत, ते एक तर प्रिय अप्रिय असतात॥ ४७८॥ हे अर्जुना हे अल्पसे ज्ञान ज्ञात्याला होत नाही तोच त्याचा स्वीकार करण्यास किंवा टाकून देण्यास तो प्रवृत्त होतो॥ ४७९॥ ज्याप्रमाणे बगळा माश्याला पाहून किंवा दरिद्री धनाला पाहून किंवा कामी पुरुष स्त्रीला पाहून त्यांना प्राप्त करून घेण्याची इच्छा करतो॥ ४८०॥ ज्याप्रमाणे पाणी उताराकडे वाहते, किंवा भ्रमर पुष्पाच्या वासाने आकृष्ट होतो किंवा संध्याकाळी धार काढण्याचे वेळी वासरू गायीकडे धाव घेते॥ ४८१॥ किंवा हे अर्जुना! ज्याप्रमाणे स्वर्गातील उर्वशीचे वर्णन ऐकून मनुष्य तिच्या प्राप्तीकरिता यज्ञयागांच्या शिड्या आकाशात लावतो॥ ४८२॥ किंवा अर्जुना! ज्याप्रमाणे कबूतर उंच आकाशात उडाला तरी खाली मादीला पाहताक्षणी तिच्याकडे सर्वस्वानी झेप घेतो॥ ४८३॥ घनगर्जना ऐकताच मोर (आनंदाच्या भरात नाचू लागतो जणू तो) आकाशाला आपला जीवच ओवाळून टाकतो, त्याप्रमाणे ज्ञाता ज्ञेयाला पाहताच तिकडे धांव घेतो॥ ४८४॥ म्हणून ज्ञान, ज्ञेय, ज्ञाता अर्जुना! ही त्रिपुटी सर्व कर्मांना येथे प्रवृत्त करणारी आहे॥ ४८५॥

**परी तेंचि ज्ञेय विपायें। जरी ज्ञातयातें प्रिय होये। तरी भोगावया न साहे। क्षणही विलंबु॥ ४८६॥**
**नातरी अवचटें। तेंचि विरुद्ध होऊनि भेटे। तरी युगांत वाटे। सांडावया॥ ४८७॥**
**व्याळा कां हारा। वरपडा जालेया नरा। हरिखु आणि दरारा। सरिसाचि उठी॥ ४८८॥**
**तैसें ज्ञेय प्रियाप्रियें। देखिलेनि ज्ञातया होये। मग त्यागस्वीकारीं वाहे। व्यापारातें॥ ४८९॥**

**अर्थ**—परंतु तेच ज्ञेय ज्ञात्याला यदाकदाचित् प्रिय वाटले तर तो ज्ञाता विषय भोगण्याकरिता क्षणाचाही विलंब सहन करीत नाही॥ ४८६॥ तेच ज्ञेय एखादेवेळी अप्रिय म्हणजे दु:खरूप वाटले तर ते टाकण्याकरिता लागणारा क्षण प्रलयासारखा वाटतो॥ ४८७॥ सर्प किंवा हार मनुष्याला जर प्राप्त झाला तर भीति किंवा आनंद हे एकदमच त्याच्या ठिकाणी उत्पन्न होतात॥ ४८८॥ त्याप्रमाणे ज्ञेयाला पाहून ज्ञात्याच्या ठिकाणी विषयाविषयीची आवड किंवा नावड निर्माण होते व मग त्या विषयाचा स्वीकार किंवा त्याग करण्याची क्रिया त्याच्याकडून घडते॥ ४८९॥

**गूढार्थदीपिका**—बाह्य विषयात सुख आहे असे अज्ञानाने समजूत करून घेऊन त्यांची प्राप्ती करून घेण्याकरिता तळमळणाऱ्या ज्ञात्याच्या ठिकाणी काही विषयांविषयी आवडी व काही विषयांविषयी नावडी असते. आवडीचा विषय प्राप्त करून घेण्याकरिता वाटेल तो प्रयत्न करणारा ज्ञाता, न आवडणाऱ्या पदार्थांचा आपल्याला स्पर्श देखील होऊ नये म्हणून तितकाच प्रयत्न करतो. ही आवडी नावडी त्या वस्तुंच्या गुणावर किंवा दोषांवर अवलंबून नाही. तसे असते तर नेहमीच त्यांच्या सहवासामुळे आनंद किंवा दु:ख झाले असते. पण तसे होत नाही. ज्ञाताच त्या विषयाविषयी आपली अनुकूल किंवा प्रतिकूल वृत्ति बनवून घेतो. व त्यांच्या प्राप्तीत सुखाची व वियोगात दु:खाची कल्पना करतो.

**तेथ रागी प्रतिमल्लाचा। गोसांवी सर्व दळाचा। रथु सांडूनि पायांचा। होय जैसा॥ ४९०॥**
**तैसें ज्ञातेपणें जे असे। तें ये कर्ता ऐसिये दशे। जेवितें बैसलें जैसें। रंधन करूं॥ ४९१॥**
**कां भंवरेंचि केला मळा। वरकलुचि जाला अंकसळा। नाना देवो रिगाला देउळा-। चिया कामा॥ ४९२॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे कुस्तीशौकीन आपल्या तोलाचा पहेलवान पाहिल्या नंतर सर्व सैन्याचा सेनापति असला तरी

रथ सोडून देऊन पायीच (त्याच्याशी भिडणकरितां) चालू लागतो॥ ४९०॥ त्याप्रमाणे ज्ञातेपणाची जाणीव बाळगणारा कर्ता या दशेला येतो. ज्याप्रमाणे जेवणाऱ्याने स्वयंपाक करण्यास बसावे किंवा ज्याप्रमाणे भ्रमराने स्वत:चा बगीचा तयार करावा किंवा कसोटीच्या दगडाने स्वत: परीक्षक व्हावे किंवा देवच स्वत: देऊळ बांधण्याच्या कामाला लागावा॥ ४९१-४९२॥

**तैसा ज्ञेयाचिया हांवा। ज्ञाता इंद्रियांचा मेळावा। राहाटवी तेथ पांडवा। कर्ता होय॥ ४९३॥**
**आणि आपण होउनी कर्ता। ज्ञाना आणी करणता। तेथें ज्ञेयचि स्वभावतां। कार्य होय॥ ४९४॥**
**ऐसा ज्ञानाचिये निजगती। पाल्टु पडे गा सुमती। डोळ्यांची शोभा रातीं। पाल्टे जैसी॥ ४९५॥**
**कां अदृष्ट जालिया उदासू। पाल्टे श्रीमंताचा विलासू। पुनिवेपाठीं शीतांशु। पाल्टे जैसा॥ ४९६॥**
**तैसा चाळितां करणें। ज्ञाता वेष्टिजे कर्तेपणें। तेथिंचीं तियें लक्षणें। ऐक आतां॥ ४९७॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे ज्ञेय जे विषय त्यांच्या आसक्तीमुळे अर्जुना! ज्ञाता इंद्रियांचा समुदाय राबवितो व तेथे तो कर्ता होतो॥ ४९३॥ आणि ज्ञाता आपण कर्ता होऊन ज्ञानाला साधन बनवितो व तेथे ज्ञेय आपोआपच कार्य होते॥ ४९४॥ या प्रमाणे ज्ञानाचा जो यथार्थ स्वभाव आहे त्यांत, अर्जुना! बदल होतो. ज्याप्रमाणे रात्रीच्या वेळी डोळ्याची शोभा म्हणजे डोळ्यांची वस्तु स्पष्ट दिसणे यात बदल होतो म्हणजे वस्तु स्पष्ट दिसत नाही॥ ४९५॥ किंवा दैव फिरले म्हणजे श्रीमंत मनुष्याचे ऐश्वर्य नाहीसे होते. किंवा पौर्णिमा संपल्यावर ज्याप्रमाणे चंद्राचे पूर्ण बिंबाचा पालट होऊन ते क्षीण होत जाते॥ ४९६॥ त्याप्रमाणे ज्ञाताच इंद्रियांना राबवीत असल्यामुळे तो कर्तेपणाने व्यापिला जातो. अशा स्थितीत त्याचे स्वरूप काय असते ते आता ऐक॥ ४९७॥

**तरी बुद्धि आणि मन। चित्त अहंकार हन। हें चतुर्विध चिन्ह। अंत:करणाचें॥ ४९८॥**
**बाह्य त्वचा श्रवण। चक्षु रसना घ्राण। हें पंचविध जाण। इंद्रियें गा॥ ४९९॥**
**तेथ आंतुलें तंव करणें। कर्ता कर्तव्या घे उमाणें। मग तैं जरी जाणें। सुखा येतें॥ ५००॥**
**तरी बाहेरिलें तियेंही। चक्षुरादिकें दाहाही। उठौनि ल्वलाहीं। व्यापारा सूये॥ ५०१॥**
**मग तो इंद्रियकदंबु। करविजे तंव राबु। जंव कर्तव्याचा लाभु। हातासि ये॥ ५०२॥**
**ना तें कर्तव्य जरी दु:खें। फळेल ऐसें देखे। तो लावी त्यागमुखें। तियें दाहाही॥ ५०३॥**
**मग फिटे दु:खाचा ठावो। तंव राहटवी रात्रिदिवो। विकणवातें कां रावो। जयापरी॥ ५०४॥**
**तैसेनि त्यागस्वीकारीं। वाहातां इंद्रियांची धुरी। ज्ञातयातें अवधारीं। कर्ता म्हणिपे॥ ५०५॥**

**अर्थ**—अंत:करणाची बुद्धि, मन, चित्त व अहंकार अर्जुना! अशी चार प्रकारची लक्षणे आहेत॥ ४९८॥ त्वचा, कान, डोळे, जीभ व नाक ही पांच प्रकारची बाह्य ज्ञानरूप इंद्रिये होत॥ ४९९॥ तेथे अंतररूपी इंद्रियांच्या योगाने मला हे करावयाचे आहे असे (कर्ता) समजतो व मग त्यापासून सुखप्राप्ति होईल असे जर वाटले तर चक्षुरादी बाहेरील दहाही इंद्रिये तात्काळ उठून कर्माला लावतात॥ ५००-५०१॥ मग करावयाच्या कर्माचा लाभ मिळेपर्यंत तो इंद्रियांच्या समुदायाला राबवितो॥ ५०२॥ किंवा करावयाच्या कर्मापासून दु:खाची प्राप्ति होईल असे त्याला वाटले, तर दहाही इंद्रियांना त्यापासून परावृत्त करतो॥ ५०३॥ ज्याप्रमाणे वाहणारा वारा कोंड्याला दूर सारतो त्याप्रमाणे दु:ख नाहीसे होईपर्यंत इंद्रियांना रात्रंदिवस राबवितो॥ ५०४॥ अशा प्रकारे विषयांचा त्याग अथवा स्वीकार करण्यासाठी इंद्रियांचे नेतृत्व करणाऱ्या ज्ञात्याला कर्ता म्हणतात, असे समज॥ ५०५॥

**आणि कर्तयाच्या सर्व कर्मीं। आउतांचिया परी क्षमी। म्हणोनि इंद्रियांतें आम्ही। करणें म्हणों॥ ५०६॥**

**अर्थ**—आणि कर्त्याच्या सर्व कर्मात आउतासारखी सर्व इंद्रिये सक्षम होतात म्हणून आम्ही इंद्रियांना कर्माचे साधन म्हणतो॥ ५०६॥

**आणि हेचि करणेंवरी। कर्ता क्रिया ज्या उभारी। तिया व्यापे तें अवधारीं। कर्म एथ॥ ५०७॥**
**सोनाराचिया बुद्धी लेणें। व्यापे चंद्रकरीं चांदिणें। कां व्यापे वेल्हाळपणें। वेली जैसी॥ ५०८॥**

**नाना प्रभा व्यापे प्रकाशु। गोडिया इक्षुरसु। हें असो अवकाशु। आकाशीं जैसा॥ ५०९॥**
**तैसें कर्तयाचिया क्रिया। व्यापलें जें धनंजया। तें कर्म गा बोलावया। आन नाहीं॥ ५१०॥**

**अर्थ—**आणि ह्याच इंद्रियांकडून कर्ता ज्या ज्या क्रिया करतो त्या क्रियांनी व्याप्त झालेले जे असते ते या ठिकाणी कर्म होय, असे समज॥ ५०७॥ ज्याप्रमाणे सोनाराच्या बुद्धीने अलंकार व्यापिला जातो (घडविले जाते) किंवा चंद्रकिरणांनी चंद्राचा प्रकाश व्यापिला असतो किंवा भरघोसपणे वेली पसरली असते॥ ५०८॥ किंवा ज्योत प्रकाशरूप असते किंवा उसाचा रस गोडीने युक्त असतो. किंवा फार काय सांगावे! जशी आकाशांत पोकळी असते, त्याप्रमाणे कर्त्याच्या क्रियांनी जे व्यापिले जाते. अर्जुना! ते कर्म होय. हे बोलणें अन्यथा नाही॥ ५०९-५१०॥

**एवं कर्ता कर्म करण। या तिहींचेंही लक्षण। सांगितलें तुज विचक्षण। शिरोमणी॥ ५११॥**

**अर्थ—**या प्रमाणे हे सूज्ञश्रेष्ठा अर्जुना! कर्म, कर्ता व करण या तिघांचेही स्वरूप तुला सांगितले॥ ५११॥

**एथ ज्ञाता ज्ञान ज्ञेय। हें कर्माचें प्रवृत्तित्रय। तैसेंचि कर्ता करण कार्य। हा कर्मसंचयो॥ ५१२॥**
**वन्हीं ठेविला असे धूमु। आथी बीजीं जेवीं द्रुमु। कां मनीं जोडे कामु। सदा जैसा॥ ५१३॥**
**तैसा कर्ता क्रिया करणीं। कर्माचें आहे जिंतवणीं। सोनें जैसें खाणी। सुवर्णाचिये॥ ५१४॥**
**म्हणोनि हें कार्य मी कर्ता। ऐसें आथि जेथ पांडुसुता। तेथ आत्मा दूरी समस्तां। क्रियांपासीं॥ ५१५॥**
**यालागीं पुढत पुढती। आत्मा वेगळाचि सुमती। आतां असो हे किती। जाणतासि तूं॥ ५१६॥**

**अर्थ—**या ठिकाणी ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय ही त्रिपुटी कर्मप्रवृत्तिकारक आहे. त्याचप्रमाणे कर्ता, करण व कार्य हा कर्माचा संचय (कर्माचे साहित्य) आहे॥ ५१२॥ ज्याप्रमाणे अग्नीच्या ठिकाणी धूम असावा किंवा बीजाच्या ठिकाणी वृक्ष असावा किंवा अंत:करणात सदा वासना असावी॥ ५१३॥ सोन्याचे खाणीत ज्याप्रमाणे सोने असावे त्याप्रमाणे कर्ता, कर्म आणि करण (साधन) या तिघात कर्माचा जिव्हाळा आहे॥ ५१४॥ म्हणून हे कार्य व मी त्या कार्याचा कर्ता ही स्थिती, अर्जुना! जेथे असते तेथे सर्व क्रियांपासून आत्मा अलिप्त राहतो॥ ५१५॥ या करिता, हे सूज्ञ अर्जुना! आत्मा हा वेगळाच आहे, हे वारंवार सांगितले. हे असो, हे किती सांगावे, तूं (सर्व) हे जाणतोसच॥ ५१६॥

**ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदत:। प्रोच्यते गुणसङ्ख्याने यथावच्छृणु तान्यपि॥ १९॥**

**अर्थ—**ज्ञान, कर्म व कर्ता हे त्रिगुणाच्या भेदामुळे तीन प्रकारचे आहेत. त्यांचे वर्णन सांख्यशास्त्रात केल्याप्रमाणे मी सांगतो. ते ही तू ऐक॥ १९॥

**परी सांगितलें जें ज्ञान। कर्म कर्ता हन। तिन्ही तिहीं ठायीं भिन्न। गुणीं आहाती॥ ५१७॥**
**म्हणोनि ज्ञाना कर्मा कर्तया। पतेजों नये धनंजया। जे दोनी बांधती सोडावया। एकचि प्रौढ॥ ५१८॥**
**तें सात्त्विक ठाउवें होये। तो गुणभेदु सांगो पाहें। जो सांख्यशास्त्रीं आहे। उवाइला॥ ५१९॥**

**अर्थ—**पण आता ज्ञान, कर्म व कर्ता ही जी सांगितली ती तीन गुणामुळे तीन प्रकारची होतात॥ ५१७॥ या तीन गुणांपैकी दोन गुण बंधनकारक असून एकच (सत्व) मोक्ष देण्याला समर्थ आहे म्हणून ज्ञान, कर्म व कर्ता या तिघांवरही विश्वास ठेवू नये॥ ५१८॥ ज्या सात्विक गुणाचे वर्णन सांख्यशास्त्रात विस्ताराने केले आहे त्या सात्विक गुणाची ओळख होण्याकरिता त्या गुणांचे प्रकार सांगतो, पाहा॥ ५१९॥

**जें विचारक्षीरसमुद्र। स्वबोधकुमुदिनीचंद्र। ज्ञानडोळसां नरेंद्र। शास्त्रांचा जें॥ ५२०॥**
**कीं प्रकृतिपुरुष दोनीं। मिसळलीं दिवोरजनीं। तियें निवडितां त्रिभुवनीं। मार्तंडु जें॥ ५२१॥**
**जेथ अपारा मोहराशी। तत्त्वांच्या मापीं चोविसीं। उमाणा घेऊनि परेशीं। सुरवाडिजे॥ ५२२॥**
**अर्जुना तें सांख्यशास्त्र। पढे जयाचें स्तोत्र। तें गुणभेदचरित्र। ऐसें आहे॥ ५२३॥**

**अर्थ—**जे सांख्यशास्त्र, विचारांचा क्षीरसमुद्र आहे, आत्मस्वरूपी कमलाला विकसित करणारा चंद्र आहे व यथार्थ ज्ञान दृष्टि देणाऱ्या शास्त्रांचा सम्राट राजा आहे॥ ५२०॥ किंवा (जे सांख्यशास्त्र) ज्या प्रमाणे दिवस व रात्र एकत्र मिसळावेत त्याप्रमाणे मिसळलेल्या प्रकृति व पुरुष यांचा विवेक करणारा तिन्ही जगतातील अखंड ज्ञानसूर्यच

आहे ॥ ५२१ ॥ ज्या शास्त्रामध्ये अमर्याद अज्ञानराशीची चोवीस तत्त्वांच्या मापाने मोजणी करून परब्रह्माच्या ठिकाणचा आनंद प्राप्त करता येतो ॥ ५२२ ॥ अर्जुना! त्या सांख्यशास्त्रामध्ये ज्या तीन गुणांच्या भेदांची (सत्व, तम, रज या तीन गुणांची) कीर्ति गायिली आहे, त्या गुणभेदाचे वर्णन असे आहे ॥ ५२३ ॥

**जे आपुलेनि आंगिकें। त्रिविधपणाचेनि अंकें। दृश्यजात तितुकें। अंकित केलें ॥ ५२४ ॥**
**एवं सत्त्वरजतमा। तिहींची एवढी असे महिमा। जे त्रैविध्य आदी ब्रह्मा। अंतीं कृमी ॥ ५२५ ॥**
**परी विश्वींची आघवी मांदी। जेणें भेदलेनि गुणभेदीं। पडिली ते तंव आदी। ज्ञान सांगों ॥ ५२६ ॥**
**जे दिठी जरी चोख कीजे। तरी भल्तेंही चोख सुजे। तैसें ज्ञानें शुद्धे लाहिजे। सर्वही शुद्ध ॥ ५२७ ॥**
**म्हणोनि तें सात्त्विक ज्ञान। आतां सांगों दे अवधान। कैवल्यगुणनिधान। श्रीकृष्ण म्हणे ॥ ५२८ ॥**

**अर्थ**—आपल्या स्वत:च्या अंगी असलेल्या सामर्थ्याने त्रिविधपणाच्या ठशाने, दृश्य म्हणून जेवढे असेल, तेवढे सर्व तो चिन्हित करतो ॥ ५२४ ॥ अशा रीतीने सत्व रज तम या तिघांचा महिमा एवढा मोठा आहे की ब्रह्मदेवापासून तो लहानशा कृमीपर्यंत जो तीनपणा अतिक्रमण करतो ॥ ५२५ ॥ पण हा सर्व विश्वसमुदाय ज्याच्या भेदामुळे तीनपणाच्या भेदात गोवला गेला आहे ते ज्ञान आम्ही आधी सांगतो ॥ ५२६ ॥ ज्याप्रमाणे दृष्टि जर निर्मळ असली तर कोणताही पदार्थ निर्मळच वाटतो. त्याप्रमाणे यथार्थ ज्ञानाने सर्व ठिकाणी व्याप्त असलेले शुद्ध स्वरूप कळते ॥ ५२७ ॥ म्हणून त्या सात्विक ज्ञानाचे आम्ही आता वर्णन करतो. ते लक्ष देऊन ऐक, असे मोक्षाचा साठा असलेले भगवान श्रीकृष्ण म्हणाले ॥ ५२८ ॥

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते । अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥ २० ॥**

**अर्थ**—सर्व निरनिराळ्या भूतांच्या ठिकाणी अखंड अविनाशी एकरूप असा भाव ज्या ज्ञानाने पाहतो, त्या ज्ञानाला सात्विकज्ञान म्हणतात ॥ २० ॥

**तरी अर्जुना गा तें फुडें। सात्त्विक ज्ञान चोखडें। जयाच्या उदयीं ज्ञेय बुडे। ज्ञातेनिसीं ॥ ५२९ ॥**
**जैसा सूर्य न देखे आंधारें। सरिता नेणिजती सागरें। कां कवळिलिया न धरे। आत्मच्छाया ॥ ५३० ॥**
**तयापरी जया ज्ञाना। शिवादि तृणावसाना। इया भूतव्यक्ति भिन्ना। नाडळती ॥ ५३१ ॥**
**जैसें हातें चित्र पाहातां। होय पाणियें मीठ धुतां। कां चेवोनि स्वप्ना येतां। जैसें होय ॥ ५३२ ॥**
**तैसें ज्ञानें जेणें। करितां ज्ञातव्यातें पाहाणें। जाणता ना जाणणें। जाणावें उरे ॥ ५३३ ॥**
**पैं सोनें आटूनि लेणीं। न काढिती आपुलिया आयणी। कां तरंग न घेपती पाणी। गाळूनि जैसें ॥ ५३४ ॥**
**तैसी जया ज्ञानाचिया हाता। न लगेचि दृश्यकथा। तें ज्ञान जाण सर्वथा। सात्त्विक गा ॥ ५३५ ॥**

**अर्थ**—ज्या ज्ञानाचा आविर्भाव होताच ज्ञात्यासह ज्ञेय (परब्रह्मात) विलीन होते, हे अर्जुना! ते खरोखर यथार्थ ज्ञान होय ॥ ५२९ ॥ ज्या प्रमाणे सूर्याला आंधार दिसत नाही किंवा समुद्राला नद्यांची जाणीव नसते किंवा धरू म्हटले तरी आपली सावली हातात येत नाही ॥ ५३० ॥ त्याप्रमाणे ज्या ज्ञानाला महेश्वरापासून तो गवतापर्यंत असलेल्या भौतिक पदार्थातील भिन्नता आढळत नाही ॥ ५३१ ॥ ज्याप्रमाणे भिंती वरील चित्रें हातानें भिंत सारवून पाहिली असतां किंवा पाण्याने मीठ धुतले असतां किंवा जागृतीत स्वप्नाचा अनुभव घेता काहीच हाती लागत नाही ॥ ५३२ ॥ त्याप्रमाणे जाणावयाच्या वस्तूचे ज्ञान करू जाता जाणणारा (ज्ञाता) जाणली जाणारी वस्तु (ज्ञेय) व जाणीव (ज्ञान) ही त्रिपुटी ज्या ज्ञानाने शिल्लक राहत नाही ॥ ५३३ ॥ ज्याप्रमाणे सोन्याचा नाश करून आपल्याला इच्छित असलेला अलंकार घडविता येत नाही किंवा पाणी सोडून तरंग घेता येत नाही ॥ ५३४ ॥ त्या प्रमाणे ज्या ज्ञानाच्या हातात दृश्य कधी सापडतच नाही. तेच ज्ञान पूर्णपणे सात्विक आहे, असे समज ॥ ५३५ ॥

**आरिसा पाहों जातां कोडें। जैसें पाहातेंचि कां रिगे पुढें। तैसें ज्ञेय लोटोनि पडे। ज्ञाताचि जें ॥ ५३६ ॥**
**पुढतीं तेंचि सात्त्विक ज्ञान। जें मोक्षलक्ष्मीचें भुवन। हें असो ऐक चिन्ह। राजसाचें ॥ ५३७ ॥**

**अर्थ**—कौतुकाने आरसा पाहण्याला गेले असता ज्याप्रमाणे पाहणाराच आरशासमोर होतो, त्याप्रमाणे जे ज्ञान,

ज्ञेय नाहीसे करून ज्ञाताच होते॥ ५३६॥ जे मोक्षलक्ष्मीचे मंदीर आहे, तेच सात्विक ज्ञान आहे. हे असो, आता या पुढे राजसाचे (राजसज्ञानाचे) लक्षण ऐक॥ ५३७॥

**गूढार्थदीपिका—श्रीमाउलींनी ५२९-५३६ या ओव्यातून सात्विक ज्ञान कशाला म्हणतात व त्याचे स्वरूप काय हे सांगितले आहे.**

ज्ञानरूप द्रष्टा चिद्रूप व आनंदरूप असल्या कारणाने ज्ञानरूपाने व आनंदरूपाने त्याचे स्फुरण होणारच. मधुसूदन सरस्वतींनीही ''चैतन्ये हि स्फुरणं स्वाभाविकम्'' या पंक्तीने चैतन्याचा स्फुरण पावणे हा स्वभावच आहे, असे सांगितले आहे. स्फुरणामुळे अधिष्ठान व स्फुरण असा दोनपणा त्याठिकाणी उमटणारच. दृश्य म्हणजे द्रष्ट्याचेच ज्ञानरूपाने होणारे स्फुरण होय. हा दृश्यद्रष्टारूप दोनपणा एकाच सत्तेवर भासत असल्यामुळे ते द्वैत नव्हे, तर अद्वैत आहे. पृथकसत्तेशिवाय द्वैताची कल्पना अद्वैतवेदान्तात नाही.

या द्रष्टा व दृश्याची स्थिति सोने व त्यावरील अलंकार किंवा पाणी व त्यावर उठणारा तरंग याप्रमाणे भिन्न इव पण पृथक सत्ता नसल्यामुळे भिन्न नाही, नव्हे. एकरूपच अशी आहे. अलंकाराला सोन्याशिवाय किंवा तरंगाला पाण्याशिवाय काहीच अस्तित्व नाही. त्याप्रमाणे दृश्याचे अस्तित्व द्रष्ट्याच्या आधारावर अवलंबून आहे. जसे सोने सोडून अलंकार राहू शकत नाही किंवा पाणी सोडून तरंग राहू शकत नाही त्याप्रमाणे द्रष्ट्याला सोडून दृश्य राहू शकत नाही. द्रष्टा निघून जाताच दृश्य नाहीसे होते.

या दोन्ही दृष्टान्तात अधिष्ठान व त्याचा भास दोनपणा असला तरी रज्जुसर्पातील दृष्टान्तांप्रमाणे अधिष्ठानाचे ज्ञान लोपवून हा भास आपल्याला भासत नाही. त्यामुळे अधिष्ठान व भास यांचा संबंध विवर्ताचा असला तरी रज्जुसर्पातील विवर्ताप्रमाणे हा अज्ञानरूप विवर्त नाही. तर तो ज्ञानरूप विवर्त आहे. यात उलट अधिष्ठानाची आवडी वाढविणारा हा भास आहे. याठिकाणी भास, अधिष्ठानाच्या ज्ञानाच्या विरोधी नाही उलट त्याच्या यथार्थ ज्ञानाला साधक आहे.

म्हणून ज्या ज्ञानात द्रष्ट्याच्या स्वरूपज्ञानाहून दृश्य म्हणून स्वतंत्र असे ज्ञान काही होत नाही त्याला सात्विक ज्ञान म्हटले आहे. या ज्ञानात द्रष्ट्याच्या स्वरूपाहून भिन्न व विपरीत असे दृश्य राहत नाही. तसेच द्रष्टा, दृश्य व दर्शन अशी त्रिपुटीही या ज्ञानात राहत नाही. दृश्य, द्रष्टा व दर्शन त्यांचे स्वरूप एकमेव ज्ञानच असल्याकारणाने त्रिपुटी इव भास त्यात होत असला तरी भिन्नसत्तेच्या अभावामुळे ते ज्ञान निखिल ज्ञानमात्रच म्हटले जाते. दृश्य व द्रष्टा यांचे ज्ञानोत्तर स्वरूप अशा रीतीने अज्ञान दशेप्रमाणे विरोधी राहत नाही. तर द्रष्ट्याच्याच स्वरूपाचे दृश्य ज्ञान्याला भासत राहते. नव्हे तो ज्ञानी दृश्य म्हणजे आपल्या ज्ञानाचाच स्फुरणरूप विलास होय असे समजतो. हेच खरे सात्विक ज्ञान होय. यालाच विद्यावृत्ति, यथार्थ ज्ञान, मोक्ष असे म्हणतात.

**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान्। वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम्॥ २१॥**

**अर्थ**—जे ज्ञान सर्व भूतांच्या ठिकाणी भिन्न भिन्न रूपाने भिन्न भिन्न लक्षणाचे निरनिराळे पदार्थ जाणते ते ज्ञान राजस होय, असे जाण॥ २१॥

**तरी पार्था परियेस। तें ज्ञान गा राजस। जे भेदाची कांस। धरूनि चालें॥ ५३८॥**
**विचित्रता भूतांचिया। आपण आंतोनि ठिकरिया। बहु चकै ज्ञातया। आणिली जेणें॥ ५३९॥**
**जैसें साचा रूपाआड। घालूनि विसराचें कवाड। मग स्वप्नाचें काबाड। ओपी निद्रा॥ ५४०॥**
**तैसें स्वज्ञानाचिये पौळी-। बाहेरि मिथ्या मोहाचे खळी। तिही अवस्थाचिया वाह्याळी। दावी जें जीवा॥ ५४१॥**
**अलंकारपणे झांकलें। बाळा सोनें कां वायां गेलें। तैसें नामीं रूपीं दुरावलें। अद्वैत जया॥ ५४२॥**
**अवतरली गाडग्या घडां। पृथ्वी अनोळख जाली मूढां। वन्हि जाला कानडा। दीपत्वासाठी॥ ५४३॥**
**कां वस्त्रपणाचेनि आरोपें। मूर्खाप्रति तंतु हारपे। नाना मुग्धा पटु लोपे। दाऊनि चित्र॥ ५४४॥**

**अर्थ**—तरी अर्जुना! ऐक, भेदाचा आश्रय करून जे ज्ञान व्यवहार करते ते ज्ञान राजस होय॥ ५३८॥ आपण स्वत: भेदभावाने युक्त होऊन भूतांचा वेगळेपणा मानला (म्हणजे प्रत्येक भूताचे स्वतंत्र अस्तित्व व वस्तुत्व मानले)

व ज्ञात्याला भ्रमात पाडून विचित्रता निर्माण केली॥ ५३९॥ ज्याप्रमाणे प्रत्यक्ष दिसणाऱ्या वस्तूला लोपवून व विस्मरणाचा दरवाजा बंद करून निद्रा, स्वप्नाची नसती दग दग आपल्या अनुभवाला आणते॥ ५४०॥ त्याप्रमाणे आत्मज्ञानाच्या आवाराच्या बाहेर खोट्या मोहाच्या गर्तेत (जागृति, स्वप्न, सुषुप्ति) या तिन्ही अवस्थांचा खेळ ते ज्ञान जीवाला दाखविते॥ ५४१॥ अलंकाराआड दडलेले सोने लहान मुलाला कळत नाही. सोन्याचे महत्व माहीत नसल्यामुळे त्याच्या दृष्टीने ते व्यर्थच झाले की! त्याप्रमाणे नामरूपामुळे अद्वैताचे ज्ञान ज्या ज्ञानाला दुरावले आहे॥ ५४२॥ गाडगे व मडके यांच्या रूपाने असलेली माती, अज्ञान्याला ज्याप्रमाणे ओळखू येत नाही किंवा दिव्यामुळे अग्नी अपरिचित व्हावा॥ ५४३॥ किंवा वस्त्र हे नांव प्राप्त होताच अज्ञानी तंतूचे ज्ञान विसरतो. (म्हणजे वस्त्र जरी तंतूचेच बनले आहे तरी वस्त्र हे नांव प्राप्त होताच ते तंतूहून निराळाच पदार्थ आहे असे अज्ञानी समजतो.) किंवा मूढाला चित्राचे ज्ञान होताना कापडाचे ज्ञान राहत नाही॥ ५४४॥

**तैशी जया ज्ञाना। जाणोनि भूतव्यक्ती भिन्ना। ऐक्यबोधाची भावना। निमोनि गेली॥ ५४५॥**
**मग इंधनीं भेदला अनळु। फुलावरी परिमळु। कां जळभेदें सकळु। चंद्रु जैसा॥ ५४६॥**
**तैसे पदार्थभेद बहुवस। जाणोनि ल्हान थोर वेष। आंतलें तें राजस। ज्ञान येथ॥ ५४७॥**
**आतां तामसाचेंही लिंग। सांगेन तें वोळख चांग। डावलावया मातंग-। सदन जैसें॥ ५४८॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे भिन्न भिन्न भूतव्यक्ति पाहून ज्या ज्ञानाची ऐक्याची भावना नाहीशी होते॥ ५४५॥ मग निरनिराळ्या इंधनामुळे अग्नीत किंवा निरनिराळ्या फुलामुळे सुगंधात किंवा निरनिराळ्या पाण्यात पडलेल्या प्रतिबिंबामुळे चंद्रबिंबात भेद पाहावा॥ ५४६॥ ज्याप्रमाणे पदार्थाचे नाना प्रकारचे भेद करून त्याच्या रूपानुसार लहान मोठे असे वर्गीकरण करून त्यांना व्यापणारे ज्ञान, राजस ज्ञान होय॥ ५४७॥ ज्याप्रमाणे मातंगाचे घर टाकण्याकरिता त्याची ओळख असावी लागते त्याप्रमाणे आता तामसज्ञानाचेही स्वरूप मी सांगेन, ते तू चांगल्या रीतीने समजून घे॥ ४५८॥

**यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम्। अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम्॥ २२॥**

**अर्थ**—जे ज्ञान एक शरीर अथवा उपास्य देवेतेची मूर्ति या पलीकडे काही नाही असे पहाते व तेथे आसक्त असते आणि जे असयुक्तिक तात्पर्यहीन व थोडे असते, त्याला तामस ज्ञान म्हणतात॥ २२॥

**तरी किरीटी जें ज्ञान। हिंडे विधीचेनि वस्त्रेंहीन। श्रुति पाठमोरी नग्न। म्हणौनि तया॥ ५४९॥**
**येरीही शास्त्र बाह्यकारी। जें निंदेचे विटाळवरी। बोळविलेंसे डोंगरीं। म्लेंच्छधर्माच्या॥ ५५०॥**
**जें गा ज्ञान ऐसें। गुणग्रहें तामसें। घेतलें भोवे पिसें। होऊनियां॥ ५५१॥**

**अर्थ**—अर्जूना! जे ज्ञान शास्त्रविधीचे वस्त्र न नेसता हिंडते. जे नग्न म्हणून श्रुति मातेने पाठ फिरविली आहे॥ ५४९॥ इतरांनीही म्हणजे (स्मृत्यादिक शास्त्रकारांनी) शास्त्राच्या बहिष्कारामुळेच त्या ज्ञानाच्या निंदेचा विटाळ आपल्याला होऊ नये म्हणून म्लेंच्छधर्माच्या डोंगरात त्याला हाकलून दिले॥ ५५०॥ अर्जुना! तमोगुणरूप नक्राने पछाडलेले अशा तऱ्हेचे ते ज्ञान वेडे पिसे होऊन भटकत राहते॥ ५५१॥

**जें सोयरिके बाधु नेणे। पदार्थी निषेधु न म्हणे। निरोपिलें जैसें सुणें। शून्यग्रामीं॥ ५५२॥**
**तया तोंडीं जें नाडळे। कां खातां जेणें पोळे। तेंचि एक वाळे। येर घेणेचिते॥ ५५३॥**
**पाहीं सोनें चोरितां उंदीरु। न म्हणे थरुविथरु। नेणे मांसखाइरु। काळें गोरें॥ ५५४॥**
**नाना वनामाजीं बोहरी। कडसणी जेवीं न करी। कां जीत मेलें न विचारी। बैसतां माशी॥ ५५५॥**
**अगा वांता कां वाढिलेया। साजुक कां सडलिया। विवेकु कावळिया। नाहीं जैसा॥ ५५६॥**
**तैसें निषिद्ध सांडूनि द्यावें। कां विहित आदरें घ्यावें। हें विषयांचेनि नांवें। नेणेचि जें॥ ५५७॥**

**अर्थ**—जे ज्ञान शरीरसंबंधाला कोणत्याही तऱ्हेची आडकाठी मानीत नाही. किंवा कोणताही पदार्थ निषिद्ध समजत नाही. ज्याप्रमाणे ओसाड गावात सोडलेले कुत्रे, त्याच्या तोंडात जे सापडत नाही किंवा खाताना तोंड भाजेल

तेच पदार्थ तो सोडून देतो, बाकी तो खातोच खातो॥ ५५२-५५३॥ सोने चोरणारा उंदीर सोने चोख आहे की हीणकस आहे हे पाहत नाही किंवा मांस खाणारा काळ्यागोऱ्याचा विचार करीत नाही.॥ ५५४॥ किंवा रानातील वणवा, हे कोण, ते कोण, याचा विचार करीत नाही. किंवा माशी बसताना हा मेलेला की जीवंत याचा विचार करीत नाही॥ ५५५॥ अथवा ओकलेले की वाढलेले, ताजे की सडलेले. हा विवेक कावळ्याला जसा राहत नाही॥ ५५६॥ त्याप्रमाणे शास्त्रांनी निषिद्ध ठरविलेले टाकून द्यावे किंवा विहित केलेले आदराने घ्यावे असे जे ज्ञान विषयाच्या संबंधात जाणत नाही॥ ५५७॥

**जेतुलें आड पडे दिठी। तेतुलें घेचि विषयासाठीं। मग तें स्त्री द्रव्य वाटी। शिश्नोदरां॥ ५५८॥**
**तीर्थातीर्थ हे भाष। उदकीं नाहीं सनोळख। तहान वोळे तेंचि सुख। वांचुनियां॥ ५५९॥**
**तयाचिपरी खाद्याखाद्य। न म्हणे निंद्यानिंद्य। तोंडा आवडे तें मेध्य। ऐसाचि बोधु॥ ५६०॥**
**आणि स्त्रीजात तितुकें। त्वचेंद्रियेंचि वोळखे। तियेविषयीं सोयरिके। सादरचि बहु॥ ५६१॥**
**पैं स्वार्थी जे उपकरे। तयाचि नाम सोयिरें। देहसंबंधु न सरे। जिये ज्ञानी॥ ५६२॥**
**मृत्यूचें आघवेंचि अन्न। आगी आघवेंचि इंधन। तैसें जगचि आपलें धन। तामसज्ञाना॥ ५६३॥**

**अर्थ**—जे जे विषय डोळ्यापुढे येतील ते ते विषय भोगासाठी ते ज्ञान घेते. व मग स्त्री व द्रव्य ह्यांची अनुक्रमे शिश्न व उदर याकरिता वाटणी करते॥ ५५८॥ तहान भागविण्याव्यतिरिक्त ज्या ज्ञानाला हे पवित्र, हे अपवित्र ही भाषा पाण्याच्या ठिकाणी ओळखीची नाही॥ ५५९॥ त्याचप्रमाणे हे खाण्याला योग्य की अयोग्य किंवा हे निंद्य की अनिंद्य याचा विचार न करता तोंडाला आवडेल ते ते पवित्र अशीच ज्या ज्ञानाची धारणा आहे॥ ५६०॥ आणि स्त्रीजात म्हणून जितकी असेल तिची स्पर्शेंद्रियानेच ज्याला ओळख आहे आणि तिच्याशी शारीरिक संबंध करण्यास जे ज्ञान अत्यंत उत्सुक असते॥ ५६१॥ स्वार्थ साधण्यास जो कामी येतो तोच आपला सोयरा ही धारणा व शरीराच्या विषयीच एक मात्र विचार ज्या ज्ञानात असतो॥ ५६२॥ मृत्युला सारेच भक्ष्य असते, अग्नीला सर्वच जळण असते, त्याप्रमाणे तामसज्ञानाला सर्व जग आपलीच मालमत्ता आहे असे वाटते॥ ५६३॥

**ऐसेनि विश्व सकळ। जेणें विषयोचि मानिलें केवळ। तया एक जाणें फळ। देहभरण॥ ५६४॥**
**आकाशपतिता नीरा। जैसा सिंधूचि येक थारा। तैसें कृत्यजात उदरा-। लागींचि बुझे॥ ५६५॥**

**अर्थ**—अशा रीतीने ज्या तामसज्ञानाने संपूर्ण जगत् केवळ आपले भोग्य विषय मानले, त्याला देहाचे पोषण करणे एवढेच एक फळ मिळते, असे समज॥ ५६४॥ आकाशातून पडलेल्या पाण्याला ज्याप्रमाणे समुद्रच एक काय तो आश्रय असतो, त्याप्रमाणे जे जे कृत्य करावयाचे ते ते केवळ पोट भरण्याकरिताच करावयाचे असे ते ज्ञान समजते॥ ५६५॥

**वांचूनि स्वर्ग नरक आथी। तया हेतु प्रवृत्ति निवृत्ती। इये आघवियेचि राती। जाणिवेची जें॥ ५६६॥**
**जें देहखंडा नाम आत्मा। ईश्वर पाषाणप्रतिमा। ययापरौती प्रमा। ढळों नेणे॥ ५६७॥**
**म्हणे पडिलेनि शरीरें। केलेंनिसीं आत्मा सरे। मा भोगावया उरे। कोण वेषें॥ ५६८॥**
**ना ईश्वरु पाहतां आहे। तो भोगवी हें जरी होये। तरी देवचि खाये। विकूनियां॥ ५६९॥**
**गांवींचें देवळेश्वर। नियामकचि होती साचार। तरी देशींचे डोंगर। उगे कां असती॥ ५७०॥**

**अर्थ**—शिवाय स्वर्ग किंवा नरक यांच्या प्राप्तीकरिता यथार्थशास्त्र किंवा निषिद्ध आचरण हेच कारण होय, याविषयी ज्या ज्ञानाच्या ठिकाणी अंधार (अज्ञान) असते॥ ५६६॥ देहाच्या तुकड्याला आत्मा हे नाव, दगडाची मूर्ति हाच ईश्वर, ह्याच्या पलीकडे ज्या तामसज्ञानाची धाव नाही॥ ५६७॥ शरीर पडल्यानंतर कर्माबरोबरच आत्माही नाश पावतो. कर्माचा भोग घेण्याला तो कोणत्या स्वरूपात राहतो॥ ५६८॥ किंवा पाहणारा ईश्वर जर असेल व तोच जर हे होणारे भोग भोगवित असेल तर देवच विकून खावा म्हणजे झाले॥ ५६९॥ गावातील देवळात असणारे दगडाचे देव जर खरोखर जगाचे शासनकर्ते असतील तर देशातील डोंगर तरी स्वस्थ कां बसतील (तेही नियामक कां होऊ नयेत, असा अर्थ)॥ ५७०॥

**ऐसा विपायें देवो मानिजे। तरी पाषाणमात्रचि जाणिजे। आणि आत्मा तंव म्हणिजे। देहातेंचि॥ ५७१ ॥**
**येरें पापपुण्यादिकें। तें आघवेंचि करोनि लटिकें। हित मानी अग्निमुखें। चरणें जें कां॥ ५७२ ॥**
**जे चामाचे डोळे दाविती। जें इंद्रियें गोडी लाविती। तेंचि साच हे प्रतीती। फुडी जया॥ ५७३ ॥**
**किंबहुना ऐसी प्रथा। वाढती देखसी पार्था। धूमाचि वेली वृथा। आकाशीं जैसी॥ ५७४ ॥**
**कोरडा ना वोला। उपेगा आथी गेला। तो वाढोनि मोडला। भेंडु जैसा॥ ५७५ ॥**
**नाना उंसांची कणसें। कां नपुंसकें माणुसें। वन लागलें जैसें। साबरीचें॥ ५७६ ॥**
**नातरी बाळकाचें मन। कां चोराघरींचें धन। अथवा गळास्तन। शेळियेचे॥ ५७७ ॥**
**तैसें जें वायाणें। वोसाळ दिसे जाणणें। तयातें मी म्हणें। तामसज्ञान॥ ५७८ ॥**

**अर्थ**—अशा रीतीने चुकून देव मानलाच तर दगडाचा मात्र मानायचा आणि देहालाच आत्मा मानायचा असे जे ज्ञान॥ ५७१ ॥ या शिवाय पापपुण्यादिकांची तमा न बाळगता ती सर्व खोटी आहेत असे समजून अग्नीप्रमाणे जो सर्व विषय सेवन करीत असतो व त्यांतच आपले कल्याण आहे असे जे ज्ञान समजते॥ ५७२ ॥ चर्मचक्षूंनी जे दिसेल व ज्याची इंद्रिये गोडी लावून देतील ते खरे असा ज्यांचा (तामसज्ञान्यांचा) पक्का अनुभव आहे॥ ५७३ ॥ फार काय सांगावे, आकाशात धुराची वेली व्यर्थच वाढत जाते, त्याप्रमाणे अर्जुना! अशी स्थिती, त्याचा ठिकाणी वाढतीच पाहशील॥ ५७४ ॥ भेंडाचे झाड ओले असो वा वाळले असो ते वाढल्यावर कोणत्याही प्रकारे उपयोगी न होताच मोडून जाते॥ ५७५ ॥ किंवा उसाच्या झाडाला येणारे तुरे, किंवा षंढ माणसे किंवा निवडुंगाच्या झाडांनी भरलेले जंगल, किंवा लहान मुलांचे मन, किंवा चोराघरचे धन किंवा शेळीच्या गळ्यातील स्तन जसे निरुपयोगी, त्याप्रमाणे जे ज्ञान निरर्थक व शून्य असते त्याला मी तामसज्ञान म्हणतो॥ ५७६-५७८ ॥

**तेंही ज्ञान इया भाषा। बोलिजे तो भावो ऐसा। जात्यंधाचा कां जैसा। डोळा वाडु॥ ५७९ ॥**
**का बधिराचे नीट कान। अपेया नाम पान। तैसें आडनांव ज्ञान। तामसा तया॥ ५८० ॥**
**हें असो किती बोलावें। तरी ऐसें जें देखावें। तें ज्ञान नोहे जाणावें। डोळस तम॥ ५८१ ॥**

**अर्थ**—त्याला, ज्ञान ही भाषा वापरण्याचा भाव असा की जन्मजात आंधळ्याचे डोळे मोठे आहेत किंवा बहिऱ्याचे कान सुंदर आहेत, किंवा पिण्याला अयोग्य असलेल्या पेयाला पान हे म्हणणे जसे नाममात्र आहे, तसेच तामसज्ञानाला ज्ञान म्हणणे टोपण नावासारखे आहे॥ ५७९-५८० ॥ हे आता राहू दे. याविषयी किती बोलायचे! असे जे ज्ञान दृष्टीस पडते ते ज्ञान नव्हेच. तो प्रत्यक्ष अंधारच आहे॥ ५८१ ॥

**एवं तिहीं गुणीं। भेदलें यथालक्षणीं। ज्ञान श्रोतेशिरोमणी। दाविलें तुज॥ ५८२ ॥**
**आतां याचि त्रिप्रकारा। ज्ञानाचेनि धनुर्धरा। प्रकाशें होती गोचरा। कर्तयाच्या क्रिया॥ ५८३ ॥**
**म्हणौनि कर्म पैं गा। अनुसरे तिहीं भागां। मोहरें जालिया वोघा। पाणी जैसें॥ ५८४ ॥**
**तेंचि ज्ञानत्रयवशें। त्रिविध कर्म जें असे। तेथ सात्त्विक तंव ऐसें। परिस आधीं॥ ५८५ ॥**

**अर्थ**—अशा रीतीने, हे सर्वश्रेष्ठ श्रोत्या अर्जुना! याच गुणांनी झालेले ज्ञानाचे तीन प्रकार त्यांच्या यथार्थ स्वरूपासह तुला सांगितले॥ ५८२ ॥ हे अर्जुना! याच तीन प्रकारच्या ज्ञानाच्या प्रकाशाने कर्त्याच्या क्रिया झालेल्या दिसतात॥ ५८३ ॥ ज्याप्रमाणे ओघाला अनुसरून पाणी जाते, त्याप्रमाणे कोणतेही कर्म या तीन ज्ञानाच्या तीन वाटांना धरून घडत तसते॥ ५८४ ॥ हेच तीन प्रकारच्या ज्ञानाने होणारे तीन प्रकारचे जे कर्म आहे, त्यातील सात्विक कर्माचे लक्षण, प्रथम ऐक॥ ५८५ ॥

**नियतं सङ्गरहितमरागद्वेषतः कृतम्। अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते॥ २३ ॥**

**अर्थ**—जे फलाच्या प्राप्तीची इच्छा न करणाऱ्या कर्त्याकडून, रागद्वेषावांचून केलेले आसक्तिरहित नित्यकर्म, त्याला सात्विक कर्म म्हटले जाते॥ २३ ॥

**तरी स्वाधिकाराचेनि मार्गे। आलें जें मानिलें आंगें। पतिव्रतेचेनि परिष्वंगें। प्रियातें जैसें॥ ५८६ ॥**

**सांवळ्या आंगा चंदन। प्रमदालोचनीं अंजन। तैसें अधिकारासी मंडण। नित्यपणें जें॥ ५८७॥**
**तें नित्य कर्म भलें। होय नैमित्तिकीं सावाइलें। सोनयासि जोडलें। सौरभ्य जैसें॥ ५८८॥**

**अर्थ**—पतिव्रता स्त्री जशी आपल्या पतीला स्वाभाविकपणे आलिंगन देते, त्याप्रमाणे आपल्या अधिकारानुसार प्राप्त झालेले कर्म जो स्वाभाविकपणे आचरतो॥ ५८६ ॥ काळ्या शरीराला चंदनाची उटी किंवा तरुणीच्या डोळ्यात काजळ, त्याप्रमाणे अधिकारानुरूप प्राप्त झालेल्या नित्य कर्माचे आचरण भूषणावह असते॥ ५८७॥ ते नित्यकर्म चांगलेच असते व त्याला नैमित्तिक कर्माची जोड मिळाली तर सोन्याला सुगंधाचा लाभ होण्यासारखे आहे॥ ५८८ ॥

**आणि आंगा जीवाची संपत्ती। वेंचुनि बाळाची करी पाळती। परी जीवें उबगणें हे स्थिती। न पाहे माय॥ ५८९ ॥**
**तैसें सर्वस्वें कर्म अनुष्ठी। परी फळ न सूये दिठी। उखिती क्रिया पैठी। ब्रह्मींचि करी॥ ५९०॥**
**आणि प्रिय आलिया स्वभावें। सबल उरे वेचें ठाउवें नव्हे। तैलें सत्प्रसंगें करावें। पारुषे जरी॥ ५९१ ॥**
**तरी अकरणाचेनि खेदें। द्वेषातें जिवीं न बांधे। जालियाचेनि आनंदें। फुंजो नेणे॥ ५९२॥**
**ऐसेऐसिया हातवटिया। कर्म निफजे जें धनंजया। जाण सात्त्विक हें तया। गुणनाम गा॥ ५९३॥**
**ययावरी राजसाचें। लक्षण सांगिजेल साचें। न करी अवधानाचें। वाणेपण॥ ५९४॥**

**अर्थ**—मनाला शीणवून व देहाला शिजवून आई आपल्या मुलाचे संगोपन करते, पण मनाला कंटाळा, म्हणून असा तिला कधी वाटतच नाही॥ ५८९ ॥ त्याप्रमाणे सर्वस्वपणे कर्म करूनही फलाकडे दृष्टि ठेवत नाही. संपूर्ण कर्म ब्रह्माच्याच ठिकाणी अर्पण करतो॥ ५९० ॥ आपला आवडता माणूस घरी आला असता, त्याकरिता आपल्या जवळील अन्नसामुग्री खर्च झाली तरी आपल्या करिता ती उरेल किंवा संपेल याची जशी चिंता नसते, त्याप्रमाणे सत्प्रसंगी कर्म करावे, पण जर ते राहिले तरी न करण्यामुळे खेद किंवा द्वेष मानीत नाही. किंवा कर्म पूर्ण झाले तर आनंदाने फुगून जात नाही॥ ५९१-५९२ ॥ अशा युक्तीने, अर्जुना! जे कर्म घडते त्याला त्याच्या गुणावरून सात्विक असे नाव द्यावे॥ ५९३ ॥ यानंतर राजस कर्माचे यथार्थस्वरूप सांगणार आहे. लक्ष देण्यात उणेपणा येऊ देऊ नकोस॥ ५९४॥

**यत्तु कामेप्सुना कर्म साहङ्कारेण वा पुनः। क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम्॥ २४॥**

**अर्थ**—पण जे कर्म फल प्राप्तीची इच्छा करणाऱ्याकडून किंवा अहंकाराने युक्त असलेल्या पुरुषाकडून आटापिटा करून केले जाते ते राजसकर्म म्हटले जाते॥ २४॥

**तरी घरीं मातापितरां। धड बोली नाहीं संसारां। येर विश्व भरी आदरा। मूर्खु जैसा॥ ५९५॥**
**कां तुळशीचिया झाडा। दुरूनि न घापे सिंतोडा। द्राक्षीचिया तरी बुडा। दूधचि लाविजे॥ ५९६॥**
**तैसी नित्यनैमित्तिकें। कर्मे जियें आवश्यकें। तयांचेविषीं न शके। बैसला उठूं॥ ५९७॥**
**येरां काम्याचेनि तरी नांवें। देह सर्वस्व आघवें। वेंचितांही न मनवे। बहु ऐसें॥ ५९८॥**
**अगा देवढी वाढी लाहिजे। तेथ मोल देतां न धाइजे। पेरितां पुरे न म्हणिजे। बीज जेवीं॥ ५९९॥**
**कां परिसु जालिया हातीं। लोहालागीं सर्वसंपत्ती। वेंचितां ये उन्नती। साधक जैसा॥ ६००॥**
**तैसीं फळें देखोनि पुढें। काम्यकर्में दुवाडें। करी परी तें थोडें। केलेंही मानी॥ ६०१॥**

**अर्थ**—संसारात आई-वडिलाशी चांगले न बोलणारा मूर्ख सर्व जगाशी मात्र आदराचा व्यवहार करतो॥ ५९५॥ किंवा तुळशीच्या झाडाला दुरूनही पाण्याचा शिंतोडा न घालणारा द्राक्षाच्या बुडाला मात्र दूध देतो॥ ५९६॥ त्याप्रमाणे नित्यनैमित्तिक जी आवश्यक कर्मे त्याच्याविषयी मात्र बसल्या जागेवरून उठत सुद्धा नाही॥ ५९७॥ एऱ्हवी काम्य कर्माचे नाव येताच ते करण्याकरिता आपले सर्व शरीर जरी खर्ची घालावे लागले, तरी फार काही कष्ट झाले, असे वाटत नाही॥ ५९८॥ अर्जुना! दिडी दुपटीने जर आपल्याला लाभ होत असेल तर पैसा गुंतविणारा आता पुरे असे म्हणत नाही. किंवा बी पेरीत असताना आता पुरे असे ज्याप्रमाणे म्हणत नाही॥ ५९९॥ किंवा परीस ज्याच्या हाती आला त्या साधकाने लोखंडाकरिता सर्व संपत्ति जरी खर्च केली तरी त्याची भरभराटच होणार॥ ६००॥ त्याप्रमाणे पुढील फळाच्या आशेने दुःखदायक अशी काम्यकर्में कितीही केली तरी ती थोडीच केली असे मानतो॥ ६०१॥

**तेणें फळकामुकें। यथाविधि नेटकें। काम्य कीजे तितुकें। क्रियाजात॥ ६०२॥**
**आणि तयाही केलियाचे। तोंडीं लावी दौंडीचें। कर्मी या नामपाठाचे। वाणें सारी॥ ६०३॥**
**तैसा भरे कर्माहंकारु। मग पिता अथवा गुरु। ते न मनी काळज्वरु। औषध जैसें॥ ६०४॥**
**तैसेनि साहंकारें। फळाभिलाषियें नरें। कीजे गा आदरें। जें जें कांहीं॥ ६०५॥**
**परी तेंहि करणें बहुवसा। वळघोनि करी सायासा। जीवनोपावो कां जैसा। कोल्हाटियांचा॥ ६०६॥**
**एका कणालागीं उंदीरु। आसका उपसे डोंगरु। कां शेवाळोद्देशें दर्दुरु। समुद्रु डहुळी॥ ६०७॥**
**पाहीं भिकेपरतें न लाहे। तऱ्ही गारुडी सापु वाहे। काय कीजे शीणुचि होये। गोडु येका॥ ६०८॥**
**हें असो परमाणूचेनि लाभें। पाताळ लंघिती वोळंबे। तैसें स्वर्गसुखलोभें। विचंबणें जें॥ ६०९॥**
**तें काम्य कर्म सक्लेश। जाणावें येथ राजस। आतां चिन्ह परिस। तामसाचें॥ ६१०॥**

**अर्थ**—फळाच्या ठिकाणी आसक्त होऊन जेवढी म्हणून काम्य कर्मे आहेत ती सर्व शास्त्राने जसे सांगितले असेल त्याप्रमाणे रीतसर टापटीपीने तो करतो॥ ६०२॥ आणि तो जे जे करतो त्याची आपल्याच तोंडाने दवंडी पिटतो. आणि या सर्वांचा कर्ता मी आहे, अशी आपल्या नावाच्या थोरवीची वाणे वाटतो॥ ६०३॥ ज्याप्रमाणे मृत्युपर्यवसायी काळज्वर कोणत्याही औषधाला जुमानीत नाही, त्याप्रमाणे कर्माच्या कर्तृत्वाच्या अहंकाराने भारलेला पुरुष आपले वडील किंवा गुरु यांना जुमानीत नाही॥ ६०४॥ तसेच फळाच्या अभिलाषेने अहंकारयुक्त होऊन मनुष्याकडून जे जे काही आदराने केले जाते. पण तेही करणे, डोंबारी लोकांच्या जीवनाचे साधन जसे कष्टमय, तसे कष्टमय असते॥ ६०५-६०६॥ धान्याच्या एका दाण्याकरिता उंदीर संपूर्ण डोंगर उपसतो. किंवा शेवाळाच्या आशेने बेडूक समुद्र ढवळतो॥ ६०७॥ भिके परता जास्त काहीही पदरात पडत नसताना सुद्धा गारुडी सापाचे ओझे वाहतो. पण काय सांगावे! काहीना कष्टच गोड वाटतात॥ ६०८॥ हे असो! एका कणाच्या लाभासाठी वाळवी संपूर्ण पाताळ जसे पालथे घालते त्याप्रमाणे स्वर्गाच्या सुखाच्या लोभाने केवळ जे श्रम पावणे आहे ते कष्टयुक्त काम्यकर्म राजस आहे असे समज. आता तामस कर्माचे स्वरूप ऐक॥ ६१०॥

**अनुबन्धं क्षयं हिंसामनवेक्ष्य च पौरुषम्। मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते॥ २५॥**

**अर्थ**—जे कर्म, मागून होणारा परिणाम, शक्तीचा व धनाचा क्षय, प्राण्याची पीडा आणि आपले सामर्थ्य याचा विचार न करिता मोहाने आरंभिले जाते त्याला तामसकर्म म्हटले जाते॥ २५॥

**तरी तें गा तामस कर्म। जें निंदेचें काळें धाम। निषेधाचें जन्म। साच जेणें॥ ६११॥**
**जें निपजविल्यापाठीं। कांहींच न दिसे दिठी। रेघ काढिलिया पोटीं। तोयाचे जेवीं॥ ६१२॥**
**कां कांजी घुसळलिया। कां राखोंडी फुंकलिया। कांहीं न दिसे गाळिलिया। वाळु घाणां॥ ६१३॥**
**नाना उपणिलिया भूंस। कां विंधिलिया आकाश। नाना मांडिलिया पाश। वारयासी॥ ६१४॥**
**हें अवघेंचि जैसें। वांझें होऊनि नासे। जें केलिया पाठीं तैसें। वायांचि जाय॥ ६१५॥**

**अर्थ**—जे कर्म निंदेचे पापघर आहे व ज्याच्या योगाने खरीच निषिद्धता जन्मास येते, त्याला तामस कर्म म्हणतात॥ ६११॥ ज्याप्रमाणे पाण्यावर काढलेली रेघ निष्फळ त्याप्रमाणे जे कर्म घडल्यानंतर दृष्टीला काहीच (अपेक्षित) दिसत नाही॥ ६१२॥ किंवा पेज घुसळली असता किंवा राख फुंकली असता किंवा वाळू घाण्यात गाळली असता कांहीच (फलांच्या दृष्टीने) मिळत नाही॥ ६१३॥ किंवा भुसा पाखडला असता किंवा आकाशाला छिद्र पाडले असता किंवा वाऱ्याला पकडण्या करिता पाश टाकला असता॥ ६१४॥ हे सर्व ज्याप्रमाणे निष्फळ होऊन नाश पावते त्याप्रमाणे जे कर्म केल्यानंतर व्यर्थ होते॥ ६१५॥

**एऱ्हवीं नरदेहाही येवढें। धन आटणीये पडे। जें कर्म निफजवितां मोडे। जगाचें सुख॥ ६१६॥**
**जैसा कमळवनीं फांसु। काढिलिया कांटसु। आपण झिजे नाशु। कमळां करी॥ ६१७॥**

**अर्थ**—वास्तविक पाहता मनुष्य जन्मासारखे अमूल्य धन खर्ची पडूनही जे कर्म घडते त्याने जगतातील

सुख नाहीसे होते॥ ६१६॥ ज्याप्रमाणे कमळाच्या वनामध्ये काटेरी फास ओढला असता काटे झिजतात व कमळाचा नाश होतो॥ ६१७॥

**कां आपण आंगें जळे। आणि नागवी जगाचे डोळे। पतंगु जैसा सळें। दीपाचेनि॥ ६१८॥**
**तैसें सर्वस्व वायां जावो। वरी स्वदेहाही होय घावो। परी पुढीलां अपावो। निफजविजे जेणें॥ ६१९॥**
**मासी आपणयातें गिळवी। परी पुढीला वांती शिणवी। तें कश्मळ आठवी। आचरण जें॥ ६२०॥**

**अर्थ**—किंवा दिव्याचा प्रकाश दिसताच पतंग दिव्याच्या द्वेषाने ज्याप्रमाणे दिव्यावर उडी घेतो आणि स्वत: जळून जगाला अंधार करतो॥ ६१८॥ त्याप्रमाणे आपले सर्वस्व व्यर्थ गेले व आपल्या देहालाही दु:ख झाले तरी चालेल, पण ज्या कर्माने दुसऱ्यांना अपाय केला जातो॥ ६१९॥ माशी आपल्याला गिळून घेते पण दुसऱ्याला वांतीचे कष्ट घडविते, असे हे तामस कर्माच्या किळसवाण्या आचरणाची आठवण करून देते॥ ३२०॥

**तेंही करावया दोषें। मज सामर्थ्य असे कीं नसे। हेंही पुढील तैसें। न पाहतां करी॥ ६२१॥**
**केवढा माझा उवावो। करितां कोण प्रस्तावो। केलियाही आवो। काय येथ॥ ६२२॥**

**अर्थ**—ते दोषयुक्त कर्म करण्यास आपल्यात सामर्थ्य आहे की नाही याचाही पुढचा विचार न करतातच. तो ते करतो॥ ३२१॥ आपला प्रयत्न केवढा, प्रसंग कोणता आणि आपले सामर्थ्य ते येथे काय?॥ ६२२॥

**इये जाणिवेची सोये। अविवेकाचेनि पायें। पुसोनियां होये। साटोप कर्मी॥ ६२३॥**
**आपुला वसौटा जाळुनी। बिसाटे जैसा वन्ही। कां स्वमर्यादा गिळोनि। सिंधु उठी॥ ६२४॥**
**मग नेणे बहु थोडें। न पाहे मागें पुढें। मार्गामार्ग येकवढे। करीत चाले॥ ६२५॥**

**अर्थ**—अशा प्रकारच्या ज्ञानाचा मार्ग अविवेकाच्या पायाने लाथाडतो आणि कर्माचा खटाटोप करतो॥ ६२३॥ आपले वसतिस्थान जाळून टाकून अग्नि ज्याप्रमाणे भडकतो किंवा समुद्र आपली मर्यादा सोडून देऊन (चंद्राचे दर्शन झाले असतां) उसळतो॥ ६२४॥ मग कमी किंवा जास्त लक्षात न घेता, मागे पुढे न पाहता, वाट व अव्हाट यांचा एकंकार करून (त्यांचा विवेक न करता) आपली वाटचाल करीत असतो॥ ६२५॥

**तैसें कृत्याकृत्य सरकटित। आपपर नुरवित। कर्म होय तें निश्चित। तामस जाण॥ ६२६॥**

**अर्थ**—याप्रमाणे करण्यासारखे (उचित) व न करण्यासारखे (अनुचित) यांना सरसकट मिसळून (म्हणजे यांचा विचार न करता) आपले किंवा दुसऱ्याचे हा भेद शिल्लक न ठेवता जे कर्म होते ते निश्चयेकरून तामस कर्म समज॥ ६२६॥

**ऐसी गुणत्रयभिन्ना। कर्माची गा अर्जुना। हे केली विवंचना। उपपत्तींसीं॥ ६२७॥**
**आतां ययाचि कर्मा भजतां। कर्माभिमानिया कर्ता। तो जीवुही त्रिविधता। पातला असे॥ ६२८॥**
**चतुराश्रमवशें। एकु पुरुषु चतुर्धा दिसे। कर्तया त्रैविध्य तैसें। कर्मभेदें॥ ६२९॥**
**परी तयां तिहींआंतु। सात्त्विक तंव प्रस्तुतु। सांगेन दत्तचित्तु। आकर्णी तूं॥ ६३०॥**

**अर्थ**—याप्रमाणे अर्जुना! सत्व, रज, तम या तीन गुणांच्यामुळे भिन्न भिन्न झालेल्या कर्माचे सोपपत्तिक विवरण केले॥ ९२७॥ आता हे कर्म करणारा व त्या कर्माच्या कर्तेपणाचा अहंकार धारण करणारा जीवही तीन प्रकारचा होतो॥ ६२८॥ ज्याप्रमाणे एकच पुरुष चार आश्रमांच्या योगाने चार प्रकारचा दिसतो, त्याप्रमाणे कर्माच्या भिन्नत्वानुसार (सत्व, रज, तम) कर्त्याच्या आंगीही त्रिविधता येते॥ ६२९॥ परंतु तिन्हींमध्ये पहिला जो सात्विककर्ता, त्याचें विवेचन करतो, ते तू नीट लक्ष देऊन ऐक॥ ६३०॥

**मुक्तसङ्गोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वित: । सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकार: कर्ता सात्त्विक उच्यते॥ २६॥**

**अर्थ**—हिम्मतीने व उत्साहाने, फळाची आशा न धरता, निरहंकारवृत्तीने कर्म करीत असताना कर्माचे फळ मिळाले किंवा न मिळाले तरी ज्याचे मन निर्विकार असते त्याला सात्त्विक कर्ता म्हणतात॥ २६॥

**तरी फळोद्देशें सांडिलिया। वाढिती जेवीं सरळिया। शाखा कां चंदनाचिया। बावन्नया॥ ६३१॥**

**कां न फळतांही सार्थका। जैसिया नागलतिका। तैसिया करी नित्यादिकां। क्रिया जो कां॥ ६३२॥**
**परी फलशून्यता। नाहीं तया विफळता। पैं फळासीचि पांडुसुता। फळें कायिसी॥ ६३३॥**

**अर्थ**—मलयागिरीवरील उत्तम प्रकारच्या चंदनाच्या झाडांना फळे येत नसली तरी त्या झाडांच्या फांद्या सरळच वाढत जातात॥ ६३१ ॥ किंवा फळ न येताही ज्याप्रमाणे नागवेलीची झाडे उपयोगाची असतात. (कारण त्यांची पाने उपयोगी पडतात) त्याप्रमाणे जो नित्यनैमित्तिक कर्मे करतो॥ ६३२॥ परंतु या फळशून्यतेमुळे त्याला फोलपण येत नाही. कारण अर्जुना! फळालाच फळे कधी येतात काय? (निष्फलता हेच त्या सात्विक कर्त्याच्या कर्माचे फळ आहे. त्याला आता आणखी फळ कसे लागणार? हा भाव)

**गूढार्थदीपिका**—नित्य कर्मे भगवंतानी मला करायला सांगितली आहेत व भगवंताची आज्ञा पालन करणे हे आपले कर्तव्य आहे, असे समजून भगवंताच्या प्रेमामुळे तो ती नित्यकर्मे आचरीत असतो. त्यामुळे त्या कर्मा विषयीची आसक्ती किंवा त्यापासून होणारा लाभ याविषयी त्याच्या मनात कोणताही भाव राहत नाही. भगवंताचे प्रेमच फक्त त्याच्या अंत:करणात असते.

कर्माविषयी व त्यापासून होणाऱ्या फळाविषयी अशा रीतीने अनासक्ति त्याच्या मनात असल्या कारणाने त्याची ती कर्मे निरहंकार पूर्वक व फलाशारहित होत असतात. कर्माचे आचरण करतांना त्याचे ध्येयच निष्फळता असल्यामुळे त्याच निष्फळतेची प्राप्ती त्यामुळे कर्मानंतर होणार, आतां या निष्फळतेला आणखी फळ ते काय लागणार! झाडाच्या जीवनाची सार्थकता फळातच असते.

**आणि आदरें करी बहुवसें। परी कर्ता मी हें नुमसे। वर्षाकाळींचे जैसें। मेघवृंद॥ ६३४॥**
**तेवींचि परमात्मलिंगा। समर्पावयाजोगा। कर्मकलापु पैं गा। निपजावया॥ ६३५॥**
**तया काळातें नुलंघणें। देशशुद्धिही साधणें। कां शास्त्रांच्या वातीं पाहणें। क्रियानिर्णयो॥ ६३६॥**

**अर्थ**—वर्षाकाळी मेघाचे समूह एकत्र येऊन पृथ्वीवर पावसाचा वर्षाव करतात, पण आपण वर्षाव केला हे ते जाणत नाहीत. त्याप्रमाणे अत्यंत आदराने कर्मे करूनही ज्याच्या ठिकाणी मी कर्माचा कर्ता आहे ही अहंकाराची वृत्ति उठत नाही॥ ६३४-६३५॥ त्याप्रमाणे परमेश्वराला समर्पण करण्यायोग्य अशी कर्मे करण्याकरिता कालाची मर्यादा न सोडता देशाची शुद्धी साधून कर्माच्या योग्यायोग्यतेचा निर्णय शास्त्राच्या दिव्याने करतो॥ ६३६॥

**वृत्ती करणें येकवळा। चित्त जावों न देणें फळा। नियमांचिया सांखळा। वाहणें सदा॥ ६३७॥**
**हा निरोधु साहावयालागीं। धैर्याचिया चांगचांगी। जिंतवणी जिती आंगीं। वाहे जो कां॥ ६३८॥**
**आणि आत्मयाचिये आवडी। कर्मे करितां वरपडीं। देहसुखाचिये परवडी। येवों न लाहे॥ ६३९॥**
**ऐसा निद्रा दुऱ्हावे। क्षुधा न बाणवे। सुरवाडु न पावे। आंगाचा ठावो॥ ६४०॥**
**तंव अधिकाधिक। उत्साहो धरी आगळीक। सोनें जैसें तुक। तुटलिया कसीं॥ ६४१॥**
**जरी आवडी आथी साच। तरी जीवितही सलंच। आगीं घालितां रोमांच। देखिजती सतिये॥ ६४२॥**
**मा आत्मयायेवढीया प्रिया। वालभेला जो धनंजया। देहही सिदतां तया। काय खेदु होईल॥ ६४३॥**
**म्हणौनि विषयसुरवाडु तुटे। जंव जंव देहबुद्धि आटे। तंव तंव आनंदु दुणवटे। कर्मीं जया॥ ६४४॥**

**अर्थ**—इंद्रियें व अंत:करणवृत्ति यांना बांधून चित्ताला फलाकडे जाऊ न देता जो शास्त्रांच्या नियमांची बेडी नित्य पायात बाळगतो (शास्त्राचे बंधन पाळतो)॥ ६३७॥ हे निर्बंध सहन करण्याकरिता उत्कृष्ट धैर्य आपले ठिकाणीं असावे म्हणून जो जागती चिंता वाहत राहतो॥ ६३८॥ आणि आत्मप्राप्तीच्या तळमळीमुळे (अधिकारानुसार प्राप्त झालेली) कर्मे करीत असता देहाच्या सुखाची पर्वा करीत नाही॥ ६३९॥ तो (आळस) व झोप टाकून देतो. त्याला भुकेचीही आठवण होत नाही आणि शरीराची सुखावस्था त्याला रुचत नाही॥ ६४०॥ सोनें ज्याप्रमाणे मुशीत टाकले असता (हीणकस भाग जळल्यामुळे) वजनात कमी भरले तरी कसाला जास्त उतरते त्याप्रमाणे कर्म करण्याविषयी त्याचा उत्साह अधिकाधिक वाढतच जातो॥ ६४१॥ खरोखर जर प्रेम असेल तर त्याच्यापुढे जीवंत राहणेही सहन

होत नाही. पतिव्रता स्त्रियेच्या ठिकाणी (सती जाताना) अग्नीत उडी टाकते वेळी आनंदाचे आंगावर शाहारे उमटलेले दिसतात॥ ६४२॥ मग अर्जुना! आत्मस्वरूपा सारख्या प्रियकरावर ज्याचे प्रेम बसेल त्याच्या देहाला कष्ट झाले तरी दु:ख होईल काय?॥ ६४३॥ म्हणून विषयांच्या सुखाची इच्छा नाहीशी होऊन जशी जशी देहाविषयीची आसक्ति कमी कमी होत जाते तसतसा (शास्त्रोक्त) कर्म करण्याविषयीचा त्याचा आनंद दुणावत जातो॥ ६४४॥

**ऐसेनि जो कर्म करी। आणि कोणे एके अवसरीं। तें ठाके ऐसी परी। वाहे जरी॥ ६४५॥**
**तरी कडाडीं लोटला गाडा। तो आपणपें न मनी अवघडा। तैसा ठाकलेनिही थोडा। नोहे जो कां॥ ६४६॥**
**नातरी आदरिलें। अव्यंग सिद्धी गेले। तरी तेंही जिंतिलें। मिरवूं नेणे॥ ६४७॥**
**इया खुणा कर्म करितां। देखिजे जो पांडुसुता। तयातें म्हणिपे तत्त्वता। सात्त्विकु कर्ता॥ ६४८॥**
**आतां राजसा कर्तेया। वोळखणें हें धनंजया। जे अभिलाषा जगाचिया। वसौटा तो॥ ६४९॥**

**अर्थ**—याप्रमाणे जो कर्म करतो व एखादेवेळी ते कर्म बंद पडले असा प्रसंग आला॥ ६४५॥ तरी जसे कड्यावरून गाडा पडून मोडला तरी त्याचे त्याला दु:ख होत नाही त्याप्रमाणे कर्म बंद पडले तरी तो (सात्विक कर्ता) यत्किंचितही दु:खी होत नाही॥ ६४६॥ किंवा आरंभिलेले कर्म कोणताही व्यत्यय न येता पूर्णपणे सिद्धीला गेले तरी आपण ते पार पाडले याबद्दल तो अभिमानही मिरवीत नाही॥ ६४७॥ अर्जुना! अशा लक्षणांनी कर्म करणारा जो पाहशील त्यालाच खरोखर सात्विक कर्ता म्हणावे॥ ६४८॥ आता, धनंजया! लौकिक बाबतीचे वसतिस्थान असलेला असा जो राजसकर्ता त्याला ओळखण्याचे लक्षण असे॥ ६४९॥

**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचि:। हर्षशोकान्वित: कर्ता राजस: परिकीर्तित:॥ २७॥**

**अर्थ**—विषयाचे ठिकाणी आसक्त, कर्माच्या फळाची इच्छा करणारा, लोभी, हिंसा करणारा, अपवित्र, सुखदु:खानी युक्त असलेला असा जो त्याला राजसकर्ता म्हणतात॥ २७॥

**जैसा गांवींचिया कश्मळा। उकरडा होय येकवळा। कां स्मशानीं अमंगळा। आघवयांचि॥ ६५०॥**
**तयापरी जो अशेषा। विश्वाचिया अभिलाषा। पायपाखाळणिया देखा। घरटा जाला॥ ६५१॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे गावातील घाणेरडे पदार्थ टाकण्याचे एकमेव ठिकाण उकरडा असतो किंवा श्मशानात सर्वत्र अमंगळच असते. त्याप्रमाणे जो विश्वातील यच्चयावत् वासनांच्या दोषांचा पाय धुण्याचे आश्रयस्थान होतो॥ ६५०-६५१॥

**म्हणोनि फळाचा लागु। देखे जिये असलगु। तिये कर्मीं चांगु। रोहो मांडी॥ ६५२॥**
**आणि आपण जालिये जोडी। उपखों नेदी कवडी। क्षणक्षणा कुरोंडी। जीवाची करी॥ ६५३॥**

**अर्थ**—म्हणून सुलभतेने ज्या फळाचा लाभ साधण्यासारखा त्याला दिसत असेल त्या कर्माची आदराने सुरुवात करतो॥ ६५२॥ आणि कर्मापासून झालेल्या लाभाचा फायदा आपणच घ्यावयाचा, त्यातील एक कवडी देखील खर्च न करता क्षणोक्षणी आपले प्राण देखील ओवाळून टाकण्यास तो सिद्ध होतो॥ ६५३॥

**कृपणु चित्तीं ठेवा आपुला। तैसा दक्षु पराविया माला। बकु जैसा खुतला। मासेयासी॥ ६५४॥**

**अर्थ**—कद्रू माणूस अंत:करणात सदा सर्वकाळ आपल्या ठेवीविषयी जसा सावध असतो किंवा मासा हाती गवसावा, म्हणून बगळा जसा तटस्थ बसतो त्याप्रमाणे तो (राजसकर्ता) दुसऱ्याच्या मालाविषयी दुसऱ्याचा माल कसा हडपता येईल याविषयी दक्ष असतो॥ ६५४॥

**आणि गोंवी गेलिया जवळी। झगटलिया अंग फाळी। फळे तरी आंतु पोळी। बोरांटी जैसी॥ ६५५॥**
**तैसें मने वाचा कायें। भलतया दु:ख देतु जाये। स्वार्थु साधितां न पाहे। पराचें हित॥ ६५६॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे बोरीचे झाड, जवळ गेले तर अडकविते (कपडे वगैरे काट्यात अडकतात). हिसकाहिसकी केली तर आंगाची कातडी काढते व फळायला लागली तर आत मात्र पोकळ असते. त्याप्रमाणे शरीराने, मनाने व बोलून, कोणीही दुसरा असला तर त्याला दु:खच देत जायचे. आपला स्वार्थ साधताना दुसऱ्याचे हित पहावयाचे नाही॥ ६५५-६५६॥

**तेवींच आंगें कर्मीं। आचरणें नोहे क्षमी। न निघे मनोधर्मीं। अरोचकु॥ ६५७॥**
**कनकाचिया फळा। आंतु माज बाहेरी मौळा। तैसा सबाह्य दुबळा। शुचित्वें जो॥ ६५८॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे आरंभलेले कर्म (काम्य) शारीरिक सामर्थ्य नसतानाही त्याच्या ठिकाणी त्या कर्माविषयी मनात अरुचि निर्माण होत नाही॥ ६५७॥ ज्याप्रमाणे धोतऱ्याच्या फळाला आतून कैफ आणणारा गर व बाहेरून काटेरी कवच असते त्याप्रमाणे शुचित्वाच्या दृष्टीने तो आतून व बाहेरून करंटा असतो॥ ६५८॥

**आणि कर्मजात केलिया। फळ लाहे जरी धनंजया। तरी हरिखें जगा यया। वांकुलिया वाये॥ ६५९॥**

**अर्थ**—आणि अर्जुना! केलेल्या कर्माचे फळ जर त्याला प्राप्त झाले तर हर्षातिरेकाने तो जगाला वाकुल्या दाखवितो॥ ६५९॥

**अथवा जें आदरिलें। हीनफळ होय केलें। तरी शोकें तेणें जिंतिलें। धिक्कारों लागे॥ ६६०॥**
**कर्मीं राहाटी ऐसी। जयातें होती देखसी। तोचि जाण त्रिशुद्धीसी। राजस कर्ता॥ ६६१॥**
**आतां यया पाठी येरु। जो कुकर्माचा आगरु। तोही करूं गोचरु। तामस कर्ता॥ ६६२॥**

**अर्थ**—किंवा एखादे कर्म करून फलप्राप्ती झाली नाही तर शोकापन्न होऊन कर्माचा धिक्कार करू लागतो॥ ६६०॥ कर्म करण्याच्या बाबतीत अशा तऱ्हेची वागणूक ज्याची दिसून येईल तो निश्चित राजस कर्ता होय असे जाण॥ ६६१॥ आता यापुढे वाईट कृत्यांचे आगरच असलेला जो तामस कर्ता त्याचेही विवरण करू॥ ६६२॥

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः। विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते॥ २८॥**

**अर्थ**—अजितेंद्रिय, मूर्ख, ताठर, कपटी, परोत्कर्ष सहन न करणारा, आळशी, दुर्मुख व चेंगट असा जो कर्ता त्याला तामसकर्ता म्हणतात॥ २८॥

**तरी मीयां लागलिया कैसें। पुढील जळत असे। हें नेणिजे हुताशें। जियापरी॥ ६६३॥**
**पैं शस्त्रें मियां तिखटें। नेणिजे कैसेनि निवटे। कां नेणिजे काळकूटें। आपलें केलें॥ ६६४॥**
**तैसा पुढीलया आपुलया। घातु करीत धनंजया। आदरी वोखटिया। क्रिया जो कां॥ ६६५॥**
**तिया करितांही वेळीं। काय जालें हें न सांभाळी। चळला वायू वाहटुळी। चेष्टे तैसा॥ ६६६॥**
**पैं करणिया आणि जया। मेळु नाहीं धनंजया। तो पाहुनी पिसेया। कैंची त्राय॥ ६६७॥**

**अर्थ**—तरी माझ्या स्पर्शाने समोर येणाऱ्या वस्तू कशा जळतात हे जसे अग्नीला समजत नाही॥ ६६३॥ किंवा आपल्या तीक्ष्ण धारेने लोक कसे मरतात हे जसे शस्त्रांना समजत नाही किंवा आपली करणी (जीव घेण्याची) जशी काळकूटाला कळत नाही॥ ६६४॥ त्याप्रमाणे, अर्जुना! आपल्यापुढे येणाऱ्यांचा घात करण्यासाठी वाईट कर्म करण्यास जो प्रवृत्त होतो॥ ६६५॥ ती कर्मे करीत असताना वावटळीचा वारा जसा सैरावैरा वाहतो त्याप्रमाणे जो परिणामाकडे लक्ष न देता कर्म करीतच राहतो॥ ६६६॥ आणि अर्जुना! तो व त्याची कृती यांच्यात कसलाच मेळ नसतो. याच्या पुढे वेड्याची किंमत ती काय॥ ६६७॥

**आणि इंद्रियांचें वैरिलें। चरोनि राखें जो जियालें। बैलातळीं लागले। गोचिड जैसें॥ ६६८॥**
**हांसया रुदना वेळु। नेणतां आदरी बाळु। राहाटे उच्छृंखळु। तयापरी॥ ६६९॥**
**जो प्रकृती आंतलेपणें। कृत्याकृत्यस्वादु नेणे। फुगे केरें धालेपणें। उकरडा जैसा॥ ६७०॥**

**अर्थ**—आणि बैलाच्या पोटाला लागलेल्या गोचिडाप्रमाणे इंद्रियांनी वाढलेल्या विषयांवर चरून जो आपला जीवननिर्वाह करतो॥ ६६८॥ ज्याप्रमाणे तान्ह्या मुलाला हासण्याला व रडण्याला काळवेळ राहत नाही त्याप्रमाणे ज्याच्या वागण्यात ताळतंत्र राहत नाही॥ ६६९॥ प्रकृतीच्या स्वाधीन झाल्यामुळे ज्याला योग्य काय, अयोग्य काय याचा सारासार विचार राहत नाही. व केरकचरा सांचल्यामुळे ज्याप्रमाणे उकिरडा फुगावा त्याप्रमाणे जो खोट्या समाधानाने फुगतो॥ ६७०॥

**म्हणोनि मान्याचेनि नांवें। ईश्वराही परी न खालवे। स्तब्धपणें न मनवे। डोंगरासी॥ ६७१॥**

**अर्थ**—म्हणून मोठेपणाच्या जाणीवेने जो ईश्वरापुढेही वाकत नाही व अहंकाराच्या ताठ्यामुळे डोंगरालाही देखील कस्पटाप्रमाणे समजतो॥ ६७१ ॥

**आणि मन जयाचें कलाली। राहटी फुडी चोरिली। दिठी कीर ते वोली। पण्यांगनेची॥ ६७२ ॥**
**किंबहुना कपटाचें। देहचि वळिलें तयाचें। तें जिणें कीं जुवाराचें। टिटेघर॥ ६७३ ॥**
**नोहे तयाचा प्रादुर्भावो। तो साभिलाष भिल्लांचा गांवो। म्हणोनि नये येवों जावों। तया वाटा॥ ६७४ ॥**

**अर्थ**—आणि ज्याचे मन कपटी व वागणूक पक्की चोरासारखी, दृष्टि तर खरोखर वेश्येसारखीच कपटी प्रेमाने युक्त असते॥ ६७२ ॥ फार काय सांगावे! त्याचा सारा देह कपटाचाच बनलेला असतो. त्याचे आयुष्य म्हणजे रिठ्या वरच्या (वाईट कृत्याच्या) जुगाराचा अड्डाच होय॥ ६७३ ॥ त्याचा मूर्तिमंत अवतार म्हणजे स्वार्थाने भरलेल्या वाटमारी करणाऱ्या भिल्लांचा गावच नव्हे काय? (होय) म्हणून त्या गावाकडे येऊ व जाऊ नये॥ ६७४ ॥

**आणि आणिकांचें निकें केलें। विरु होय जया आलें। जैसें अपेय पया मिनलें। ल्वण करी॥ ६७५ ॥**
**कां हींव ऐसा पदार्थु। घातला आगीआंतु। तेचि क्षणीं धडाडितु। अग्नि होय॥ ६७६ ॥**
**नाना सुद्रव्यें गोमटीं। जालिया शरीरीं पैठीं। होऊनि ठाती किरीटी। मळुचि जेवीं॥ ६७७ ॥**
**जैसें पुढिलाचें बरवें। जयाच्या भीतरीं पावे। आणि विरुद्धचि आघवें। होऊनि निगे॥ ६७८ ॥**
**जो गुण घे दे दोष। अमृताचें करी विष। दूघ पाजिलिया देख। व्यालु जैसा॥ ६७९ ॥**

**अर्थ**—आणि ज्याप्रमाणे दुधात मीठ टाकले असता ते पिण्याला अयोग्य होते त्याप्रमाणे दुसऱ्याचे चांगले झालेले पाहून ज्याला (आपल्या) विरुद्ध (काही) झाले असे वाटते॥ ६७५ ॥ किंवा थंड असा पदार्थ अग्नीत टाकला तर तो त्याचक्षणी धडधडित पेटून अग्नीच होतो॥ ६७६ ॥ किंवा अर्जुना! ज्याप्रमाणे कितीही उत्तम उत्तम पदार्थ पोटात गेले असता शेवटी त्यांचा मळच होतो॥ ६७७ ॥ त्याप्रमाणे दुसऱ्याचे चांगले झालेल्याची बातमी त्याला कळली रे कळली की, त्याला ती सहन न होऊन पूर्णपणें ती वाईटरूपाने बाहेर पडलीच म्हणून समजावी॥ ६७८ ॥ सापाला दूध पाजले असता तो जसे दुधाचे विष करतो त्याप्रमाणे दुसऱ्याचे गुण ऐकल्या बरोबर तो त्यांना दोषदृष्टीने पाहून त्याची निंदा करू लागतो॥ ६७९ ॥

**आणि ऐहिकीं जियावें। जेणें परत्रा साच यावें। तें उचित कृत्य पावे। अवसरीं जिये॥ ६८० ॥**
**तेव्हां जया आपैसी। निद्रा ये ठेविली ऐसी। दुर्व्यवहारीं जैसी। विटाळें लोटे॥ ६८१ ॥**
**पैं द्राक्षरसा आम्ररसा। वेळे तोंड सडे वायसा। कां डोळे फुटती दिवसा। डुडुळाचे॥ ६८२ ॥**
**तैसा कल्याणकाळु पाहे। तैं तयातें आळसु खाये। ना प्रमादीं तरी होये। तो म्हणे तैसें॥ ६८३ ॥**

**अर्थ**—आणि ज्यायोगाने इहलोकीं कीर्ति होईल व परलोकीही सद्‌गती मिळेल असे सत्कर्म करण्याचा जेव्हा प्रसंग येतो॥ ६८० ॥ तेव्हा त्याला आपोआप झोप ठेवल्यासारखी येते. आणि वाईट कर्म करतेवेळी मात्र ती (झोप) जणुकाय विटाळ होईल म्हणूनच दूर पळते॥ ६८१ ॥ द्राक्षाच्या किंवा आंब्याच्या मोसमात कावळ्याला मुखरोग होतो किंवा घुबडाचे डोळे दिवसाचे वेळी जसे आंधळे होतात॥ ६८२ ॥ त्याप्रमाणे कल्याण साधण्याची वेळ आली असता त्याला आळस खातो आणि चूक होण्याच्या वेळी मात्र तो म्हणेल त्याप्रमाणे होते. (म्हणजे आळस झटकून तो उत्साहाने कर्माला प्रवृत्त होतो)॥ ६८३ ॥

**जेवींचि सागराच्या पोटीं। जळे अखंड आगिठी। तैसा विषादु वाहे गांठीं। जिवाचिये जो॥ ६८४ ॥**
**लेंडोराआगीं धूमावधि। कां अपाना आंगीं दुर्गंधि। तैसा जो जीवितावधि। विषादें केला॥ ६८५ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे समुद्राच्या पोटातील वडवाग्नी सतत जळत असतो त्याप्रमाणे अंत:करणात जो (दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न झाल्यामुळे) सतत (मत्सराचे) दु:ख बाळगत असतो॥ ६८४ ॥ ज्याप्रमाणे लेंड्यांच्या विस्तवात शेवटपर्यंत धूरच धूर असतो किंवा अपानद्वाराने निघणारा वायू जसा दुर्गंधयुक्तच असतो, त्याप्रमाणे जो जन्मभर विषादाने ग्रासलेला असतो॥ ६८५ ॥

**आणि कल्पांताचिया पारा। वेगळेंही जो वीरा। सूत्र धरी व्यापारा। साभिलाषा॥ ६८६॥**
**अगा जगाही परौती। शुचा वाहे पैं चित्तीं। करितां विषीं हातीं। तृणही न लगे॥ ६८७॥**
**ऐसा जो लोकाआंतु। पापपुंजु मूर्तु। देखसी तो अव्याहतु। तामसु कर्ता॥ ६८८॥**
**एवं कर्म कर्ता ज्ञान। या तिहींचे त्रिधा चिन्ह। दाविलें तुज सुजन-। चक्रवर्ती॥ ६८९॥**

**अर्थ**—हे वीरा अर्जुन! आणि जो कल्पांताच्याही पलीकडील फलप्राप्तीच्या अभिलाषेने काम्य कर्मे करण्याचे सूत्र धरतो॥ ६८६॥ अरे! जो जगाच्या पलीकडील गोष्टीविषयी अंत:करणात चिंता वाहतो. पण ज्याविषयी चिंता वाहतो त्यापैकी एका गवताच्या काडी इतकाही लाभ त्याला होत नाही॥ ६८७॥ अशाप्रमाणे लोकामध्ये मूर्तिमंत पापांची राशी असा जो पाहशील तो निर्विवाद तामसकर्ता होय॥ ६८८॥ अशा प्रकारे कर्म, कर्ता व ज्ञान या तिघांचीही तीन लक्षणें, हे सज्जन शिरोमणी अर्जुना! तुला दाखवून दिली॥ ६८९॥

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु। प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनञ्जय॥ २९॥**

**अर्थ**—अर्जुना, गुणांच्या योगाने झालेले बुद्धीचे व धैर्याचे तीन प्रकारचे भेद पूर्णपणे वेगवेगळे तुला सांगतो, ते तू ऐक॥ २९॥

**आतां अविद्येच्या गांवीं। मोहाची वेढूनि मदवी। संदेहाचीं आघवीं। लेऊनि लेणीं॥ ६९०॥**
**आत्मनिश्चयाची बरव। जया आरिसां पाहे सावयव। तिये बुद्धीचीही धांव। त्रिधा असे॥ ६९१॥**

**अर्थ**—आतां अज्ञानरूपी गावात मोहाचे वस्त्र नेसून व संशयरूपी सर्व अलंकार घालून जीवाच्या यथार्थ स्वरूपाच्या निश्चयाची शोभा ज्या आरशात स्पष्ट दिसते त्या बुद्धीची धावही तीन प्रकारची आहे॥ ६९०-६९१॥

**अगा सत्त्वादि गुणीं इहीं। काइ एक तिहीं ठायीं। न कीजेचि येथ पाहीं। जगामाजीं॥ ६९२॥**
**आगी न वसतां पोटीं। कवण काष्ठ असे सृष्टी। तैसें तें कैचें दृश्यकोटीं। त्रिविधा जें नोहे॥ ६९३॥**
**म्हणौनि तिहीं गुणीं। बुद्धी केली त्रिगुणीं। धृतीसिही वांटणी। तैसीचि असे॥ ६९४॥**
**तेंचि येक वेगळालें। येथ चिन्हीं अळंकारलें। सांगिजेल उपाइलें। भेदलेपणें॥ ६९५॥**
**परी बुद्धि धृति इयां। दोहीं भागांमाजीं धनंजया। आधीं रूप बुद्धीचिया। भेदासि करूं॥ ६९६॥**
**तरी उत्तमा मध्यमा निकृष्टा। संसारासि गा सुभटा। प्राणियां येतियां वाटा। तिनी आथी॥ ६९७॥**
**जे करणीय काम्य निषिद्ध। ते हे मार्ग तिन्ही प्रसिद्ध। संसारभय संबंध। जीवा ययां॥ ६९८॥**

**अर्थ**—अरे अर्जुना! या जगामध्ये कोणती एक वस्तु आहे की सत्वरजतम या तीन प्रकारची केली नाही॥ ६९२॥ जगात कोणते असे लाकूड आहे की जिच्या पोटात विस्तव राहत नाही? त्याप्रमाणे दृश्याच्या वर्गात मोडणारे असे काय आहे जे सत्वरजतमात्मक तीन प्रकारचे नसते॥ ६९३॥ म्हणून या तीन गुणांमुळे बुद्धि त्रिगुणात्मक झाली आहे, त्याचप्रमाणे धैर्याचीही वाटणी तशीच तीन गुणांची झाली आहे॥ ६९४॥ बुद्धीचा व धृतीचा हाच एक त्रिविधपणा त्यांच्या भिन्न भिन्न यथायोग्य लक्षणासह विस्ताराने सांगण्यात येईल॥ ६९५॥ परंतु, हे धनंजया! बुद्धी आणि धृती या दोन भागांपैकी प्रथम बुद्धीच्या भेदाचे निरूपण करू॥ ६९६॥ हे उत्कृष्ट योद्ध्या अर्जुना! संसारात येणाऱ्या प्राण्यांना उत्तम, मध्यम व निकृष्ट अशा तीन वाटा आहेत॥ ६९७॥ विहित कर्म, काम्यकर्म व निषिद्ध कर्म हे तीन मार्ग प्रसिद्ध आहेत. यांपासूनच जीवांना संसाराचे भय निर्माण होते॥ ६९८॥

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये। बन्धं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी॥ ३०॥**

**अर्थ**—अर्जुना! जी बुद्धी कर्ममार्ग व संन्यास मार्ग, कर्तव्य कोणते व निषिद्ध कोणते, भय कशापासून व अभय कशापासून, बंध कोणत्या मार्गाने होतो व मोक्ष कशामुळे होतो हे जाणते तिला सात्विक बुद्धि म्हणतात॥ ३०॥

**म्हणौनि अधिकारें मानिलें। जें विधीचेनि वोघें आलें। तें येकचि येथ भलें। नित्य कर्म॥ ६९९॥**
**तेंचि आत्मप्राप्तिफळ। दिठी सूनि केवळ। कीजे जैसें कां जळ। सेविजे ताहने॥ ७००॥**
**येतुलेनि ते कर्म। सांडी जन्मभय विषम। करूनि दे सुगम। मोक्षसिद्धि॥ ७०१॥**

**ऐसें कर्म करी तो भला। संसारभयें सांडिला। करणीयत्वें आला। मुमुक्षुभागा॥ ७०२॥**
**तेथ जे बुद्धि ऐसा। बळीया बांधे भरंवसा। मोक्षु ठेविला ऐसा। जोडेल येथ॥ ७०३॥**

**अर्थ**—म्हणून आपल्या अधिकारानुसार व शास्त्राच्या मार्गाने आपल्या वाट्याला आलेले जे नित्य (विहित) कर्म, तेच एक काय ते या जगात आचरण करण्यास चांगले आहे॥ ३९९॥ तेच नित्य कर्म, केवळ आत्मप्राप्तीच्या ध्येयावर दृष्टि ठेवून, तहान लागलेला माणूस जसा जळाचे सेवन करतो त्याप्रमाणे आचरीत जावे॥ ७००॥ एवढ्यानेच ते कर्म अनिष्ट अशा जन्माच्या भयाला घालविते व मुक्तीचा लाभ सुलभ करून देते॥ ७०१॥ अशा रीतीने जो सूज्ञ माणूस कर्म करतो तो संसाराच्या भीतीपासून मुक्त होतो व विहित कर्माच्या अनुष्ठानाने तो मुमुक्षूच्या योग्यतेला चढतो॥ ७०२॥ तेव्हा येथे जी बुद्धि अशा प्रकारचा (विहित कर्मानुष्ठानातच मोक्ष आहे असा) दृढ निश्चय करून ठेवते तिला मोक्ष राखून ठेवल्या सारखा प्राप्त होतो॥ ७०३॥

**म्हणौनि निवृत्तीचि मांडिली। सूनि प्रवृत्तितळीं। इये कर्मीं बुडकुळी। द्यावी कीं ना॥ ७०४॥**
**तृषार्ता उदकें जिणें। कां पुरीं पडलिया पोहणे। अंधकूपीगती किरणें। सूर्याचेनि॥ ७०५॥**
**ना ना पथ्येंसीं औषध लाहे। तरी रोगें दाटलाही जिये। कां मीना जिव्हाळा होये। जळाचा जरी॥ ७०६॥**
**तरी तयाच्या जीविता। नाहीं जेवीं अन्यथा। तैसें कर्मीं इये वर्ततां। जोडेचि मोक्षु॥ ७०७॥**
**हें करणीयाचिया कडे। जें ज्ञान आथी चोखडें। आणि अकरणीय हें फुडें। ऐसें जाण॥ ७०८॥**

**अर्थ**—म्हणून निष्काम कर्माच्या प्रवृत्तीला तळाला घालून (मोक्षाकडे दृष्टि ठेवून) निवृत्तीची उभारणी करण्यात आली आहे. अशा कर्माच्या ठिकाणी बुडी मारू नये काय? (म्हणजे असे कर्माचे आचरण करू नये काय?)॥ ७०४॥ तहानेने व्याकुळ झालेल्याला जसे पाण्याने शांती मिळते, पुरात पडलेल्याला जसे पोहण्याने तरून जाता येते. अंधारमय विहीरीमध्ये पडलेल्याला ज्याप्रमाणे सूर्याच्या किरणामुळे वर येण्याला मार्ग दिसतो॥ ७०५॥ किंवा पथ्यपाण्यासह औषध मिळाले तर रोगाने पूर्णपणे पछाडलेलाही वाचतो किंवा माशाला जर पाण्याचा आश्रय मिळाला॥ ७०६॥ तर त्याच्या जीवाला मग भीती उरत नाही त्याप्रमाणे विहित कर्माच्या आचरणाने मोक्ष हा मिळतोच मिळतो॥ ७०७॥ ही करणीय कर्मे आहेत असे ज्याला उत्तम ज्ञान आहे आणि करण्याला अयोग्य असणारी कर्मे कशी आहेत ती तूं स्पष्ट जाण॥ ७०८॥

**जीं तियें काम्यादिकें। संसारभयदायकें। अकृत्यपणाचें आंबुखें। पडिलें जयां॥ ७०९॥**
**तिये कर्मीं अकार्यीं। जन्ममरणसमयीं। प्रवृत्ति पळवी पायीं। मागिलीचि॥ ७१०॥**
**पैं आगीमाजीं न रिघवे। अथावीं न घाल्वे। धगधगीत नागवे। शूळ जेवीं॥ ७११॥**
**कां काळियानाग धुंधुवातु। देखोनि न घाल्वे हातु। न वचवे खोपेआंतु। वाघाचिये॥ ७१२॥**
**तैसें कर्म अकरणीय। देखोनि महाभय। उपजे निःसंदेह। बुद्धी जिये॥ ७१३॥**

**अर्थ**—जी संसाराचे भय निर्माण करणारी काम्यादी कर्मे आहेत आणि निषिद्धपणाचे शिंतोडे ज्यावर पडले आहेत॥ ७०९॥ त्या निषिद्ध व जन्ममरणाच्या भीतीने युक्त असलेल्या कर्मांच्या बाबतीत जी बुद्धी प्रवृत्तीला मागल्या पायीच पळविते॥ ७१०॥ आगीमध्ये शिरवत नाही, खोल पाण्यात उडी घालवत नाही, तीक्ष्ण धार असलेल्या शूळाला हातात धरवत नाही॥ ७११॥ किंवा फुत्कार करणाऱ्या काळ सर्पाला पाहून त्याच्या बिळात हात घालवत नाही. किंवा वाघाच्या गुहेत ज्याप्रमाणे जाववत नाही॥ ७१२॥ त्याप्रमाणे निषिद्ध कर्म पाहूनच ज्या बुद्धीत निःसंशय महाभय उत्पन्न होते॥ ७१३॥

**वाढिलें रांधूनि विखें। तेथें जाणिजे मृत्यु न चुके। तेवीं निषेधीं कां देखे। बंधातें जो॥ ७१४॥**
**मग बंधभयभरितीं। तियें निषिद्धी प्राप्तीं। विनियोग जाणे निवृत्ती। कर्माचिये॥ ७१५॥**
**ऐसेनि कार्याकार्यविवेकी। जे प्रवृत्तिनिवृत्तिमापकीं। खरा कुडा पारखीं। जिया परी॥ ७१६॥**
**तैसी कृत्याकृत्यशुद्धी। बुझे जे निरवधी। सात्त्विक म्हणिपे बुद्धी। तेंचि तूं जाण॥ ७१७॥**

**अर्थ**—विष घालून शिजविलेले अन्न खाल्ले असता मरण चुकत नाही त्याप्रमाणे निषिद्ध कर्माच्या ठिकाणी जिला (ज्या बुद्धीला) जन्म मरणाचे बंधन दिसते॥ ७१४॥ मग जन्ममरणाच्या बंधाच्या भीतीने युक्त असलेले असे निषिद्ध कर्मे प्राप्त झाली असता ज्या बुद्धीला त्या कर्माची व्यवस्था म्हणजे त्यापासून परावृत्त होणे हेच जी बुद्धी जाणते॥ ७१५॥ रत्नपारखी जसा खऱ्या खोट्याची परीक्षा करतो तसे प्रवृत्ति व निवृत्ति यांच्या मापाने योग्य काय अयोग्य काय याचा जी बुद्धी निर्णय करते॥ ७१६॥ त्याप्रमाणे ज्या बुद्धीला चांगले व वाईट कृत्य कोणते हे उत्तम रीतीने कळते. तिलाच सात्त्विक बुद्धी म्हणतात, हे तू जाण॥ ७१७॥

**यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च । अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी॥ ३१॥**

**अर्थ**—ज्या बुद्धीने धर्म, अधर्म व कार्य, अकार्य यांचा यथार्थ निर्णय होत नाही ती बुद्धी, हे पार्था! राजस होय॥ ३१॥

**आणि बकांच्या गांवीं। घेपे क्षीरनीर सकळ्वी। कां अहोरात्रींची गोंवी। आंधळें नेणे॥ ७१८॥**
**जया फुलांचा मकरंद फावे। तो काष्ठें कोरूं धांवे। परी भ्रमरपणा नव्हे। अव्हांटा जेवीं॥ ७१९॥**
**तैसीं इयें कार्याकार्यें। धर्माधर्मरूपें जियें। तियें न चोजवितां जाये। जाणती जे कां॥ ७२०॥**
**अगा डोळांवीण मोतियें। घेतां पाड मिळे विपायें। न मिळणें तें आहे। ठेविलें तेथें॥ ७२१॥**
**तैसें अकरणीय अवचटें। नोडवे तरीच लोटे। एऱ्हवीं जाणे एकवटें। दोन्ही जे कां॥ ७२२॥**
**ते गा बुद्धि चोखविखी। जाण येथ राजसी। अक्षत टाकिली जैसी। मांदियेवरी॥ ७२३॥**

**अर्थ**—आणखी बगळ्याच्या गावात दूध व पाणी मिसळलेले सरसकट प्याले जाते किंवा आंधळ्याला दिवस व रात्र यांतील भेद कळत नाही॥ ७१८॥ ज्या भ्रमराला फुलातील मध मिळतो तो लाकडे कोरण्याकरताही धावतो, असे असले, तरी ते भ्रमरपणाला अनुचित नाही॥ ७१९॥ त्याप्रमाणे धर्म व अधर्म यांच्या रूपांनी असणारी कार्ये व अकार्ये यांची निवड न करता जी बुद्धी सरसकट आचरण करीत जाते॥ ७२०॥ बाबा रे! मोत्यांच्या परीक्षेची दृष्टी नसता जर मोती घेतले तर ती एखादे वेळी चांगली मिळतील ही, परंतु चांगली न मिळणे हेच अगदी ठरल्यासारखे असायचे॥ ७२१॥ त्याप्रमाणे निषिद्ध कर्म अकस्मात् प्राप्त न झाले तरच घडावयाचे नाही. एऱ्हवी जी बुद्धी कार्याकार्याची एकत्र सरभेसळ करते॥ ७२२॥ योग्यायोग्यतेचा विचार न करता ज्याप्रमाणे सर्व गावाला आमंत्रण द्यावे त्याप्रमाणे चांगल्या वाईट कर्माविषयीं जिला निवड करता येत नाही ती राजस बुद्धी होय असे समज॥ ७२३॥

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता । सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी॥ ३२॥**

**अर्थ**—हे पार्था! अधर्मालाही धर्म समजणारी व सर्व अर्थाचा विपरीत अर्थ करणारी व तमोगुणाने आच्छादिलेली जी बुद्धी ती तामसी बुद्धी.॥ ३२॥

**आणि राजा जिया वाटा जाये। ते चोरांसि आडव होये। कां राक्षसां दिवो पाहे। राति होऊनि॥ ७२४॥**
**नाना निधानचि निदैवा। होये कोळसयाचा उडवा। पैं असतें आपणपें जीवा। नाहीं जालें॥ ७२५॥**
**तैसें धर्मजात तितुकें। जिये बुद्धीसी पातकें। साच तें लटिकें। ऐसेंचि बुझे॥ ७२६॥**

**अर्थ**—राजा ज्या मार्गाने जातो तो मार्ग चोरांना आडमार्ग होतो किंवा रात्र ही राक्षसांचा दिवस होऊन उजाडते॥ ७२४॥ किंवा भाग्यहीनाला ज्या द्रव्याचा ठेवा कोळशाचा ढीग होतो. म्हणून धन जवळ असूनही त्याला नाही सारखेच असते॥ ७२५॥ त्याप्रमाणे धर्म म्हणून जितके काही शास्त्रांनी सांगितले असेल तितके त्या पापरूप बुद्धीला पापरूपचं वाटते. व खरे म्हणून जे असेल ते सर्व खोटे अशीच त्याची समजून असते॥ ७२६॥

**ते आघवेचि अर्थ। करूनि घाली अनर्थ। गुण ते ते व्यवस्थित। दोषचि मानी॥ ७२७॥**
**किंबहुना श्रुतिजातें। अधिष्ठूनि केलें सरतें। तेतुलेंही उपरतें। जाणे जे बुद्धि॥ ७२८॥**
**ते कोणातेंही न पुसतां। तामसी जाणावी पांडुसुता। रात्री काय धर्मार्था। साच करावी॥ ७२९॥**
**एवं बुद्धीचे भेद। तिन्ही तुज विशद। सांगितले स्वबोध-। कुमुदचंद्रा॥ ७३०॥**

**आतां ययाची बुद्धिवृत्ती। निष्टंकिला कर्मजातीं। खांद मांडिजे धृती। त्रिविधा जया॥ ७३१॥**
**तिये धृतीचेही विभाग। तिन्ही यथालिंग। सांगिजती चांग। अवधान देईं॥ ७३२॥**

**अर्थ**—शास्त्रांनी सांगितलेला खरा अर्थ टाकून देऊन जी त्याच्या उलट अर्थ करते व ज्यांना गुण म्हणून सांगितले असेल त्याला दोषच समजते॥ ७२७॥ फार काय सांगावे! यच्चयावत् श्रुतींनी जे जे म्हणून योग्य ठरविले आहे त्या सर्वांना जी बुद्धी अयोग्य समजते॥ ७२८॥ अशी बुद्धी, अर्जुना! कोणालाही न विचारता नि:शंकपणे तामसी समजावी. ही रात्रीसारखी अंधकारमय असलेली बुद्धी धर्मकार्याला काय उपयोगाची?॥ ७२९॥ अशा रीतीने आत्म-बोधरूपी कमलाला विकास करणाऱ्या चंद्ररूपी अर्जुना! बुद्धीचे तिन्ही भेद तुला स्पष्ट करून सांगितले॥ ७३०॥ आता त्याच बुद्धिवृत्तीने कर्मामध्ये प्रवृत्त झाले असता ज्या धैर्याने ती केली जातात त्याचेही तीन प्रकार आहेत॥ ७३१॥ त्या धैर्याचे तीन भाग त्यांच्या लक्षणांसह मी सांगणार आहे. चांगले लक्ष देऊन ऐक॥ ७३२॥

**धृत्या यया धारयते मन:प्राणेन्द्रियक्रिया:। योगेनाव्यभिचारिण्या धृति: सा पार्थ सात्त्विकी॥ ३३॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्या एकनिष्ठ धैर्याने मन, प्राण, इंद्रिये यांच्या क्रिया, योगामुळे, शास्त्रप्रवृत्तिपासून रोखून विरुद्ध धारण केल्या जातात ते सात्विक धैर्य होय॥ ३३॥

**तरी उदेलिया दिनकरु। चोरीसि थोके अंधारु। कां राजाज्ञा अव्यवहारु। कुंठवी जेवीं॥ ७३३॥**
**नाना पवनाचा साटु। वाजीनलिया नीटु। आंगेंसीं बोभाटु। सांडिती मेघ॥ ७३४॥**
**कां अगस्तीचेनि दर्शनें। सिंधु घेऊनी ठाती मौनें। चंद्रोदयीं कमळवनें। मिठी देती॥ ७३५॥**
**हें असो पावो उचलिला। मदमुख न ठेविती खालां। गर्जोनि पुढां जाला। सिंहु जरी॥ ७३६॥**
**तैसा जो धीरु। उठलिया अंतरु। मनादिकें व्यापारु। सांडिती उभीं॥ ७३७॥**

**अर्थ**—सूर्य उगवला असता चोरी बरोबर अंधकारही थांबतो. किंवा राजाच्या हुकुमाने निंद्य व्यवहार थांबतात॥ ७३३॥ वारा सपाट्याने वाहू लागला म्हणजे मेघ आपल्या गडगडाटासह नाहीसे होतात॥ ७३४॥ किंवा अगस्ती दृष्टीस पडताच समुद्र मौन धारण करतो किंवा चंद्राचा उदय होताच सूर्यविकासिनी वने कोमेजून जातात॥ ७३५॥ हे असो. गर्जना करीत सिंह जरी पुढे आला तरी मदोन्मत्त हत्ती उचललेला पाय खाली ठेवीत नाही॥ ७३६॥ त्याप्रमाणे अंत:करणात धैर्य उठले तर मन, प्राण, इंद्रिये यांचे व्यापार जागच्या जागीच बंद पडतात॥ ७३७॥

**इद्रियांविषयांचिया गांठी। अपैसया सुटती किरीटी। मना मायेच्या पोटीं। रिगती दाहीं॥ ७३८॥**
**अधोर्ध्व गुढें काढी। प्राण नवांची पेंडी। बांधोनि घाली उडी। मध्यमेमाजीं॥ ७३९॥**
**संकल्पविकल्पांचें लुगडें। सांडूनि मन उघडें। बुद्धिही मागिलेकडे। उगीचि बैसे॥ ७४०॥**

**अर्थ**—अर्जुना! इंद्रियें व विषय यांची गांठ आपोआप तुटते. दहाही इंद्रिये मनरूपी आईच्या पोटात शिरतात (इंद्रिये अंतर्मुख होतात असा भाव)॥ ७३८॥ प्राणायाम साधून, खालचा अपानमार्ग व वरचा उर्ध्व मार्ग बंद करून देहाची नवही छिद्रांची गाठोडी बांधून प्राण हा सुषुम्ना नाडीत शिरतो॥ ७३९॥ संकल्प व विकल्प यांची वस्त्रे टाकून देऊन मन उघडे पडते व बुद्धी मागच्या बाजूला गुपचूप बसते॥ ७४०॥

**ऐसी धैर्यराजें जेणें। मन प्राण करणें। स्वचेष्टांची संभाषणें। सांडविजती॥ ७४१॥**
**मग आघवींचि सर्डी। ध्यानाच्या आंतुल्या मढीं। कोंडिजती निरवडी। योगाचिये॥ ७४२॥**
**परी परमात्मया चक्रवर्ती। उगाणिती जंव हातीं। तंव लांच न घेतां धृती। धरिजती जिया॥ ७४३॥**
**ते गा धृती येथें। सात्त्विक हें निरुतें। आईक अर्जुनातें। श्रीकांत म्हणे॥ ७४४॥**

**अर्थ**—जो धैर्यरूपी राजा याप्रमाणे मनाला, प्राणाला व इंद्रियांना आपआपल्या व्यापारांची बोलणी टाकावयास लावतो॥ ७४१॥ मग ती एकटी मनादी सारी इंद्रिये योगाच्या कौशल्याने ध्यानरूपी आंतील कोठडीत, जे धैर्य, कोंडून ठेवते॥ ७४२॥ परंतु सार्वभौम राजा जो परमात्मा त्याच्या ताब्यात ह्या इंद्रियादिकांना देईपर्यंत कोणतीही लाच न घेता

जे धैर्य त्यांना धरून ठेवते. ॥ ७४३ ॥ अर्जुना! ते धैर्य सात्विक होय, असे समज. असे लक्ष्मीपति श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले ॥ ७४४ ॥

**यया तु धर्मकामार्थान्धृत्या धारयतेऽर्जुन । प्रसङ्गेन फलाकाङ्क्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥**

**अर्थ**—हे अर्जुना! ज्या धैर्यामुळे धर्म, काम, अर्थ हे तीनच पुरुषार्थ साधले जातात व त्याच्या आचरणसमयी फलांची इच्छा केली जाते. ते राजस धैर्य होय ॥ ३४ ॥

**आणि होऊनियां शरीरी। स्वर्गसंसाराच्या दोहीं घरीं। नांदे जो पोटभरी। त्रिवर्गोपायें ॥ ७४५ ॥**
**तो मनोरथांच्या सागरीं। धर्मार्थकामांच्या तारुवावरी। जेणें धैर्यबळें करी। क्रियावाणिज्य ॥ ७४६ ॥**
**जें कर्म भांडवल सूये। तयाची चौगुणी येती पाहे। येवढें सायास साहे। जया धृती ॥ ७४७ ॥**
**ते गा धृती राजस। पार्था येथ परियेस। आतां आइक तामस। तिसरी जे कां ॥ ७४८ ॥**

**अर्थ**—आणि जो देह धारण करून धर्म, अर्थ व काम तीन पुरुषार्थांच्या उपायांनी परलोकी स्वर्गरूपी व इहलोकी संसाररूपी या दोन्ही घरात अत्यंत आनंदाने राहतो ॥ ७४५ ॥ मनोरथरूपी समुद्रामध्ये धर्म, अर्थ व काम यांच्या गलबतावर बसून तो क्रियारूपी व्यापार ज्या धैर्याच्या बळावर करतो ॥ ७४६ ॥ त्या व्यापारात जे कर्मरूपी भांडवल घालतो त्याची चौपट प्राप्ती होईल एवढे धोरण बांधून ज्या धैर्याने तो कष्ट सहन करतो ॥ ७४७ ॥ हे पार्था! ऐक त्या धृतीला (धैर्याला) राजस धृति म्हणतात. आता तिसरी जी तामस धृती ती ऐक. ॥ ७४८ ॥

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च । न विमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥**

**अर्थ**—अर्जुना! जिच्यामुळे दुष्टबुद्धीचा मनुष्य झोप, भीती, दु:ख, खेद व मद ही सोडत नाही तिला तामस धृती (धैर्य) असे म्हणतात ॥ ३५ ॥

**तरी सर्वाधमें गुणें। जयाचें कां रूपा येणें। कोळसा काळेपणें। घडला जैसा ॥ ७४९ ॥**
**अहो प्राकृत आणि हीनु। तयाही कीं गुणत्वाचा मानु। परी न म्हणिजे पुण्यजनु। राक्षसु काई ॥ ७५० ॥**
**पैं ग्रहांमाजीं इंगुळु। तयातें म्हणिजे मंगळु। तैसा तमीं धसाळु। गुणशब्दु हा ॥ ७५१ ॥**
**जे सर्वदोषांचा वसौटा। तमचि कामऊनि सुभटा। उभारिला आंगवठा। जया नराचा ॥ ७५२ ॥**

**अर्थ**—काळे कुट्टपणाने जसा कोळसा घडलेला असतो त्याप्रमाणे सर्व अधमगुणांनी ज्याचे स्वरूप बनलेले आहे ॥ ७४९ ॥ अहो जो तमोगुण निकृष्ट व हीन आहे त्यालाही गुणत्वाचा मान कसा? राक्षस हे दुष्ट व पापी असूनही त्यांना 'पुण्यजन' असे म्हणत नाहीत काय? ॥ ७५० ॥ सर्व ग्रहांमध्ये धगधगित विस्तवाप्रमाणे ताप देणारा असा जो ग्रह त्याला मंगळ (कल्याणकारक) म्हणतात, त्याप्रमाणे तमाला 'गुण' शब्द अविचाराने लावण्यात येतो ॥ ७५१ ॥ हे उत्तम योद्धया अर्जुना! सर्व दोषांचे वसतिस्थान असलेल्या तमोगुणाला राबवूनच ज्यापुरुषाचा पिंड बनलेला आहे ॥ ७५२ ॥

**तो आळसु सुनि असे कांखे। म्हणौनि निद्रे कहीं न मुके। पापें पोषितां दु:खें। न सांडिजे जेवीं ॥ ७५३ ॥**
**आणि देहधनाचिया आवडी। सदा भय तयातें न सांडी। विसंबू न सके धोंडीं। काठिण्य जैसें ॥ ७५४ ॥**
**आणि पदार्थजातीं स्नेहो। बांधे म्हणोनि तो शोकें ठावो। केला न शके पाप जावों। कृतघ्नौनि जैसें ॥ ७५५ ॥**
**आणि असंतोष जीवेंसीं। धरूनि ठेला अहर्निशीं। म्हणौनि मैत्री तेणेंसीं। विषादें केली ॥ ७५६ ॥**
**लसणातें न सांडी गंधी। कां अपथ्यशीळातें व्याधी। तैसी केली मरणावधी। विषादें तया ॥ ७५७ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे पापांना पोसिले असता दु:ख कधीच नाहीसे होत नाही, त्याप्रमाणे आळसाला तो काखेत बाळगून असल्यामुळे झोप त्याला (तमोगुणी पुरुषाला) कधीच सोडत नाही ॥ ७५३ ॥ कणखरपणा ज्याप्रमाणे दगडाला सोडीत नाही, त्यप्रमाणे त्याला धनाच्या व शरीराच्या आवडीमुळे भय सदा सर्वकाळ सोडीत नाही ॥ ७५४ ॥ आणि पाप जाण्याकरिता कृतघ्न माणसाने कितीही खटपट केली तरी ते जसे जात नाही त्याप्रमाणे पदार्थ मात्राच्या ठिकाणी तो आसक्तीने जखडलेला असल्याकारणाने तो दु:खाचे निवासस्थान बनतो ॥ ७५५ ॥ आणि तो रात्रंदिवस

असंतोषाला आपल्या अंत:करणात धरून ठेवीत असल्यामुळे खेदाने त्याच्याशी मैत्री केलेली असते॥ ७५६॥ लसणाला ज्याप्रमाणे दुर्गंध सोडीत नाही किंवा अपथ्य करणाऱ्याला रोग सोडत नाही त्याप्रमाणे विषाद (खेद) मरणाच्या क्षणापर्यंत त्याला सोडीत नाही. ॥ ७५७॥

**आणि वयसा वित्तकामु। ययांचा वाढवी संभ्रमु। म्हणौनि मदें आश्रमु। तोचि केला॥ ७५८॥**

**अर्थ**—आणि तारुण्य, द्रव्य व विषयेच्छा यांचे तो (तामसी पुरुष) महत्त्व वाढवितो म्हणून मद देखील त्यालाच आश्रय स्थान करतो॥ ७५८॥

**आगीतें न सांडी तापु। सळातें जातीचा सापु। कां जगाचा वैरी वासिपु। अखंडु जैसा॥ ७५९॥**
**नातरी शरीरातें काळु। न विसंबे कवणे वेळु। तैसा आथी अढळु। तामसीं मदु॥ ७६०॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे अग्निला उष्णता सोडत नाही किंवा जातिवंत सर्प जसा वैर सोडत नाही, भीती जशी नेहमी जगाची शत्रू आहे॥ ७५९॥ किंवा काळ जसा शरीराला केव्हाही सोडत नाही त्या प्रमाणे मद (माजोरीपणा) तामस पुरुषामध्ये नित्य राहतो॥ ७६०॥

**एवं पांचही हे निद्रादिक। तामसाच्या ठायीं दोख। जिया धृती देख। धरिलें आहाती॥ ७६१॥**
**तिये गा धृती नांवें। तामसी येथ हें जाणावें। म्हणितलें तेणें देवें। जगाचेनि॥ ७६२॥**

**अर्थ**—अशा रीतीने निद्रादिक पांचही दोष ज्या धृतीने (धैर्याने) धरून ठेवले जातात॥ ७६१॥ अर्जुना! त्या धैर्याला तामसी धृती हे नाव आहे, असे समज, असे जगाच्या ईश्वराने (श्रीकृष्णाने) म्हटले॥ ७६२॥

**एवं त्रिविध जे बुद्धि। कीजे कर्मनिश्चयो आधि। तो धृती या सिद्धि। नेइजो येथ॥ ७६३॥**
**सूर्यें मार्ग गोचरु होये। आणि तो चालती कीर पाये। परी चालणें तें आहे। धैर्यें जेवीं॥ ७६४॥**
**तैसी बुद्धि कर्मातें दावी। तें करणसामग्री निफजवी। परी निफजावया होआवी। धीरता जे॥ ७६५॥**
**ते हे गा तुजप्रति। सांगितली त्रिविध धृति। यया कर्मत्रया निष्पत्ति। जालिया मग॥ ७६६॥**

**अर्थ**—याप्रमाणे तीन प्रकारच्या बुद्धीने जो प्रथम कर्माचा निश्चय केला जातो तो (पुढे) या जगात (तीन प्रकारच्या) धैर्याने सिद्धीस नेला जातो॥ ७६३॥ सूर्याच्या योगाने मार्ग दिसतो अणि पायाने तो मार्ग चालला जातो. पण चालणें हे जसे धैर्याच्या योगाने होते॥ ७६४॥ त्याप्रमाणे बुद्धी कर्म दाखविते इंद्रिय ही साधने ते कर्म करतात. परंतु ते कर्म करण्याला ज्या धैर्याची आवश्यकता असते॥ ७६५॥ त्या धैर्याचे हे तीन प्रकार तुला सांगितले. असे हे तीन प्रकारचे कर्म निष्पन्न झाले म्हणजे मग॥ ७६६॥

**येथ फळ जें एक निफजे। सुख जयातें म्हणिजे। तेंही त्रिविध जाणिजे। कर्मवशें॥ ७६७॥**

**अर्थ**—या तीन प्रकारच्या कर्मापासून जे एक फळ उत्पन्न होते, ज्याला सुख असे म्हणतात. तेही सुख कर्माच्या स्वाधीन असल्यामुळे तीन प्रकारचे असते. हे लक्षांत घे॥ ७६७॥

**तरी फळरूप तें सुख। त्रिगुणीं भेदलें देख। विवंचूं आतां चोख। चोखीं बोलीं॥ ७६८॥**
**परी चोखी ते कैसी सांगें। पैं घेवों जातां बोलबगें। कानींचियेही लागे। हातींचा मळ॥ ७६९॥**
**म्हणौनि जयाचेनि अव्हेरें। अवधानही होय बाहिरें। तेणें आइक हो आंतरें। जिवाचेनि जीवें॥ ७७०॥**
**ऐसें म्हणौनि देवो। त्रिविधा सुखाचा प्रस्तावो। मांडला तो निर्वाहो। निरूपित असे॥ ७७१॥**

**अर्थ**—तर ते फळाच्यारूपाने प्राप्त होणारे सुखही तीन गुणांनी तीन प्रकारचे झालेले असते, हे लक्षात घे. त्याचे आता चांगल्या शब्दात स्पष्ट विवेचन करू॥ ७६८॥ परंतु शब्दाचा चांगलेपणा तरी कसा वर्णन करावा! शब्दांच्या मार्गाने ग्रहण कर म्हणावे तर श्रवणेंद्रियाच्या माध्यमाचे दोष (मर्यादा) त्याला लागतात॥ ७६९॥ म्हणून ज्यांना (शब्दांना) झिटकारिले असता बाह्य अवधान देखील नष्ट होते त्याचे केवळ अंत:करणाच्या उत्कट आदराने श्रवण कर॥ ७७०॥ असे म्हणून देवाने तीन प्रकारच्या सुखाचे निरूपण करण्यास प्रारंभ केला तो प्रकार आता सांगतो॥ ७७१॥

**सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ। अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति॥ ३६॥**

**अर्थ**—ज्या सुखाच्या ठिकाणी अभ्यासाने जीव रममाण होतो व ज्यायोगाने दुःखाचा खात्रीने नाश होतो ते तीन प्रकारचे सुख, हे भरतश्रेष्ठा अर्जुना! माझ्यापासून ऐक॥ ३६॥

**म्हणे सुखत्रयसंज्ञा। सांगों म्हणौनि प्रतिज्ञा। बोलिलों तें प्राज्ञा। ऐक आतां॥ ७७२॥**
**तरी सुख तें गा किरीटी। दाविजेल तुज दिठी। जें आत्मयाचिये भेटी। जीवासि होय॥ ७७३॥**
**परी मात्रेचेनि मापें। दिव्यौषध जैसें घेपे। कां कथिलाचें कीजे रूपें। रसभावनीं॥ ७७४॥**
**नाना लवणाचें जळु। होआवया दोनि चार वेळु। देऊनि सांडिजती ढाळु। तोयाचे जेवीं॥ ७७५॥**
**तेवीं जालेनि सुखलेशें। जीव भाविलिया अभ्यासें। जीवपणाचें नासे। दुःख जेथें॥ ७७६॥**

**अर्थ**—हे सुज्ञा अर्जुना! तीन प्रकरच्या सुखाची लक्षणे सांगीन म्हणून मी जे तुला वचन दिले होते ती आता ऐक.॥ ७७२॥ अर्जुना! जीवाला आत्मज्ञान झाले असता जो आनन्द होतो तो तुझ्या दृष्टीला दाखवून देतो॥ ७७३॥ ज्याप्रमाणे उत्कृष्ट औषध मात्रेच्या प्रमाणात घ्यावे किंवा रसाच्या भावना देऊन कथिलाची चांदी करावी॥ ७७४॥ किंवा मिठाच्या ख़ड्याचे पाणी करावयाचे असल्यास ज्याप्रमाणे त्यावर दोन चार वेळ पाणी टाकावे॥ ७७५॥ त्याप्रमाणे मिळालेल्या आनंदाचा अभ्यास जीवाला झाला असता जीवपणाचे म्हणून जे दुःख आहे ते जेथे नाश पावते॥ ७७६॥

**गूढार्थदीपिका—जीवपणाचे नासे। दुःख जेथे॥**

अविद्या निःशेष नाहीशी होऊन पूर्ण ब्रह्मरूपता आंगी बाणेपर्यंत गुणातीत अवस्था प्राप्त होऊ शकत नाही. अर्थातच ब्रह्मरूपता बाणून गुणातीत जोपर्यंत होता येत नाही तोपर्यंत प्राप्त होणाऱ्या सुखाचेही सत्त्व, रज व तम या गुणांमुळे साहजिकच तीन भेद होतात. या ओव्यांतून माउली सांगत आहे.

'मी ब्रह्मस्वरूप आहे' अशा तऱ्हेचे आत्मज्ञान झाल्यानंतर जीव व शिव यांचे ऐक्य झाले असता जीवाच्या ठिकाणची मर्यादित्वाची जाणीव नाहीशी होते. या मर्यादित्वाच्या जाणीवेमुळेच शिवापासून तो आपल्याला अलग समजत होता. व या नामरूपांच्या भेदामुळेच शिवाच्या स्वरूपधर्माहून (सच्चिदानंद धर्माहून) अत्यंत विपरीत अशा (असत्, जड, दुखरूप) या अनेक वस्तूची कल्पना तो करीत होता. हा भेदच त्याच्या दुःखाला कारण झाला होता, पण आत्मज्ञानाने आता जीव व शिव यांचे ऐक्यरूप ज्ञान त्याला झाल्यामुळे त्याची भेदाची चुकीची किंवा अज्ञानाची कल्पना नाहिशी होते व यथार्थज्ञानाने आपल्याला तो व्यापक समजू लागतो. ह्या व्यापकत्वाच्या जाणीवेच्या सुखामुळे भेदाने झालेला जीवपणा व त्यामुळे होणारे दुःख हे दोन्हीही नाहीसे होतात.

मिठाचे पाणी करण्याकरिता मिठावर दोन चारदा जसे पाणी शिपडावे लागते, त्याप्रमाणे भेदरूपी जीवत्वाची जाणीव नाहीशी करण्याकरिता "मी ब्रह्म आहे" ही जाणीव बाळगावी लागते. व ती कायम ठेवण्याकरिता सारखा अभ्यास करावा लागतो.

'मी ब्रह्मस्वरूप आहे' या ऐक्याच्या ज्ञानाचा, ज्ञात्याला येणारा अनुभव किंवा प्रत्यय व्यतिरेक ज्ञानाने येणारा आहे. हे व्यक्तिरेक ज्ञान मोक्ष्याचा दुःखनिवृत्तिरूप पहिल्या अंगाची प्राप्ती करून देते. हा दुःखनिवृत्तिरूप आनंद किंवा सुख सत्वगुणात्मक आहे व म्हणूनच याला सात्विक सुख किंवा सात्विक आनंद म्हणतात. पण मोक्षाचे दुसरे व प्रमुख अंग परमानंदरूपता हे आहे. हे अंग अर्थातच कोणतीही जाणीव-यथार्थज्ञानाची असली तरी-कायम असताना प्राप्त होत नाही. अहंब्रह्मास्मिरूप व्यतिरेकज्ञान यथार्थज्ञान असले तरी ते सापेक्षज्ञान आहे. व ज्ञान हे जाणीवरूप असल्यामुळे तेही वृत्तिरूप आहे, हे वृत्तिरूप ज्ञान नाहीसे झाल्याशिवाय परमानंदता बाणू शकत नाही. वेदान्तात म्हणूनच या ज्ञानाला 'लेशाविद्या' असे म्हणतात. ही ऐक्याची जाणीव नाहीशी करणे म्हणजेच ब्रह्मानंदता बाणणे होय, असे आचार्य "अहं भावोदयाभावः बोधस्य परमावधि" या पंक्तीत सांगतात. गुणातीत, त्रिपुटीरहित, निर्वृत्तिक व रसरूप म्हणून जिचे वर्णन करण्यात येते ती स्थिती लेशाविद्या नाहीशी झाल्यावरच प्राप्त होते. अर्थातच

ही स्थिति जाणीवप्रधान ज्ञानवृत्तीने प्राप्त होणे शक्य नाही. तर ही जाणीव नि:शेष विसरायला लावणाऱ्या सगुण भगवंताच्या ठिकाणी केलेल्या परमप्रीतीने प्राप्त होते. ही गुणातीत अवस्था असल्यामुळे ह्या सुखाचे किंवा आनंदाचे वर्णन शब्दांच्या पलीकडचे आहे. तिचे स्वरूप 'मूकास्वादनवत्' आहे.

**तें येथ आत्मसुख। जालें असे त्रिगुणात्मक। तेंही सांगों एकैक। रूप आतां॥ ७७७॥**

**अर्थ**—या जगात ते आत्मसुखही तीन प्रकारचे झाले आहे. त्याचेही एक एक स्वरूप आता सांगू॥ ७७७॥

**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम्। तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम्॥ ३७॥**

**अर्थ**—जे आरंभी विषासारखे कडू पण परिणामी अमृतासारखे (गोड) आणि आत्मविषयक बुद्धीपासून उत्पन्न झालेले असते, ते सात्त्विक सुख होय॥ ३७॥

**आतां चंदनाचें बुड। सर्पीं जैसें दुवाड। कां निधानाचें तोंड। विवसिया जेवीं॥ ७७८॥**
**अगा स्वर्गींचें गोमटें। आडव यागसंकटें। कां बाळपण दासटें। त्रासकाळें॥ ७७९॥**
**हें असो दीपाचिये सिद्धी। अवघड धूम आधीं। नातरी तो औषधीं। जिभेचा ठावो॥ ७८०॥**
**तयापरी पांडवा। जया सुखाचा रिगावा। विषम तेथ मेळावा। यमदमांचा॥ ७८१॥**
**देत सर्वस्नेहा मिठी। आंगीं ऐसें वैराग्य उठी। स्वर्गसंसारा कांटी। काढितची॥ ७८२॥**
**विवेकश्रवणें खरपुसें। जेथ व्रताचरणें कर्कशें। करितां जाती भोकसे। बुद्ध्यादिकांचे॥ ७८३॥**
**सुषुम्नेचेनि तोंडें। गिळिजे प्राणापानाचे लोंढे। बोहणियेसीचि येवढें। भारी जेथ॥ ७८४॥**

**अर्थ**—चंदनाच्या झाडाचा बुंधा सर्पामुळे जसा बिकट किंवा ठेव्याचे तोंड भूत पिशाच्चामुळे जसे अप्राप्त असते॥ ७७८॥ अरे अर्जुना! स्वर्गीचे सुख चांगले, पण यज्ञयागादिकांच्या अडथळ्यामुळे ते जसे त्रासदायक किंवा बाळपण बोलता येत नाही चालता येत नाही, कांही समजत नाही इत्यादि त्रासामुळे पीडादायक असते॥ ७७९॥ हे असो. दिवा लावण्याकरिता ज्याप्रमाणे धुव्याचा त्रास आधी सहन करावा लागतो किंवा औषधी सेवन जिभेला त्रासदायक असते॥ ७८०॥ त्याप्रमाणे, अर्जुना! ज्यांना या (सात्त्विक) सुखात प्रवेश करावयाचा असेल त्यांना प्रथम यमदमादि साधन संपत्ती प्राप्त करण्याचे संकट सोसावे लागते॥ ७८१॥ (तसेच) यच्चयावत् वैषयिक वस्तू विषयींचे प्रेम पूर्णपणे नाहीसे करीत अंगात असे वैराग्य उत्पन्न होते की स्वर्ग व संसार या दोहों विषयीचे आसक्तीचे कुंपण ते (वैराग्य) उपटून टाकते॥ ७८२॥ ज्या ठिकाणी खरखरीत अशा नित्यानित्य विवेकाचे श्रवण करावे लागते व कठोर व्रतांचे आचरण घडावे लागते. अशा आचरणानी बुद्ध्यादिकांच्या चिरफाळ्या होतात॥ ७८३॥ सुषुम्नेच्या तोंडाने प्राण व अपान वायूंचे लोंढे गिळावे लागतात. सुरुवातीलाच जेथे ह्या सर्व अडचणी सहन कराव्या लागतात॥ ७८४॥

**जें सारसांही विघडतां। होय वोहाहूनि वत्स काढितां। नव्हे भणंग दवडितां। भाणयावरुनी॥ ७८५॥**
**पैं मायेपुढौनि बाळक। काळें नेता एकुलतें एक। होय का उदक। तुटता मीना॥ ७८६॥**
**तैसें विषयांचें घर। इंद्रियां सांडितां थोर। युगांत होय तें वीर। विराग साहाती॥ ७८७॥**

**अर्थ**—चक्रवाक जोडप्याचा एकमेकापासून वियोग झाला असता किंवा गाईचे वासरू तिच्या कासेखालून ओढले असता किंवा भिकाऱ्याला भरल्या ताटावरून हाकलून दिले असता॥ ७८५॥ किंवा आईचे एकुलते एक मूल काळाने हिराबून नेले असता किंवा माशाला पाण्यातून बाहेर काढले असता जसे (अत्यंत दु:ख) होते॥ ७८६॥ अर्जुना, त्याचप्रमाणे इंद्रियांना विषयांचे घर सोडतांना महाप्रलयाचे दु:ख होते. परंतु ते वीर पुरुष (हे) विषयवैराग्य सहन करतात॥ ७८७॥

**ऐसा जया सुखाचा आरंभु। दावी काठिण्याचा क्षोभु। मग क्षीराब्धीं लाभु। अमृताचा जैसा॥ ७८८॥**

**अर्थ**—ज्या सुखाचा आरंभ अशा महान् संकटांचा अनुभव देतो परंतु मग ज्या प्रमाणे क्षीराब्धीचे मंथन केल्यावर अमृताचा लाभ (देवादिकांना) झाला (त्याप्रमाणे शेवटी मोक्षामृताचा लाभ त्यांना होतो)॥ ७८८॥

**पहिल्या वैराग्यगरळा। धैर्यशंभू वोडवी गळा। तरी ज्ञानामृतें सोहळा। पाहे जेथें॥ ७८९॥**

**अर्थ**—पहिल्याने वैराग्यरूपी गरळ (ज्यांत निघेल ते) प्राशन करण्याकरता सात्त्विक धैर्यरूपी शंकर जेव्हा आ करील, तेव्हाच ज्ञानरूप अमृताचा सोहळा भोगायला मिळतो॥ ७८९॥

**पैं कवलिताही कोपे ऐसें। द्राक्षांचें हिरवेपण असे। तें परिपाकीं कां जैसें। माधुर्य आते॥ ७९०॥**
**तें वैराग्यादिक तैसें। पिकलिया आत्मप्रकाशें। मग वैराग्येंसींही नाशे। अविद्याजात॥ ७९१॥**

**अर्थ**—हिरवी द्राक्षे इतकी आंबट असतात की तोंडांत टाकल्या बरोबर जिभेला त्याच्या आंबटपणाने मनाचा क्षोभ होतो पण तीच पिकली म्हणजे तेंच हिरवेपण (आबंटपण) सुरस गोडपणात परिणत होते॥ ७९०॥ त्याचप्रमाणे आत्मज्ञानाने वैराग्यादिक परिपक्व (पूर्णतेला आले) झाले म्हणजे वैराग्यासह सर्व अज्ञानाचा पसारा नाहीसा होतो॥ ७९१॥

**तेव्हां सागरीं गंगा जैसी। आत्मी मीनल्या बुद्धि तैसी। अद्वयानंदाची आपैसी। खाणी उघडे॥ ७९२॥**

**अर्थ**—त्यावेळी समुद्राला जशी गंगा मिळते, त्याप्रमाणे आत्मस्वरूपाशी बुद्धीचे ऐक्य झाले म्हणजे अद्वैतानंदाची खाण आपोआपच उघडते॥ ७९२॥

**ऐसें स्वानुभवविश्रामें। वैराग्यमूळ जें परिणमे। तें सात्त्विक येणें नामें। बोलिजे सुख॥ ७९३॥**

**अर्थ**—वैराग्य ज्याचे मूळ आहे असे जे सुख याप्रमाणे आपल्या अद्वैतानंदाच्या अनुभवाने विश्रांतिरूपाने परिणाम पावते त्याला सात्विक सुख असे म्हणतात॥ ७९३॥

**विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् । परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम्॥ ३८॥**

**अर्थ**—जे सुख विषय आणि इंद्रिये यांच्या संयोगाने आरंभी अमृतासारखे (गोड) आणि परिणामी विषा सारखे (कडू) असते तें राजस सुख होय.॥ ३८॥

**आणि विषयेंद्रियां। मेळु होतां धनंजया। जें सुख जाय थडिया। सांडूनि दोन्ही॥ ७९४॥**

**अर्थ**—हे धनंजया! विषयांचा आणि इंद्रियांचा संगम झाला म्हणजे दोन्ही थडी भरून जो सुखाचा पूर येतो॥ ७९४॥

**अधिकारिया रिगतां गांवो। होय जैसा उत्साहो। कां रिणावरी विवाहो। विस्तारिला॥ ७९५॥**
**नाना रोगिया जिभेपासीं। केळें गोड साखरेसीं। कां बचनागाची जैसी। मधुरता पहिली॥ ७९६॥**
**पहिलें संवचोराचें मैत्र। हाटभेटीचें कलत्र। कां लाघवियाचे विचित्र। विनोद ते॥ ७९७॥**
**तैसें विषयेंद्रियदोखीं। जें सुख जिवातें पोखी। मग उपडिला खडकीं। हंस जैसा॥ ७९८॥**
**तैसी जोडी आघवी आटे। जीविताचा ठाय फिटे। सुकृताचियाही सुटे। धनाची गांठी॥ ७९९॥**
**आणिक भोगिलें जें कांहीं। तें स्वप्न तैसें होय नाहीं। मग हानिच्याचि घाई। लोळावें उरे॥ ८००॥**

**अर्थ**—अधिकारी गावात आला म्हणजे (लोकांना) जसा उत्साह येतो, किंवा कर्ज काढून लग्न समारंभ होतात॥ ७९५॥ किंवा रोग्याच्या जिभेला साखरे प्रमाणे केळें गोड लागतात किंवा बचनाग (विष) खाताना जसा पहिल्याने गोड लागतो॥ ७९६॥ आपल्या बरोबर येणाऱ्या (चोराची) जशी पहिलीच मैत्री, किंवा बाजारात भेटलेल्या वेश्येचे आरंभीचे जसे आचरण (सुखकर) किंवा बहुरुप्याचे विचित्र विनोद जसे (मोह उत्पन्न करणारे)॥ ७९७॥ हंस ज्याप्रमाणे खडकावर आपटून (पाण्यांतून प्रतिबिंबित चांदण्यांना भ्रमाने रत्ने समजून त्यावर झेप घेताना) मग मरतो त्याप्रमाणे विषय व इंद्रिये यांच्या संयोगरूप दोषामुळें जे सुख जीवाला मिळते;॥ ७९८॥ त्याप्रमाणे संपादिलेली सर्व कमाई संपते, जीविताचाही नाश होतो व पुण्यरूपी धनाचा साठाही रिकामा होतो॥ ७९९॥ मग पूर्वी जे जे काही भोगले असेल ते स्वप्नाप्रमाणे नाहीसे होते व सर्वस्व हानीच्या आघाताने (गडबडा) लोळत राहणे एवढेच काय ते उरते॥ ८००॥

**ऐशा आपत्ती जें सुख। ऐहिकीं परिणमें देख। परत्रीं कीर विख। होऊनि परते॥ ८०१॥**

**अर्थ**—जे इहलोकातील सुख अशा प्रकारे आपत्तीच्या रूपात परिणाम पावते पहा व परलोकात तर खरोखर ते विष होऊनच उलटते॥ ८०१ ॥

**जे इंद्रियजाता ळ्ळा। दिधलिया धर्माचा मळा। जाळूनि भोगिजे सोहळा। विषयांचा जेथ॥ ८०२॥**
**तेथ पातकें बांधिती थावो। तियें नरकीं देती ठावो। जेणें सुखें हा अपावो। परत्री ऐसा॥ ८०३॥**

**अर्थ**—कारण सर्व इंद्रियांना विषयांचा ळळा लावून व धर्माच्या शेताला जाळून जेथे विषयांचे सुख भोगले जाते॥ ८०२ ॥ त्याठिकाणी पातकांना थारा मिळून त्यांना बळ चढते व ती पातके विषयरूपसुख भोगणाऱ्याला नरकात जागा देतात. एवंच या (इहलोकीच्या) सुखाने परलोकी असा घात होतो॥ ८०३ ॥

**पैं नामें विष मधुरें। परी मारूनि अंतीं खरें। तैसें आदि जें गोडिरें। अंतीं कडू॥ ८०४॥**

**अर्थ**—विषाला मधुर हे नाव असले तरी ते जसे प्राणघात करून अखेर विष ठरते, जसे जे सुख (राजस) आरंभी गोड वाटते पण अंती (परिणामी) कडूच (दु:खदायक) ठरते॥ ८०४॥

**पार्था तें सुख साचें। वळिलें आहे रजाचें। म्हणौनि न शिवें तयाचें। आंग कहीं॥ ८०५॥**

**अर्थ**—अर्जुना, हे सुख केवळ रजोगुणाचेच बनलेले आहे म्हणून त्याला तूं कधीही स्पर्श देखील करूं नकोस॥ ८०५ ॥

**यदग्रे चानुबन्धे च सुखं मोहनमात्मनः। निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम्॥ ३९ ॥**

**अर्थ**—जे आरंभी व उपभोगानंतर शेवटी चित्ताला मोह उत्पन्न करते आणि निद्रा, आळस व प्रमाद यापासून जे उत्पन्न होते ते तामस सुख होय॥ ३९ ॥

**आणि अपेयाचेनि पानें। अखाद्याचेनि भोजनें। स्वैरस्त्रीसंनिधानें। होय जें सुख॥ ८०६॥**

**अर्थ**—आणि अपेय पानाने (मदिरादि) अभक्ष्य भक्षणाने (मांसादी) **व** स्वैरिणी स्त्रीच्या समागमाने होणारे जे सुख॥ ८०६ ॥

**कां पुढीलांचेनि मारें। नातरी परस्वापहारें। जें सुख अवतरे। भाटांच्या बोलीं॥ ८०७॥**

**अर्थ**—किंवा दुसऱ्यांचा घात करून, किंवा परधनाचा अपहार करून किंवा तोंडपुजे लोकांनी केलेली स्तुती ऐकून जे सुख होते॥ ८०७॥

**जें आलस्यावरी पोखिजे। निद्रेमाजीं जें देखिजे। जयाच्या आद्यंतीं भुलिजे। आपुली वाट॥ ८०८॥**

**अर्थ**—जे सुख आळसाने पोसले जाते, जे झोपेत अनुभवाला येते व ज्या सुखाच्या आरंभी व शेवटी भ्रमामुळे आपली आत्मस्वरूपप्राप्तीची वाट विसरली जाते॥ ८०८॥

**तें गा सुख पार्था। तामस जाण सर्वथा। हें बहु न सांगोचि जे कथा। असंभाव्य हे॥ ८०९॥**
**ऐसें कर्मभेदें मुदलें। फळसुखही त्रिधा जालें। तें हें यथागमें केलें। गोचर तुज॥ ८१०॥**

**अर्थ**—अर्जुना, ते सुख सर्वस्वी तामस होय. त्याची कहाणी सांगणे संभवनीय नाही इतके ते निंद्य आहे; म्हणून तिचा विस्तार मी करीत नाही॥ ८०९ ॥ अशा रीतीने मूळचे एकाच प्रकारचे कर्मफळ म्हणजे सुख कर्माच्या भेदामुळे तीन प्रकारचे झाले. ते हे मी शास्त्रानुसार तुला फोड करून सांगितले॥ ८१० ॥

**तें कर्ता कर्म कर्मफळ। ये त्रिपुटी येकी केवळ। वांचूनि कांहींचि नसे स्थूळ-। सूक्ष्मीं इये॥ ८११॥**
**आणि हे तंव त्रिपुटी। तिहीं गुणीं इहीं किरीटी। गुंफिली असे पटीं। तांतुवीं जैसी॥ ८१२॥**

**अर्थ**—कर्ता, कर्म व फळ या एका त्रिपुटी वांचून या स्थूल व सूक्ष्म सृष्टींत दुसरे काहीच नाही॥ ८११॥ आणि हे अर्जुना, वस्त्र जसे तंतूनी तयार केलेले असते त्याप्रमाणे ही त्रिपुटी (कर्ता, कर्म व फळ) ह्या तीन गुणांनी (सत्व, रज व तम) भरलेली आहे॥ ८१२॥

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः। सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः॥ ४०॥**

**अर्थ**—प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या या तीन गुणांपासून अलिप्त अशी स्थावर व जंगम वस्तु पृथ्वीवर, स्वर्गात व देवतादिकातही दिसणार नाही॥ ४० ॥

**म्हणौनि प्रकृतीच्या आलोकीं। न बंधिजे इहीं सत्त्वादिकीं। तैसी स्वर्गीं ना मृत्युलोकीं। आथी वस्तु॥ ८१३॥**

**अर्थ**—म्हणून प्रकृतीच्या कक्षेत असूनही सत्वादी गुणांनी बांधली जाणार नाही अशी एकादी वस्तु मृत्युलोकांत किंवा स्वर्गात नाही. ॥ ८१३ ॥

**कैंचा लोंवेवीण कांबळा। मातियेवीण मोदळा। कां जळेंवीण कल्लोळा। होणें आहे॥ ८१४॥**

**अर्थ**—लोकरीशिवाय कांबळें, मातीवाचून ढेकूळ किंवा पाण्यावाचून लाटा उत्पन्न होतील काय ?॥ ८१४॥

**तैसें न होनि गुणाचें। सृष्टीच्या रचना रचे। ऐसें नाहींच गा साचें। प्राणिजात॥ ८१५॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे गुणांना घेतल्याशिवाय सृष्टीच्या रचनेत उत्पन्न होईल असा कोणताच प्राणिमात्र नाही॥ ८१५॥

**यालागीं हें सकळ। तिहीं गुणांचेंचि केवळ। घडलें आहे निखिळ। ऐसें जाण॥ ८१६॥**

**अर्थ**—या करता हे सर्व (जग) तीन गुणांचेच केवळ बनलेले आहे असे पक्के समज॥ ८१६॥

**गुणीं देवां त्रयी लाविली। गुणीं लोकीं त्रिपुटी पाडिली। चतुर्वर्णा घातलीं। सिनानीं उळिगें॥ ८१७॥**

**अर्थ**—गुणांमुळेच देवातही तीन भेद झालेत. गुणांनीच जगात कर्ता, कर्म व फळ असे तीन भेद केलेत. आणि चारी वर्णाना भिन्न भिन्न कर्मे लावून दिलीं॥ ८१७॥

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परन्तप। कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः॥ ४१॥**

**अर्थ**—हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना! ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांची कर्मे प्रकृतिजन्य गुणांनी निरनिराळी झाली आहेत॥ ४१॥

**तेचि चारी वर्ण। पुससी जरी कोण कोण। तरी जयां मुख्य ब्राह्मण। धुरेचे कां॥ ८१८॥**

**अर्थ**—ते चार वर्ण कोण कोणते असे जर विचारशील तर त्यामध्ये ब्राह्मण हे मुख्य अग्रणी आहेत॥ ८१८॥

**येर क्षत्रिय वैश्य दोन्ही। तेही ब्राह्मणाच्याचि मानिजे मानीं। जे ते वैदिकविधानीं। योग्य म्हणौनि॥ ८१९॥**

**अर्थ**—दुसरे क्षत्रिय आणि वैश्य या दोघांचा मानही ब्राह्मणा—सारखाच समजावा. कारण ते वेदोक्त कर्म करण्यास योग्य आहेत म्हणून॥ ८१९॥

**चौथा शूद्र जो धनंजया। वेदीं लाग कीर नाहीं तया। तऱ्ही वृत्ति वर्णत्रया-। अधीन तयाची॥ ८२०॥**

**अर्थ**—अर्जुना! चवथा जो शूद्र त्याचा मात्र वेदांशी कांही संबंध नाही. असे असले तरी. त्याच्या चरितार्थाचे साधन मात्र तीन वर्णाच्या अधींन आहे॥ ८२०॥

**तिये वृत्तीचिया जवळिका। वर्णत्रया ब्राह्मणादिकां। अहो शूद्रही कीं देखा। चौथा जाला॥ ८२१॥**

**अर्थ**—त्या वृत्तीच्या निकट संबंधामुळे ब्राह्मणादी तीन वर्णाबरोबर शूद्रही चौथा वर्ण होऊन बसला॥ ८२१॥

**जैसा फुलाचेनि सांगातें। तांतु तुरंबिजे श्रीमंतें। तैसें द्विजसंगें शूद्रातें। स्वीकारी श्रुती॥ ८२२॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे फुलांच्या बरोबर (मालेबरोबर) श्रीमंतांकडून ओवलेल्या दोऱ्याचाही सुवास घेण्यात येतो त्याप्रमाणे ब्राह्मणांच्या बरोबर शूद्राचाही श्रुतींनी (वेदाने) स्वीकार (चार वर्णांत) केला॥ ८२२॥

**ऐसेसी गा पार्था। हे चतुर्वर्णव्यवस्था। करूं आतां कर्मपथा। यांचिया रूप॥ ८२३॥**

**अर्थ**—अर्जुना, अशी ही चार वर्णांची व्यवस्था आहे. आता या चारी वर्णांच्या कर्ममार्गाचे वर्णन करू॥ ८२३॥

**जिहीं गुणीं ते वर्ण चारी। जन्ममृत्यूचिये कातरी। चुकोनियां ईश्वरीं। पैठे होती॥ ८२४॥**

**अर्थ**—ज्या कर्ममार्गाने त्रिगुणांत पडलेले चारी वर्ण, जन्म व मृत्यु यांच्या कातरीतून सुटून ते ईश्वराच्या ठिकाणी पोहोचतात. ॥ ८२४॥

**जियें आत्मप्रकृतीचे इहीं। गुणीं सत्त्वादिकीं तिहीं। कर्में चौघां चहूं ठाईं। वांटिली वर्णा॥ ८२५॥**

**अर्थ**—आत्म्याची त्रिगुणात्मक प्रकृती तिच्या सत्वादी तीन गुणांच्या चारही वर्णांना चार ठिकाणी जीं कर्में वाटून दिलीत॥ ८२५॥

**जैसें बापें जोडिलें लेंका। वांटिलें सूर्ये मार्ग पांथिकां। नाना व्यापार सेवकां। स्वामी जैसे॥ ८२६॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे बापाने संपादन केलेली संपत्ती मुलांनां वाटून द्यावी, किंवा ज्याप्रमाणे वाटसरूना त्यांचे मार्ग सूर्य दाखवून देतो किंवा मालक आपल्या नोकरांना कामे वाटून देतो॥ ८२६ ॥

**तैसी प्रकृतीच्या गुणीं। जया कर्माची वेल्हावणी। केली आहे वर्णीं। चहूं इहीं॥ ८२७॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे प्रकृतीच्या गुणांनी (सत्व, रज व तम) कर्माचा विस्तार करून त्यांची चार वर्णाचे ठिकाणी वाटणी केली॥ ८२७ ॥

**तेथ सत्त्वें आपल्या आंगीं। समीननिमीन भागीं। दोघे केले नियोगी। ब्राह्मण क्षत्रिय॥ ८२८॥**

**अर्थ**—त्या ठिकाणी सत्वगुणाने आपल्या आंगच्या सम व विषमभागाने ब्राह्मण व क्षत्रिय या दोघांना युक्त केले॥ ८२८ ॥

**आणि रज परी सात्त्विक। तेथ ठेविले वैश्य लोक। रजचि तमभेसक। तेथ शूद्र ते गा॥ ८२९॥**

**अर्थ**—आणि रज परंतु सात्विक (रज मिश्र सत्व) यांत वैश्य लोकांना ठेवले व रजच पण तममिश्रित तेथे शूद्राना ठेवले. ॥ ८२९ ॥

**ऐसा येकाचि प्राणिवृंदा। भेदु चतुर्वर्णधा। गुणींचि प्रबुद्धा। केला जाण॥ ८३०॥**

**अर्थ**—हे बुद्धिमंता अर्जुना, अशा प्रकारे एकाच प्राणिसमुदायाचा चार प्रकारचा भेद ह्या गुणांनीच केला आहे हे लक्षांत ठेव॥ ८३० ॥

**मग आपलें ठेविलें जैसें। आइतेंचि दीपें दिसे। गुणभिन्न कर्म तैसें। शास्त्र दावी॥ ८३१॥**

**अर्थ**—मग आपले ठेवलेले-दिव्याने जसे सहज दिसते त्याप्रमाणे गुणांच्यामुळे निरनिराळे झालेले कर्म शास्त्र दाखवून देते॥ ८३१ ॥

**गूढार्थदीपिका**—अज्ञान आहे तो पर्यन्त मनुष्य हा सत्व, रज व तम तीन गुणांनी बांधला गेलेला आहे. हे तीन गुण प्रकृतीचा स्वभाव असल्यामुळे ब्रह्मज्ञान होईपर्यन्त या तीनगुणांच्या प्रभावापासून मनुष्याची सुटका नाही. अर्थातच या तीन गुणांच्या कमी जास्त प्रमाणांतील मिश्रणाने ब्राह्मण क्षत्रियादी चार वर्णांची निर्मिती झाली. त्यामुळे प्रत्येकाचा स्वभाव किंवा प्रकृती या गुणांच्या मिश्रणानुसारच असते. व विचार आणि विकार यांचे प्राबल्यही त्या गुणांच्या प्रमाणातच माणसात राहते.

सत्वाचा गुण ज्ञान असल्याकारणाने अज्ञान निवृत्तीकरता या गुणाचा उत्कर्ष होणे आवश्यक आहे. जितक्या जितक्या प्रमाणांत माणसात हा गुण वाढत जाईल तितक्या तितक्या प्रमाणांत मोक्षाचा पल्ला तो गाठत जाईल. मनुष्याच्या स्वभावाची ही गुणानुसार झालेली घडण लक्षांत घेऊनच ब्राह्मण क्षत्रियादी चारी वर्णांना गुणानुसार निरनिराळी कर्मे शास्त्रांनी लावून दिलीत. उद्देश हा की ही कर्मे भगवदाज्ञा म्हणून त्यांनी आचरली असता अनायासेच त्यांचे अंत:करण शुद्ध म्हणजे सत्त्वप्रधान व्हावे व ज्ञानाच्या उदयाचा मार्ग निष्कंटक व्हावा. ह्यालाच अंत:करणाची शुद्धी म्हणतात व ती केवळ शास्त्रोक्त कर्मांच्या फलासक्तिरहित आचरणाने प्राप्त होते. शास्त्रोक्त कर्मांची विभागणी अशारीतीने या चार वर्णांच्या गुणांनुसार असल्यामुळे तीही स्वाभाविकच म्हणावी लागते. घरात अंधारात ठेवलेली एखादी वस्तु फक्त दाखवून देण्याचे कार्य दिवा ज्याप्रमाणे करतो त्याच प्रमाणे चार वर्णांच्या प्रकृतीनुसार अंत:करणशुद्धी द्वारा मोक्षाला उपयोगी पडणारी ही कर्मे फक्त दाखवून देण्याचे कार्य शास्त्रें करीत असतात.

**तेंचि आतां कोण कोण। वर्णविहिताचें लक्षण। हें सांगों ऐक श्रवण-। सौभाग्यनिधी॥ ८३२॥**

**अर्थ**—श्रवणरूपी सौभाग्याचा निधी असलेल्या अर्जुना, तुला आता निरनिराळ्या वर्णांची शास्त्रांनी विहित केलेली कर्मे कोणती ती सांगतो, ऐक॥ ८३२ ॥

**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च। ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम्॥ ४२॥**

**अर्थ**—चित्ताचे नियमन, बाह्येंद्रियांचे नियमन, कायिक, वाचिक व मानसिक तप, शुचिर्भूतपणा, क्षमा, सरळपणा, शास्त्रांचे ज्ञान, अनुभूति आणि श्रुतिस्मृति विषयीं श्रद्धा हे ब्राह्मणांचे स्वभावसिद्ध कर्म होय॥ ४२॥

**तरी सर्वेंद्रियांचिया वृत्ती। घेऊनि आपल्या हाती। बुद्धि आत्मया मिळे कांतीं। प्रिया जैसी॥ ८३३॥**

**अर्थ**—तर प्रिया ज्याप्रमाणे आपल्या पतीशी एकान्तात एकरूप होते त्याप्रमाणे सर्व इंद्रियांच्या वृत्तींना आपल्या हातांत घेऊन (निग्रह करून) बुद्धि आत्मस्वरूपीं मिळते॥ ८३३॥

**ऐसा बुद्धीचा उपरमु। तया नाम म्हणिपे शमु। तो गुण गा उपक्रमु। जया कर्माचा॥ ८३४॥**

**अर्थ**—अशी जी बुद्धिची शांत स्थिती तिला शम म्हणतात. आणि या गुणाने (शमाने) ज्या कर्माचा आरंभ होतो॥ ८३४॥

**आणि बाह्येंद्रियांचें धेंडें। पिटूनि विधीचेनि दंडें। नेदिजे अधर्माकडे। कहींचि जावों॥ ८३५॥**

**अर्थ**—आणि बाह्य इंद्रियांच्या धेंडांना शास्त्रांच्या नियमांनी शासन करून पिटाळून लावतो व अधर्माकडे त्यांना (इंद्रियांना) कधी जाऊंच देत नाही॥ ८३५॥

**तो पैं गा शमा विरजा। दम गुण जेथ दुजा। आणि स्वधर्माचिया वोजा। जिणें जें कां॥ ८३६॥**

**अर्थ**—जो दम नावाचा दुसरा गुण शमाला सहाय्य करणारा असतो. शिवाय, त्याच्यामुळे स्वधर्मानुसार जीवन व्यतीत करता येते.॥ ८३६॥

**तेवींचि सटवीचिये राती। न विसंबिजे जेवीं वाती। तैसा ईश्वरनिर्णयो चित्तीं। वाहणें सदा॥ ८३७॥**

**अर्थ**—त्याच प्रमाणे सटवाईच्या रात्री (पाचवीला) दिव्याला जसे क्षणभरही विसरले जात नाही; त्याप्रमाणे अहर्निश ईश्वरा विषयीचा विचार अंत:करणांत बाळगला जातो॥ ८३७॥

**तया नाम तप। तें तिजया गुणाचें रूप। आणि शौचही निष्पाप। द्विविध जेथ॥ ८३८॥**

**अर्थ**—त्याचे नाव तप. तें तिसऱ्या गुणाचे लक्षण होय आणि निष्पाप (शुद्ध) असा शुचिर्भूतपणाही जेथे दोन प्रकारचा आहे॥ ८३८॥

**मन भावशुद्धी भरलें। आंग क्रिया अळंकारिलें। ऐसें सबाह्य जियालें। साजिरें जें कां॥ ८३९॥**

**तया नाम शौच पार्था। तो कर्मीं गुण जये चौथा। आणि पृथ्वीचिया परी सर्वथा। सर्व जें साहाणें॥ ८४०॥**

**अर्थ**—मन शुद्ध भावनेने भरलेले आणि शरीर विहित कर्मांनी अलंकृत झालेले, असे अंतर्बाह्य सुंदर झालेले जे जीवन॥ ८३९॥ अर्जुना, त्याचे नाव "शौच" हा कर्मातला चवथा गुण होय. आणि पृथ्वीप्रमाणे जे सर्व (बरे वाईट) सहन करणे॥ ८४०॥

**ते गा क्षमा पांडवा। गुण जेथ पांचवा। स्वरांमाजीं सुहावा। पंचमु जैसा॥ ८४१॥**

**अर्थ**—(सप्त) स्वरांमध्ये ज्या प्रमाणे पंचम (पांचवा स्वर) शोभिवंत त्याप्रमाणे, अर्जुना 'क्षमा' (ब्राह्मण कर्मात) पाचवा गुण होय.॥ ८४१॥

**आणि वांकडेनि वोघेंसीं। गंगा वाहे उजूचि जैसी। कां पुठीं वळला ऊंसीं। गोडी जैसी॥ ८४२॥**

**तैसा विषमांहि जीवां-। लागीं उजुकारु बरवा। तें आर्जव गा सहावा। जेथींचा गुण॥ ८४३॥**

**अर्थ**—आणि वाकड्या प्रवाहाने गंगा वहात असली तरी ती ज्या प्रमाणे सरळ (समुद्राकडे) वाहते किंवा ऊस (पाठीमागे) वाकडा वळला असला तरी त्याची गोडी एक सारखीच असते॥ ८४२॥ त्याप्रमाणे आपल्याला त्रास देणाऱ्या प्राणिमात्राविषयी देखील सरळपणाचा व्यवहार करणे तो आर्जव (ज्या ब्राह्मण कर्मात) सहावा गुण होय.॥ ८४३॥

**आणि पाणियें प्रयत्नें माळी। अखंड जचे झाडामुळीं। परी तें आघवेंचि फळीं। जाणे जेवीं॥ ८४४॥**

**तैसें शास्त्राचारें तेणें। ईश्वरुचि येक पावणें। हें फुडें जें कां जाणणें। तें येथ ज्ञान॥ ८४५॥**

**अर्थ**—आणि माळी हा प्रयत्नाने सतत खपून झाडाच्या मुळाला पाणी घालतो. परंतु तो आपले परिश्रम जसे फळाच्याठिकाणी पहातो॥ ८४४॥ त्याप्रमाणे शास्त्रानुसार आचरण करून त्याच्या योगाने ईश्वराची प्राप्ती हे जे पक्के जाणणे ते येथे (ब्राह्मण कर्मात) ज्ञान आहे॥ ८४५॥

**तें गा कर्मीं जिये। सातवा गुण होये। आणि विज्ञान हें पाहें। एवंरूप॥ ८४६॥**

**अर्थ**—हे ज्ञान ज्या कर्माचा (ब्राह्मण कर्माचा) सातवा गुण आहे आणि विज्ञान (पुढे सांगितल्याप्रमाणे) हे अशा स्वरूपाचे आहे ते लक्षात घे॥ ८४६॥

**तरी सत्त्वशुद्धीचिये वेळे। शास्त्रें कां ध्यानबळें। ईश्वरतत्त्वींचि मिळे। निष्टंकबुद्धी॥ ८४७॥**

**अर्थ**—तर शास्त्र विचाराने किंवा ध्यानाच्या अभ्यास सामर्थ्याने जी निश्चयात्मिका बुद्धि सत्वशुद्धीच्यावेळी (सत्त्व शुद्धि साधल्यानंतर) ईश्वररूपी मिळते॥ ८४७॥

**हें विज्ञान बरवें। गुणरत्न जेथ आठवें। आणि आस्तिक्य जाणावें। नववा गुण॥ ८४८॥**

**अर्थ**—अर्जुना, हे चांगले विज्ञान आहे, तें या ब्राह्मण कर्मांत आठवे गुणरत्न आहे आणि आस्तिक्य हा नववा गुण समज.॥ ८४८॥

**पैं राजमुद्रा आथिलीया। प्रजा भजे भलतया। तेवीं शास्त्रें स्वीकारिलिया। मार्गमात्रातें॥ ८४९॥**

**अर्थ**—राजाचा शिक्का असलेल्या कोणत्याही हुकुमाचा प्रजा जशी स्वीकार करते त्याप्रमाणे शास्त्राने स्वीकारलेल्या सर्व मार्गांना॥ ८४९॥

**आदरें जें कां मानणें। तें आस्तिक्य मी म्हणें। तो नववा गुण जेणें। कर्म तें साच॥ ८५०॥**

**अर्थ**—जे आदराने मानणे त्याला मी आस्तिक्य म्हणतो. तो नववा गुण आहे आणि त्याच्या योगाने (आस्तिक्यामुळे) ते ब्राह्मण कर्म खरे खरे होते.॥ ८५०॥

**एवं नवही शमादिक। गुण जेथ निर्दोष। तें कर्म जाण स्वाभाविक। ब्राह्मणाचें॥ ८५१॥**

**अर्थ**—अशा रीतीने शमादिक नवही गुण जेथे (ज्या कर्मात) निर्दोष रीतीने असतील ते ब्राह्मणाचे स्वाभाविक कर्म हे लक्षांत ठेव.॥ ८५१॥

**तो नवगुणरत्नाकरु। या नवरत्नांचा हारु। न फेडित ले दिनकरु। प्रकाशु जैसा॥ ८५२॥**

**नाना चांपा चांपौळी पूजिला। चंद्रु चंद्रिका धवळला। कां चंदनु निजें चर्चिला। सौरभ्यें जेवीं॥ ८५३॥**

**तेवीं नवगुणटिकला। लेणे ब्राह्मणाचें अव्यंग। कहींचि न संडी आंग। ब्राह्मणाचें॥ ८५४॥**

**अर्थ**—प्रकाशरूप सूर्याने जसा प्रकाश धारण करावा त्याप्रमाणे या नवरत्नहाराला तो नवगुणांचा समुद्र असणारा (ब्राह्मण) सदैव धारण करतो.॥ ८५२॥ किंवा चांपा जसा आपल्या चांपेकळ्यांनी सुशोभित होतो किंवा चंद्र जसा आपल्याच चंद्रप्रकाशाने उजळतो किंवा चंदन जसे आपल्याच सुवासाने भरलेलेच असते॥ ८५३॥ त्याप्रमाणे नऊ गुणांच्या रत्नांनी जडलेला हा अलंकार ब्राह्मणाचे निर्मळ भूषण आहे, तो ब्राह्मणाच्या आंगापासून कधीही दूर होत नाही.॥ ८५४॥

**आतां उचित तें क्षत्रिया। तेंही कर्म धनंजया। सांगों ऐक प्रज्ञेचिया। भरोवरी॥ ८५५॥**

**अर्थ**—अर्जुना आता क्षत्रियांना उचित जे कर्म तेही सांगतो. तें तूं बुद्धीच्या सामग्रीने ऐक॥ ८५५॥

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम्। दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम्॥ ४३॥**

**अर्थ**—पराक्रम, तेज, धैर्य, दक्षता, युद्धांतून पळून न जाणे, दातृत्व आणि लोकांवर सत्ता चालवणे हे क्षत्रियांचे स्वभावसिद्ध कर्म होय.॥ ४३॥

**तरी भानु हा तेजें। नापेक्षी जेवी विरजें। कां सिंहें न पाहिजे। जावळिया॥ ८५६॥**

**अर्थ**—सूर्य हा प्रकाशाच्या बाबतीत ज्याप्रमाणे कोणाच्या मदतीची अपेक्षा करीत नाही किंवा सिंहाला (पराक्रमाकरता) दुसऱ्याची सोबत लागत नाही॥ ८५६॥

**ऐसा स्वयंभ जो जीवें लाठु। सावायेंवीण उद्भटु। तें शौर्य गा जेथ श्रेष्ठु। पहिला गुण॥ ८५७॥**

**अर्थ**—असा स्वत:च जो बलाढ्य व कोणाच्या सहाय्यावाचून शूर, तो अर्जुना! (क्षात्रप्रकृतीचा) शौर्य हा पहिला गुण होय.॥ ८५७॥

**आणि सूर्याचेनि प्रतापें। कोडिही नक्षत्र हारपे। ना तो तरी न लोपे। सचंद्रीं तिहीं॥ ८५८ ॥**

**अर्थ**—आणि सूर्याच्या प्रकाशाच्या प्रभावाने कोट्यावधी नक्षत्रे असली तरी ती लोप पावतात (निस्तेज होतात) पण ती (नक्षत्रे) चंद्रासह असली तरी त्याला (सूर्याला) मात्र लोपवू (निस्तेज करू) शकत नाहीत॥ ८५८ ॥

**तैसेनि आपुले प्रौढिगुणें। जगा या विस्मयो देणें। आपण तरी न क्षोभणें। कायसेनही॥ ८५९ ॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे आपल्या सामर्थ्याने व गुणाने जगाला चकित करून टाकणे व आपण मात्र कोणत्याही गोष्टीमुळे विचलित न होणे॥ ८५९ ॥

**तें प्रागल्भ्यरूप तेजा। जिये कर्मीं गुण दुजा। आणि धीरु तो तिजा। जेथींचा गुण॥ ८६० ॥**

**अर्थ**—पाणीदारपणा असलेले तेज ज्या क्षात्रकर्मात दुसरा गुण आहे व धैर्य हा तिसरा गुण आहे॥ ८६० ॥

**वरि पडलिया आकाश। बुद्धीचे डोळे मानस। झांकी ना तें परियेस। धैर्य जेथें॥ ८६१ ॥**

**अर्थ**—वरून आकाश जरी कोसळले तरी ज्याच्या बुद्धीचे डोळे व मन झाकले जात नाही त्याचे नाव धैर्य होय. ॥ ८६१ ॥

**आणि पाणी हो भलतेतुकें। परी तें जिणौनि पद्म फांके। कां आकाश उंचिया जिंके। आवडे तयातें॥ ८६२ ॥**

**तेवीं विविधा अवस्था। पातलिया जिणौनि पार्था। प्रज्ञा फळतया अर्था। वेझ देणें जें॥ ८६३ ॥**

**तें दक्षत्व गा चोख। जेथ चौथा गुण देख। आणि जुंझ अलौकिक। तो पांचवा गुण॥ ८६४ ॥**

**अर्थ**—आणि पाणी वाटेल तितके असले तरी त्याला जिंकून कमल पाण्यावर उमलते किंवा आकाश उंचीच्या बाबतीत वाटेल त्याला जिंकते॥ ८६२ ॥ त्याप्रमाणे अर्जुना कितीही प्रसंग आले तरी त्यावर मात करून इष्ट फळ देणाऱ्या कार्यात चाणाक्षपणाने प्रवेश करणे. ॥ ८६३ ॥ याला दक्षता असे म्हणतात व तो (क्षात्रप्रकृतीचा) चवथा गुण होय व अलौकिक झुंज देणे हा पांचवा गुण होय. ॥ ८६४ ॥

**आदित्याचीं झाडें। सदा सन्मुख सूर्याकडे। तेवीं समोर शत्रूपुढें। होणें सदा॥ ८६५ ॥**

**अर्थ**—सूर्यफुलाची झाडें ज्याप्रमाणे नेहमी सूर्याकडे सन्मुख असतात, त्याप्रमाणे शत्रूंच्या समोर नेहमी असणे (शत्रूला पाठ न दाखवणे)॥ ८६५ ॥

**माहेवणी प्रयत्नेंसी। चुकविजे सेजे जैसी। रिपू पाठी नेदिजे तैसी। समरांगणीं॥ ८६६ ॥**

**अर्थ**—गरोदर स्त्री ज्या प्रमाणे हरप्रयत्नाने नवऱ्याची शय्यासोबत टाळते, त्याप्रमाणे युद्ध भूमीवर शत्रूला पाठ न दाखवणे॥ ८६६ ॥

**हा क्षत्रियांचेया आचारीं। पांचवा गुणेंद्र अवधारीं। चहूं पुरुषार्थां शिरीं। भक्ति जैसी॥ ८६७ ॥**

**अर्थ**—चारही पुरुषार्थात (धर्म, अर्थ, काम व मोक्ष) भक्ति हा पुरुषार्थ जसा श्रेष्ठ त्याप्रमाणे क्षत्रियांच्या आचारात हा पाचवा गुण सर्वोत्कृष्ट आहे हे ध्यानात ठेव॥ ८६७ ॥

**आणि जालेनि फुलें फळें। शाखिया जैसी मोकळे। का उदार परिमळें। पद्माकरु॥ ८६८ ॥**

**नाना आवडीचेनि मापें। चांदिणें भलतेणें घेपे। पुढिलांचेनि संकल्पें। तैसें जें देणे॥ ८६९ ॥**

**तें उमप गा दान। जेथ सहावें गुणरत्न। आणि आज्ञे एकायतन। होणें जें कां॥ ८७० ॥**

**अर्थ**—आणि झाडाला फुले आणि फळे आली म्हणजे डाहाळ्या (ती देऊन टाकून) मोकळ्या होतात किंवा सुगंध देण्यात कमळे जशी उदार असतात॥ ८६८ ॥ किंवा चादणे हे आवडेल त्याने आवडेल त्या मापांने घ्यावे त्याप्रमाणे दुसऱ्यांच्या (याचकांच्या) इच्छे प्रमाणे त्याला धन देणे॥ ८६९ ॥ ते अपरिमित दान जेथे क्षात्रकर्मात सहावे गुणरत्न आहे आणि आज्ञेचे रहाण्याचे एकच स्थान होणे (म्हणजे ज्याची आज्ञा सर्वांनी ऐकणे)॥ ८७० ॥

**पोषूनि अवयव आपुले। करविजती मातविले। तेवीं पालणें लोभविलें। जग जें भोगणें॥ ८७१ ॥**

**तया नाम ईश्वरभावो। जो सर्वसामर्थ्याचा ठावो। तो गुणांमाजीं रावो। सातवा जेथ॥ ८७२ ॥**

**अर्थ**—आपल्या अवयवांना धडधाकट करून त्यांच्याकडून कोणतेही काम करवून घेता येते. त्याप्रमाणे प्रजेचे

पालन करून त्यांच्या प्रेमामुळे जगाचा (प्रजेचा) उपभोग घेणे॥ ८७१ ॥ यालाच 'ईश्वरभाव' असे म्हणतात व जो सर्व सामर्थ्याचे स्थल (ठिकाण) आहे. तो हा गुणांमध्ये सर्वश्रेष्ठ ज्या क्षात्र कर्मात सातवा गुण आहे. ॥ ८७२ ॥

**गूढार्थदीपिका—तया नाम ईश्वरभावो। जो सर्व सामर्थ्याचा ठावो।** चातुवर्ण प्रधान समाज पद्धतीत क्षत्रियाची भूमिका समाज रक्षणाची व राज्य करून प्रजापालनाची आहे. क्षत्रियांच्या सातही गुणांत हा सर्वांत श्रेष्ठ व म्हणून महत्वाचा गुण आहे असे माउली या ठिकाणी सांगत आहे.

राजाने प्रजेने पालन स्वत:ला पिता व प्रजेला पुत्र समजून करावे अशी धर्मशास्त्रांत राजाची कर्तव्ये सांगत असतांना म्हटले आहे. ही वात्सल्याची भावना प्रजेविषयी असल्यास प्रजेची पिळवणूक वगैरे करण्याचा प्रश्न निर्माणच होऊ शकत नाही. पित्याचे मुलांवर नियंत्रण असते. पण ते कल्याणाच्या पोटी. त्याचप्रमाणे क्षत्रियाने समाजाचे किंवा प्रजेचे जे नियंत्रण करावयाचे ते त्यांच्या कल्याणाच्या पोटी. हा नियंत्रणाचा किंवा शासनाचा जो भाग आहे त्यालाच 'ईश्वरभाव' असे म्हणतात. प्रजेचे प्रेम संपादन करून नंतर उपभोग घेणे हे क्षत्रियाचे 'शासन' कल्पनेत अंतर्भूत असल्यामुळे राज्याच्या उपभोगाला अर्थातच गौण स्थान प्राप्त होते. क्षत्रियाचा हा खरा व श्रेष्ठ गुण आहे.

**ऐसें जें शौर्यादिकीं। इहीं सात गुणविशेखीं। अळंकृत सप्तऋखीं। आकाश जैसें॥ ८७३॥**
**तैसें सप्तगुणीं विचित्र। कर्म जें जगीं पवित्र। तें सहज जाण क्षात्र। क्षत्रियाचें॥ ८७४॥**

**अर्थ—**सप्तर्षीनी सुशोभित केलेल्या आकाशाप्रमाणे अशा या शौर्यादी सात गुणांनी अलंकृत असलेला पुरुष शोभतो. ॥ ८७३ ॥ त्याप्रमाणे या सात अलौकिक गुणांनी अलंकृत झालेले या जगात जे पवित्र कर्म असते. ते क्षत्रियांचे स्वाभाविक क्षात्रकर्म आहे असे समज॥ ८७४॥

**नाना क्षत्रिय नव्हे नरु। तो सत्त्वसोनयाचा मेरु। म्हणौनि गुणस्वर्गा आधारु। सातां इयां॥ ८७५॥**

**अर्थ—**किंवा हा क्षत्रिय म्हणजे मनुष्य नव्हे तर तो सत्वरूप सोन्याचा मेरु पर्वतच आहे. म्हणून तर तो या सात गुणरूपी स्वर्गाला आधार होतो. (धरून ठेवतो)॥ ८७५॥

**नातरी सप्तगुणार्णवीं। परिवारली बरवी। हे क्रिया नव्हे पृथ्वी। भोगीतसे तो॥ ८७६॥**

**अर्थ—**किंवा हे (क्षात्र) कर्म नव्हेत तर सात गुणरूपी समुद्रांनी वेढलेली पृथ्वीच असून तिचा तो उपभोग घेत असतो॥ ८७६॥

**कां गुणांचे सातांही ओघीं। हे क्रिया ते गंगा जगीं। तया महोदधीचिया आंगीं। विलसे जैसी॥ ८७७॥**

**अर्थ—**किंवा या सात गुणांच्या ओघांनी ही क्रियारूपी (क्षात्रक्रियारूपी) गंगा या (क्षत्रियरूपी) महासागराच्या अंगावर जणुं काय विलास करीत आहे. ॥ ८७७॥

**परी हें बहु असो देख। शौर्यादि गुणात्मक। कर्म गा नैसर्गिक। क्षत्रजातीसी॥ ८७८॥**

**अर्थ—**परंतु हा विस्तार पुरे. शौर्यादिगुणात्मक कर्मे ही क्षत्रिय जातीची स्वाभाविक कर्मे आहेत॥ ८७८॥

**आतां वैश्याचिये जाती। उचित जे महामती। तें ऐकें गा निरुती। क्रिया सांगों॥ ८७९॥**

**अर्थ—**हे बुद्धिमान् अर्जुना, वैश्य जातीचे जे उचित कर्म तेही स्पष्ट करून सांगतो ऐक॥ ८७९॥

**कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्। परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम्॥ ४४॥**

**अर्थ—**शेती करणे, गुरे बाळगणे, क्रयविक्रय करणे हे वैश्यांचे स्वाभाविक कर्म होय. आणि सेवा करणे हे शूद्राचेही स्वाभाविक कर्म होय॥ ४४॥

**तरी भूमि बीज नांगरु। यया भांडवलाचा आधारु। घेऊनि लाभु अपारु। मेळवणें जें॥ ८८०॥**
**किंबहुना कृषी जिणें। गोधनें राखोनि वर्तणें। कां समर्घीची विकणें। महर्घी वस्तु॥ ८८१॥**
**येतुलाचि पांडवा। वैश्यातें कर्माचा मेळावा। हा वैश्यजातिस्वभावा-। आंतुला जाण॥ ८८२॥**

**अर्थ—**जमीन, बियाणे व नांगर या भांडवलाच्या आधारावर खूप फायदा मिळवणे॥ ८८०॥ किंबहुना

शेती करून निर्वाह करणे, गाई म्हशींना पाळून चरितार्थ, चालविणे किंवा स्वस्तात घेतलेली वस्तू महाग विकणे ॥ ८८१ ॥ अर्जुना, एवढ्याच गोष्टी वैश्याच्या वृत्तीच्या आहेत. त्याच वैश्य जातीच्या स्वाभाविक कर्माच्या कक्षेत येतात असे समज ॥ ८८२ ॥

**आणि वैश्य क्षत्रिय ब्राह्मण। हे द्विजन्मे तिन्हीं वर्ण। ययांचें जें शुश्रूषण। तें शूद्रकर्म ॥ ८८३ ॥**

**अर्थ**—आणखी वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण हे दोनदा जन्मलेले (पहिला सर्व सामान्य शौक्ल नांवाचा जन्म व उपनयनादी संस्कारामुळे दुसरा जन्म) असे तिन्ही वर्ण, त्यांची सेवा करणे हे शूद्राचे कर्म (स्वाभावकि) होय ॥ ८८३ ॥

**पैं द्विजसेवेपरौतें धांवणें नाहीं शूद्रातें। एवं चतुर्वर्णोचितें। दाविलीं कर्में ॥ ८८४ ॥**

**अर्थ**—ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या द्विजांच्या सेवे व्यतिरिक्त शूद्रांना अन्यत्र कर्मे नाहीत याप्रमाणे चारही वर्णांना उचित अशी जी कर्मे ती तुला दाखवून दिली ॥ ८८४ ॥

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः। स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥ ४५ ॥**

**अर्थ**—आपापल्या कर्माच्या ठिकाणी जो रत असतो त्याला ज्ञान निष्ठेला पात्र होण्याची योग्यात येते. आपल्या कर्माच्या ठिकाणी तत्पर असणाऱ्याला ती कशी येते ते ऐक ॥ ४५ ॥

**आतां इयेचि विचक्षणा। वेगळालिया वर्णा। उचित जैसें करणां। शब्दादिक ॥ ८८५ ॥**

**अर्थ**—आता, हे शाहाण्या अर्जुना, ज्याप्रमाणे शब्दादी विषय श्रोत्रादि इंद्रियांना योग्य आहेत, त्याप्रमाणे हीच कर्मे (आतापर्यंत सांगितलेली कर्मे) वेगवेगळ्या वर्णांना योग्य आहेत ॥ ८८५ ॥

**नातरी जळदच्युता। पाणिया उचित सरिता। सरितेंसीं पांडुसुता। सिंधु उचितु ॥ ८८६ ॥**
**तैसें वर्णाश्रमवशें। जें करणीय आलें असे। गोरेया आंगा जैसें। गोरेपण ॥ ८८७ ॥**

**अर्थ**—किंवा मेघापासून पडलेल्या पाण्याला ज्याप्रमाणे नदी योग्य आणि नदीला अर्जुना ज्याप्रमाणे समुद्र योग्य आहे ॥ ८८६ ॥ गोऱ्या अंगाला ज्याप्रमाणे गोरेपणा शोभतो त्याप्रमाणे वर्णाश्रमानुसार आपल्या वाट्याला कर्तव्य म्हणून आलेले कर्म असेल ते त्याला शोभतें ॥ ८८७ ॥

**तया स्वभावविहिता कर्मा। शास्त्राचेनि मुखें वीरोत्तमा। प्रवर्तावयालागीं प्रमा। अढळ कीजे ॥ ८८८ ॥**

**अर्थ**—हे वीरश्रेष्ठा अर्जुना, (वर्णाच्या) स्वभावानुसार विहित केलेल्या कर्माचे शास्त्रांत सांगितल्याप्रमाणे आचरण करण्याविषयी आपली बुद्धी निश्चित करावी ॥ ८८८ ॥

**पैं आपुलेंचि रत्न थितें। घेपे पारखियाचेनि हातें। तैसें स्वकर्म आपैतें। शास्त्रें करावें ॥ ८८९ ॥**

**अर्थ**—आपल्याच जवळ असलेले रत्न, रत्नपारख्याकडून परीक्षा करून ज्याप्रमाणे घ्यावे त्याप्रमाणे वर्णानुसार प्राप्त झालेले आपले स्वाभाविक कर्म शास्त्रानुसार (शास्त्रातून समजून घेऊन) करावे ॥ ८८९ ॥

**जैसी दिठी असे आपुलिया ठायीं। परी दीपेंवीण भोग नाहीं। मार्गु न लहतां काई। पाय असतां होय ॥ ८९० ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे आपल्याजवळ दृष्टी असूनही (आंधारात) दिव्याशिवाय तिचा उपयोग होत नाही. मार्गच जर सांपडला नाही तर पाय असून काय उपयोग? ॥ ८९० ॥

**म्हणौनि ज्ञातिवशें साचारु। सहज असे जो अधिकारु। तो आपुलालिया शास्त्रें गोचरु। आपण कीजे ॥ ८९१ ॥**

**अर्थ**—म्हणून जातिधर्मानुसार स्वाभाविक आपल्याला जो अधिकार (कर्माचा) प्राप्त झालेला असतो, तो आपापल्या शास्त्रानुसार आपणच समजून घ्यावा ॥ ८९१ ॥

**मग घरींचाचि ठेवा। जेवीं डोळ्या दावी दिवा। तरी घेतां काय पांडवा। आडळु असे ॥ ८९२ ॥**
**तैसें स्वभावें भागा आलें। वरी शास्त्रें खरें केलें। तें विहित जो आपुलें। आचरे गा ॥ ८९३ ॥**

**अर्थ**—मग अर्जुना, घरचाच द्रव्याचा ठेवा जर दिव्याने. डोळ्यांना दाखवून दिला तर तो घेण्याला काय आडकाठी आहे? ॥ ८९२ ॥ त्याप्रमाणे वर्णाच्या स्वाभाविक धर्माप्रमाणे आपल्या वाट्याला आलेले त्याशिवाय

(भरीला भर म्हणून) शास्त्राने ज्याला पुष्टी दिली (खरे ठरविले) ते आपले विहित कर्म जो आचरण करतो॥ ८९३॥

**परी आळसु सांडुनी। फळकाम दवडुनी। आंगें जीवें मांडुनी। तेथेंचि भरु॥ ८९४॥**
**वोघीं पडिलें पाणी। नेणे आनानी वाहणी। तैसा जाय आचरणी। व्यवस्थोनी॥ ८९५॥**
**अर्जुना जो यापरी। तें विहित कर्म स्वयें करी। तो मोक्षाच्या ऐल्द्वारीं। पैठा होय॥ ८९६॥**

**अर्थ**—परंतु आळस टाकून देऊन व फळाची इच्छा सोडून देऊन शरीर व मन (अर्पण करून) ओतून त्याठिकाणी भर देतो॥ ८९४॥ वोघांत पडलेल्या पाण्याला निराळ्या मार्गाने वाहणे माहीत नसते त्याप्रमाणे ज्याचे आचरण व्यवस्थित (शास्त्रानुसार) असते॥ ८९५॥ अर्जुना, जो या प्रमाणे ते विहित कर्म स्वत: करतो तो मोक्षाच्या अलीकडील तीराला प्राप्त होतो॥ ८९६॥

**जे अकरणा आणि निषिद्धा। न वचेचि कांहीं संबंधा। म्हणौनि भवा विरुद्धा। मुकला तो॥ ८९७॥**

**अर्थ**—जो विहित कर्म न करणे व निषिद्ध कर्म करणे या दोहोंचाही संबंध स्वत:ला लागू देत नाही असा म्हणूनच (आत्मस्वरूपाला) विरुद्ध असा जो संसार त्यातून तो मुक्त होतो॥ ८९७॥

**आणि काम्यकर्माकडे। न परतेचि जेथ कोडें। तेथ चंदनाचेही खोडे। न लेचि तो॥ ८९८॥**

**अर्थ**—आणि काम्यकर्माकडे तो कोडकौतुकाने म्हणून कधी वळतच नसल्यामुळे चंदनाचा खोडाही पायात अडकवण्यास दिला तरी तो अडकवून घेत नाही॥ ८९८॥

**येर नित्य कर्म तंव। फलत्यागें वेंचिलें सर्व। म्हणौनि मोक्षाची शीव। ठाकूं लाहे॥ ८९९॥**

**अर्थ**—बाकीचे नित्य कर्म तर फळत्याग केल्यामुळे पूर्णपणे नाहीसे होते म्हणून तो मोक्षाची सीमा गाठूं लागतो॥ ८९९॥

**गूढार्थदीपिका**—कर्म हा शब्द या ठिकाणी आपल्याकडून होणाऱ्या कोणत्याही क्रियेला धरून वापरण्यांत आलेला नाही. वर्णानुसार शास्त्राने विहित केलेले कर्म या अर्थाने हा शब्द वापरण्यांत आलेला आहे. वर्णानुसार शास्त्राने कांही नित्य कर्मे लावून दिलेली आहेत. या कर्म लावून देण्यामागे शास्त्राचा उद्देश्य असा आहे की जीवाची विषयांकडे जाण्याची जी धाव आहे तिला नियंत्रित करावे. कोणतेही कर्म अहंकाराशिवाय होऊ शकत नाही व अहंकारच जीवाला बंधनात पाडणारा आहे. अहंकारपूर्वक कर्म होताच कर्ता, करण व कर्म ही कर्मत्रयी त्याच्या मानगुटी बसल्याशिवाय राहत नाही. शास्त्रोक्त नित्य कर्मे भगवदाज्ञा म्हणून, भगवंताच्या प्रेमाकरता व भगवंताला समर्पण करून आचरल्यास अर्थातच त्या कर्माचे कर्तृत्व आपल्याकडे ओढून घेण्याचा प्रश्न उत्पन्न होत नाही. ते कर्म त्यामुळे अहंकारपूर्वक होत नाही व परिणामत: कर्ता करण व कर्म ह्या त्रयी पासून तो मुक्त राहतो. स्वामीची आज्ञा पालन केल्यामुळे स्वामीला जसा आनंद व्हावा व नोकराचा त्या कर्माशी जसा संबंध नसावा तशी स्थिती या ठिकाणी रहाते. ह्या नित्य कर्माच्या आचरणाने भगवान् संतुष्ट होतो व कर्मकर्ता हळुहळु भगवदाज्ञा परतंत्र होत असल्यामुळे अहंकारापासून मुक्त होत जातो. शरीर, मन व इंद्रिये यांच्या प्रवृत्तीना या नित्य कर्माच्या आचरणामुळे अनायासेच आळा बसत जातो व अंत:करणाची वृत्ति अंतर्मुख होण्याला मदत होते.

सर्व शास्त्रोक्त कर्माची उभारणी सत्वाचा उत्कर्ष करण्या करताच असल्यामुळे अंत:करणांत या निष्काम कर्माच्या आचरणाने चित्ताची शुद्धी होण्याला मदत होते व यथार्थ ज्ञानाचे बीज रुजण्याकरता लागणारी शुद्ध भूमी अनायासेच तयार होते. ही नित्यकर्मे अशा रीतीने निष्काम होत असल्याकारणाने कर्माचे बंधन निर्माण होत नाही. म्हणूनच ते कर्म नाहीसे होते म्हणजे नैष्कर्म्यात परिणत पावते व अशारीतीने मोक्षाची शीव जी अंत:करण शुद्धी तो तो कर्म करणारा अनायासेच गाठतो.

**ऐसेनि शुभाशुभीं संसारीं। सांडिला तो अवधारी। वैराग्यमोक्षद्वारीं। उभा ठाके॥ ९००॥**

**अर्थ**—अशा प्रकारे पापपुण्यात्मक संसारातून तो सुटला जातो व वैराग्यरूपी मोक्ष द्वारांत उभा राहतो॥ ९००॥

**जें सकळ भाग्याची सीमा। मोक्षलाभाची जें प्रमा। नाना कर्ममार्गश्रमा। शेवटु जेथ॥ ९०१॥**

**अर्थ**—जे (वैराग्य) सर्व भाग्याची सीमा आहे व जे मोक्ष प्राप्तीचे ज्ञान करून देणारे आहे व नाना प्रकारच्या कर्म मार्गाच्या परिश्रमांचा जेथे शेवट होतो॥ ९०१॥

**मोक्षफळें दिधली वोल। जें सुकृततरुचें फूल। तये वैराग्यीं ठेवी पाऊल। भंवरु जैसा॥ ९०२॥**

**अर्थ**—जे वैराग्य म्हणजे मोक्षफळाने दिलेले तारण होय किंवा जे सत्कर्मरूप वृक्षाचे फूलच होय. त्या वैराग्याच्या ठिकाणी (वैराग्य पुष्पाच्या ठिकाणी) साधक पुरुष भ्रमरा प्रमाणे (अलगद) पाऊल ठेवतो॥ ९०२॥

**पाहीं आत्मज्ञानसुदिनाचा। वाधावा सांगतयां अरुणाचा। उदयो त्या वैराग्याचा। ठावो पावे॥ ९०३॥**

**अर्थ**—अर्जुना, वैराग्य हे दिवस उजाडण्याची-आत्मज्ञानाची-वार्ता सांगणाऱ्या वाधाव्याप्रमाणे अरुणोदयाच्या स्थानी आहे हे लक्षात ठेव. त्या वैराग्याचा साधकाला लाभ होतो.॥ ९०३॥

**किंबहुना आत्मज्ञान। जेणें हाता ये निधान। तें वैराग्य दिव्यांजन। जीवें ले तो॥ ९०४॥**

**अर्थ**—किंबहुना, आत्मज्ञानरूप संपत्तीचा ठेवा, ज्याच्या योगाने आपल्या हातात येतो, ते वैराग्यरूपी दिव्यांजन तो आपल्या डोळ्यांत मनापासून घालतो॥ ९०४॥

**ऐसी मोक्षाची योग्यता। सिद्धी जाय तया पांडुसुता। अनुसरोनि विहिता। कर्मा यया॥ ९०५॥**

**अर्थ**—अर्जुना, शास्त्राने सांगितलेल्या (विहित) कर्माचे पालन केल्यामुळे त्याला अशारीतीने मोक्षाची योग्यता प्राप्त होणारी सिद्धी प्राप्त होते॥ ९०५॥

**हें विहित कर्म पांडवा। आपुला अनन्य वोलावा। आणि हेचि परम सेवा। मज सर्वात्मकाची॥ ९०६॥**

**अर्थ**—अर्जुना, हे विहित कर्मच जीवाला अत्यंत जिव्हाळ्याचे ठिकाण आहे आणि याचेच आचरण माझ्या सर्वस्वरूप परमात्म्याची खरी खरी सेवा आहे॥ ९०६॥

**पैं आघवाचि भोगेंसी। पतिव्रता क्रीडे प्रियेंसीं। कीं तयाची नामें जैसीं। तपें तिया केलीं॥ ९०७॥**
**कां बाळका एकी माये-। वांचोनि जिणें काय आहे। म्हणौनि सेविजे कीं तो होये। पाटाचा धर्म॥ ९०८॥**
**नाना पाणी म्हणौनि मासा। गंगा न सांडितां जैसा। सर्वतीर्थ सहवासा। वरपडा जाला॥ ९०९॥**
**तैसें आपलिया विहिता। उपायो असे न विसंबितां। ऐसा कीजे कीं जगन्नाथा। आभारु पडे॥ ९१०॥**

**अर्थ**—पतिव्रता स्त्री सर्व भोगांसह आपल्या पतीबरोबरच क्रीडा करते किंवा त्याच्या साठीच ती त्याच्या नामाचे तपच करीत असते॥ ९०७॥ किंवा एका आईशिवाय बाळाला दुसरे काय असते? म्हणून त्याने तिची सेवा करणेच योग्य होय कारण तोच त्याचा श्रेष्ठ धर्म आहे.॥ ९०८॥ किंवा पाणी समजून जरी माशाने गंगा सोडली नाही तरी त्याला सर्वतीर्थांचा सहवास सहजच घडतो॥ ९०९॥ त्याप्रमाणे आपल्या हिताचा (आपल्याला विहित असलेल्या कर्माच्या आचरणाचा) उपाय जो असेल तो क्षणमात्र न विसंबता अशा रीतीने करावा की त्या भगवंतालाही भार व्हावा॥ ९१०॥

**अगा जया जें विहित। तें ईश्वराचें मनोगत। म्हणौनि केलिया निभ्रांत। सांपडेचि तो॥ ९११॥**

**अर्थ**—अर्जुना, ज्याला जे विहित कर्म सांगितले आहे तेच ईश्वराचे मनोगत (भगवंताच्या मनातील इच्छा) आहे. म्हणूनच त्याचे आचरण कोणताही मनांत संशय न ठेवता केले असता. भगवत्प्राप्ती ही होतेच॥ ९११॥

**पैं जीवाचे कसीं उतरली। ते दासी कीं गोसांवीण जाली। तैसी सेवेची तया मविली। वही जेवीं॥ ९१२॥**

**अर्थ**—अरे, जी आपल्या अंत:करणाच्या कसोटीला उतरली ती मूळची दासी असली तरी जशी स्वामिनी होते. त्याच प्रमाणे सेवकाने केलेल्या सेवेचे मूल्यमापन स्वामीकडून दप्तरी जसे नोंद केले जाते॥ ९१२॥

**तैसें स्वामीचिया मनोभावा। न चुकिजे हेचि परमसेवा। येर तें गा पांडवा। वाणिज्य करणें॥ ९१३॥**

**अर्थ**—अर्जुना, अशा रीतीने, धन्याचे मनोगत न चुकता जी सेवा केली जाते तीच परमसेवा होय. इतर जी सेवा तो केवळ व्यापार उदीम समजावा॥ ९१३॥

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् । स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः॥ ४६॥**

**अर्थ**—ज्याच्या सत्तेने सर्व भूतांची उत्पत्ति होते, आणि ज्याने हे सर्व विश्व व्यापले आहे त्या ईश्वराला विहित कर्माने भजणाऱ्या मनुष्याला ज्ञाननिष्ठा योग्यता लक्षणा सिद्धी प्राप्त होते॥ ४६ ॥

**म्हणोनि विहित क्रिया केली। नव्हे तयाची खूण पाळिली। जयापासूनि कां आलीं। आकारा भूतें॥ ९१४॥**

**अर्थ**—म्हणून विहित कर्म केले म्हणजे केवळ आपले कर्म केले असे नव्हे तर ज्याच्या पासून प्राणिमात्र उत्पन्न झाले आहेत त्याची आज्ञा पाळली असे होते.॥ ९१४॥

**जो अविद्येचिया चिंधिया। गुंडूनि जीव बाहुलिया। खेळवीतसे तिगुणिया। अहंकाररज्जू॥ ९१५॥**

**अर्थ**—जो अविद्येच्या (अज्ञानाच्या) चिंध्या गुंडाळून त्रिगुणात्मक अहंकाररूप दोरीने जीवरूप बाहुल्यांना खेळवतो.॥ ९१५॥

**जेणें जग हें समस्त। आंत बाहेरी पूर्ण भरित। जालें आहे दीपजात। तेजें जैसें॥ ९१६॥**

**तया सर्वात्मका ईश्वरा। स्वकर्मकुसुमांची वीरा। पूजा केली होय अपारा। तोषालागीं॥ ९१७॥**

**अर्थ**—प्रकाशाने सर्व दिवे जसे प्राप्त असावेत त्याप्रमाणे ज्याने हे सर्व जग आंतून व बाहेरून पूर्ण भरून गेले आहे॥ ९१६॥ त्या सर्वात्मक ईश्वराला (हे वीरा अर्जुना) अत्यंत संतोष होण्यासाठी विहित कर्मरूप पुष्पांनी पूजा केली.॥ ९१७॥

**म्हणौनि तिये पूजे। रिझलेनि आत्मराजे। वैराग्यसिद्धि देईजे। पसाय तया॥ ९१८॥**

**अर्थ**—म्हणून त्या पूजेच्या योगाने संतुष्ट झालेला आत्मराज (परमात्मा) त्याला (तो) वैराग्य सिद्धिरूप प्रसाद देतो॥ ९१८॥

**जिये वैराग्यदशे। ईश्वराचेनि वेधवशें। हें सर्वही नावडे जैसें। वांत होय॥ ९१९॥**

**अर्थ**—ज्या वैराग्यदशेला ईश्वराचा छंद लागला असल्यामुळे वांतीप्रमाणे हे सर्व विषयसुख आवडेनासे होते॥ ९१९॥

**प्राणनाथाचिया आधी। विरहणीतें जिणेंही बाधी। तैसें सुखजात त्रिशुद्धी। दुःखचि लागे॥ ९२०॥**

**अर्थ**—प्राणप्रिय असलेल्या पतीच्या ध्यासाने, विरहिणीला आपले जीवंत रहाणेही दुःखद वाटते त्याप्रमाणे यच्चयावत् सुख म्हणून जे जे आहे ते ते त्याला निश्चयेकरून दुःखरूपच वाटते॥ ९२०॥

**सम्यक्ज्ञान नुदैजतां। वेधेंचि तन्मयता। उपजे ऐसी योग्यता। बोधाचि लाहे॥ ९२१॥**

**अर्थ**—यथार्थ ज्ञान उत्पन्न झाले नाही तरी त्याच्या ध्यासाने त्याला तन्मयता उत्पन्न होते व अशी अपरोक्ष ज्ञानाची योग्यता त्याला प्राप्त होते.॥ ९२१॥

**म्हणौनि मोक्षलाभालागीं। जो व्रतें वाहतसे आंगीं। तेणें स्वधर्मु आस्था चांगी। अनुष्ठावा॥ ९२२॥**

**अर्थ**—म्हणून मोक्षाच्या लाभाकरता जो स्वतः नाना व्रतांचे आचरण करतो त्याने मोठ्या आस्थेने स्वधर्माचे उत्तम अनुष्ठान करावे॥ ९२२॥

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् । स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्॥ ४७॥**

**अर्थ**—आचरण्यास सुलभ अशा परधर्मापेक्षा आचरण्यास कठीण असला तरी; स्वधर्म हा श्रेष्ठ आहे. जे आपले स्वाभाविक नियत कर्म आहे. ते केल्याने मनुष्य पापाने लिप्त होत नाही॥ ४७॥

**अगा आपुला हा स्वधर्मु। आचरणीं जरी विषमु। तरी पाहावा तो परिणामु। फळेल जेणें॥ ९२३॥**

**अर्थ**—बाबारे, आचरण्यात आपला हा स्वधर्म कठीण असला तरी ज्याच्यायोगाने इष्ट फळप्राप्ती होईल तिकडे दृष्टी द्यावी (घडणारा परिणाम बघावा)॥ ९२३॥

**जैं सुखालागीं आपणपयां। निंबचि आथी धनंजया। तैं कडुवटपणा तयाचिया। उबगिजेना॥ ९२४॥**

**अर्थ**—अर्जुना, कटुलिंबानेच आपल्याला जर आराम पडणार असेल तर त्याच्या कडवटपणाला कंटाळू नये॥ ९२४॥

**फळणया ऐलीकडे। केळीतें पाहतां आस मोडे। ऐसी त्यजिली तरी जोडे। तैसें कें गोमटें॥ ९२५॥**

**अर्थ**—फळे येण्याच्या आधीच केळीकडे पाहिले तर (फळ मिळण्याची) आशाच खुंटते. (केवळ पानेच पाने दिसतात म्हणून) पण म्हणून तिला जर टाकून दिले (तिच्याकडे दुर्लक्ष्य केले) तर तशी सुंदर फळे कशी मिळतील॥ ९२५॥

**तेवीं स्वधर्मु सांकडु। देखोनि केला जरी कडु। तरी मोक्षसुरवाडु। अंतरला कीं॥ ९२६॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे आपल्याला विहित केलेला धर्म आचरण्यास कठीण आहे असे वाटून जर त्याला आपण कडू मानले (त्याचा त्याग केला) तर मग मोक्षाचे सुख अंतरलेच!॥ ९२६॥

**आणि आपुली माये। कुब्ज जरी आहे। तरी जीये तें नोहे। स्नेह कुन्हें कीं॥ ९२७॥**

**अर्थ**—आणि आपली आई जरी कुबडी (कुरूप) असली तरी ज्या तिच्या प्रेमाने आपण जगतो ते प्रेम काही वाकडे रहात नाही॥ ९२७॥

**येरी जिया पराविया। रंभेहूनि बरविया। तिया काय कराविया। बाळकें तेणें॥ ९२८॥**

**अर्थ**—इतर दुसऱ्या स्त्रिया रंभेहूनही सुंदर असल्या तरी त्या मुलाला त्यांचे काय?॥ ९२८॥

**अगा पाणियाहूनि बहुवें। तुपीं गुण कीर आहे। परी मीना काय होये। असणें तेथें॥ ९२९॥**

**अर्थ**—अरे पाण्यापेक्षा तुपात जास्त गुण आहेत हे खरे; पण माशांना त्यांत (तुपात) असणे काय कामाचे? (मासा पाण्यांत जगेल, तुपात नाही)॥ ९२९॥

**पैं आघविया जगा जें विख। तें विख कीडिया पीयूख। आणि जगा गुळ तें देख। मरण तया॥ ९३०॥**

**अर्थ**—तसेच सर्व जगाला जे विष, ते विषात राहणाऱ्या किड्यांना मात्र अमृत आहे. आणि सर्व जगाला गोड वाटणारा गूळ तो त्या किड्यांना मात्र मृत्यु आहे॥ ९३०॥

**म्हणौनि जे विहित जया जेणें। फिटे संसाराचें धरणें। क्रिया कठोर तऱ्ही तेणें। तेचि करावी॥ ९३१॥**

**अर्थ**—म्हणून ज्याला जे विहित केले आहे व ज्याच्यामुळे संसार बंधन नाहीसे होते, ते कर्म कितीही कष्टदायक असले तरी त्याने त्याचे आचरण केलेच पाहिजे॥ ९३१॥

**येरा पराचारा बरविया। ऐसें होईल टेंकलेया। पायांचें चालणें डोइया। केलें जैसें॥ ९३२॥**

**अर्थ**—इतर दुसऱ्याचा आचार चांगला आहे म्हणून जर आपण त्याचा आश्रय केला तर पायांनी चालावयाचे काम डोक्याने केल्यासारखे होईल॥ ९३२॥

**यालागीं कर्म आपुलें। जें जातिस्वभावें असे आलें। ते करी तेणें जिंतिलें। कर्मबंधातें॥ ९३३॥**

**अर्थ**—या करता आपल्या जातिस्वभावानुसार जे कर्म आपल्या वाट्याला आले असेल त्याचे आचरण जो करील त्याने कर्म बंधाला जिंकले म्हणून समजावे॥ ९३३॥

**आणि स्वधर्मुचि पाळावा। परधर्मु तो गाळावा। हा नेमुही पांडवा। न कीजेचि मा॥ ९३४॥**

**अर्थ**—आणि अर्जुना! स्वधर्माचेच पालन करावे, परधर्माचा त्याग करावा हा नेमही जर केला नाही॥ ९३४॥

**तरी आत्मा दृष्ट नोहे। तंव कर्म करणें कां ठाये। आणि करणें तेथ आहे। आयास आधीं॥ ९३५॥**

**अर्थ**—तर आत्मज्ञान प्राप्त होणार नाही आणि ते आत्मज्ञान जोपर्यंत होत नाही तो पर्यन्त कर्म करणे थांबते काय? आणि कर्म करावयाचे म्हटले म्हणजे प्रथम कष्ट हे आलेच॥ ९३५॥

**सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत्। सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः॥ ४८॥**

**अर्थ**—अर्जुना, जातिस्वभावानुसार प्राप्त झालेले जे कर्म त्यांत दोष असला तरी ते सोडू नये कारण धुराने जसा अग्नी व्यापलेला असतो त्याप्रमाणे सर्व कर्माचे आरंभ दोषाने व्यापलेले असतात.॥ ४८॥

**म्हणौनि भलतिये कर्मीं। आयासु जऱ्ही उपक्रमीं। तरी काय स्वधर्मीं। दोष सांगें॥ ९३६॥**

**अर्थ**—ह्याच करता कोणत्याही कर्माच्या आरंभाला जर कष्ट हे पडतातच, तर मग स्वधर्म आचरण्यात दोष तो कोणता? सांग॥ ९३६॥

**अगा उजू वाटा चालावें। तर्‍ही पायचि शिणवावे। आडरानें धांवावें। तर्‍ही तेंचि॥ ९३७॥**

**अर्थ**—अरे, सरळ मार्गाने चालले तरी पाय हे दमणारच किंवा आडमार्गाने धावले तरी तेच (पाय दमणारच)॥ ९३७॥

**पैं शिळा कां सिदोरिया। दाटणें एक धनंजया। परी जें वाहतां विसांवया। मिळिजे तें घेपे॥ ९३८॥**

**अर्थ**—तसेच अर्जुना, घोंडा आणि शिदोरी दोहींचे वोझे सारखेच! परंतु जे नेताना विसाव्याच्या ठिकाणी उपयोगी पडेल ते घ्यावे॥ ९३८॥

**एर्‍हवीं कणा आणि भूसा। कांडितांही सोसु सरिसा। जेंचि रंधन श्वानमांसा। तेंचि हवी॥ ९३९॥**

**अर्थ**—बाकी धान्याचे कण व भूसा (अलग करण्या करता) कांडताना श्रम सारखेच पडतात. कुत्र्याचे मांस शिजवायला जितकी खटपट तितकीच खटपट होमद्रव्य शिजविण्यालाही करावी लागतेच॥ ९३९॥

**दधी जळाचिया घुसळणा। व्यापार सारिखेचि विचक्षणा। वाळुवे तिळा घाणा। गाळणें एक॥ ९४०॥**

**अर्थ**—हे बुद्धिमंता अर्जुना, दही किंवा पाणी यांच्या घुसळण्याचे श्रम सारखेच. किंवा वाळू व तीळ घाण्यांत गाळण्याचे श्रम सारखेच॥ ९४०॥

**पैं नित्य होम देयावया। कां सैरा आगी सुवावया। फुंकितां धूम धनंजया। साहणें तेंचि॥ ९४१॥**

**अर्थ**—तसेच अर्जुना, नित्यकर्म म्हणून होमाला आहुति देण्याकरितां किंवा एरव्ही इतर कामाकरता म्हणून अग्नी पेटवण्याकरता फुंकतेवेळी धुराचा त्रास हा सहन करावाच लागतो॥ ९४१॥

**परी धर्मपत्नी धांगडी। पोसितां जरी एकी वोढी। तरी कां अपरवडी। आणावी आंगा॥ ९४२॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे धर्मपत्नीला व वेश्येला पोसतांना जर सारखीच ओढाताण हीत असेल तर मग (वेश्येला पोसून) अपकीर्तीचा कलंक तरी आपल्या आंगास कां लावून घ्यावा॥ ९४२॥

**हां गा पाठीं लागला घायीं। मरण न चुकेचि पाहीं। तरी समोरला काई। आगळें न कीजे॥ ९४३॥**

**अर्थ**—अर्जुना असे पहा की, शत्रूच्या हातून पाठीला घाव लागल्यामुळे मरण जर चुकत नाही तर मग शत्रूला समोर जाऊन तेथे पराक्रम का गाजवू नये?॥ ९४३॥

**अकुळस्त्री दांड्याचे घाये। परघर रिगालीहि जरी साहे। तरी स्वपतीतें वायें। सांडिलें कीं॥ ९४४॥**

**अर्थ**—कुलस्त्रीला दुसर्‍याचे घर रिघूनही जर दांडक्याचा मार सहन करावाच लागतो तर मग आपल्या नवर्‍याला तिने व्यर्थच नाही कां टाकून दिले?॥ ९४४॥

**तैसें आवडतेंही करणें। न निपजे शिणल्याविणें। तरी विहित बा रे कोणें। बोलें भारी॥ ९४५॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे आपल्याला आवडते ते कर्म देखील शिणल्या शिवाय होऊ शकत नाही तर मग, बाबारे विहित कर्म कोणत्या तोंडाने कठीण आहे असे म्हणायचे॥ ९४५॥

**वरी थोडेंचि अमृत घेतां। सर्वस्व वेंचो कां पांडुसुता। जेणें जोडे जीविता। अक्षय्यत्व॥ ९४६॥**

**अर्थ**—आणखी अर्जुना, ज्याच्या योगाने जीवन अमर होणार त्या अमृताच्या अल्पप्राप्तीकरता देखील आपले सर्वस्व वेचावे लागले तरी हरकत नाहीं॥ ९४६॥

**येर काह्यां मोलें वेंचूनि। विष पियावें घेउनि। आत्महत्येसि निमोनि। जायिजे जेणें॥ ९४७॥**

**अर्थ**—ज्याच्या योगाने आत्महत्या (पातक) घडून मरण ओढवते असे विष मुद्दाम मोल देऊन कशाकरता प्यावयाचे?॥ ९४७॥

**तैसें जाचूनियां इंद्रियें। वेचूनि आयुष्याचेनि दियें। सांचले पापीं आन आहे। दुःखावांचूनि॥ ९४८॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे इंद्रियांना कष्ट देऊन व आयुष्याचे दिवस खर्च करून साठवलेल्या पापामुळे दुःखावाचून आणखी काय मिळणार?॥ ९४८॥

**म्हणोनि करावा स्वधर्मु। जो करितां हिरोनि घे श्रमु। उचित देईल परमु। पुरुषार्थराजु॥ ९४९॥**

**अर्थ**—म्हणून ज्याचे आचरण करताच श्रमाचा परिहार होतो, तो स्वधर्मच आचरावा. उचित अशा सर्वश्रेष्ठ मोक्षाची प्राप्ती तोच करून देईल ॥ ९४९ ॥

**याकारणें किरीटी। स्वधर्माचिये रहाटी। न विसंबिजे संकटीं। सिद्धमंत्र जैसा ॥ ९५० ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे संकटाचे वेळी सिद्धमंत्र सोडू नये त्याप्रमाणे या करताच अर्जुना, स्वधर्माचे आचरण सोडू नये ॥ ९५० ॥

**कां नाव जैसी उदधीं। महारोगीं दिव्यौषधी। न विसंबिजे तया बुद्धी। स्वकर्म येथ ॥ ९५१ ॥**

**अर्थ**—किंवा समुद्रांत जशी नाव सोडूं नये किंवा महारोग्याने जसा दिव्यौषधीचा त्याग करूं नये त्याप्रमाणे स्वकर्माचे आचरण करण्याचा निश्चय सोडू नये. ॥ ९५१ ॥

**मग ययाचि गा कपिध्वजा। स्वकर्माचिया महापूजा। तोषला ईश तमरजा। झाडा करूनि ॥ ९५२ ॥**

**शुद्धसत्त्वाचिया वाटा। आणी आपुली उत्कंठा। भव स्वर्ग काळकूटा। ऐसें दावी ॥ ९५३ ॥**

**अर्थ**—मग अर्जुना, या स्वकर्माचरणरूप महापूजेने संतुष्ट झालेला भगवान् तमोगुण व रजोगुण यांचा नाश करून ॥ ९५२ ॥ आपल्या उत्कंठेला शुद्ध सत्वगुणाच्या वाटेला आणतो आणि ऐहिक व पारलौकिक भोग काळकूट विषाप्रमाणे (त्याज्य) आहेत हे दाखवतो ॥ ९५३ ॥

**जिये वैराग्य येणें बोलें। मागां संसिद्धी रूप केलें। किंबहुना तें आपुलें। मेळवी खागें ॥ ९५४ ॥**

**अर्थ**—वैराग्य या शब्दाने मागे संसिद्धीचे निरूपण केले किंबहुना तेच आपले अंतिम स्थान तो मिळवतो ॥ ९५४ ॥

**मग जिंतिलिया हे भोये। पुरुष सर्वत्र जैसा होये। कां जालाही जें लाहे। तें आतां सांगों ॥ ९५५ ॥**

**अर्थ**—ही वैराग्याची भूमी प्राप्त झाली म्हणजे तो पुरुषच जसा सर्वत्र असतो व त्या स्थितीत त्याला काय लाभ होतो हे आता सांगतो ॥ ९५५ ॥

**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः। नैष्कर्म्यसिद्धिं परमां सन्न्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥**

**अर्थ**—ज्याची बुद्धी कोठेही आसक्त होत नाही ज्याने आपले अंतःकरण आपल्या स्वाधीन ठेवले आहे व जो देह भोगादिकांचे ठिकाणी तृष्णारहित आहे असा मनुष्य संन्यासाच्या योगाने श्रेष्ठ अशा निष्कर्मतारूप सिद्धीला प्राप्त होतो ॥ ४९ ॥

**तरी देहादिक हें संसारें। सर्वही मांडलेंसे जें गुंफिरें। तेथ नातुडे तो वागुरे। वारा जैसा ॥ ९५६ ॥**

**अर्थ**—ज्या प्रमाणे जाळ्यामध्ये वारा सापडत नाही, त्याप्रमाणे देहादिक संसाररूपी हा सर्व जो गुंताडा मांडला गेला त्यात तो सांपडत नाही ॥ ९५६ ॥

**पैं परिपाकाचिये वेळे। फळ देठें ना देठू फळें। न धरें तैसें स्नेह खुळें। सर्वत्र होय ॥ ९५७ ॥**

**अर्थ**—फळ पिकायला आले म्हणजे फळाला जसे देठ धरत नाहीं किंवा देठाला फळ धरत नाही त्याप्रमाणे ज्याचे सर्व ठिकाणचे प्रेम (संसारावरील) क्षीण होते. ॥ ९५७ ॥

**पुत्र वित्त कलत्र। हे जालियाही स्वतंत्र। माझें न म्हणे पात्र। विषाचें जैसें ॥ ९५८ ॥**

**अर्थ**—विषयुक्त अन्नाने भरलेले ताट ज्याप्रमाणे कोणींही माझे असे म्हणत नाही, त्याप्रमाणे मुल, पैसा व बायको ही आपल्या स्वाधीन असूनही तो त्यांना माझें म्हणत नाही ॥ ९५८ ॥

**हें असो विषयजातीं। बुद्धी पोळली ऐसी माघौती। पाउलें घेऊनि एकांतीं। हृदयाच्या रिगे ॥ ९५९ ॥**

**अर्थ**—फार काय सांगावे बुद्धी संपूर्ण विषयापासून (पोळल्याप्रमाणे) मागल्या पावलीच परत फिरते व हृदयाच्या एकांतात शिरते. (आत्मस्वरूपाकडे लागते). ॥ ९५९ ॥

**ऐसया अंतःकरण। बाह्य येतां तयाची आण। न मोडी समर्था भेण। दासी जैसी ॥ ९६० ॥**

**अर्थ**—स्वामीच्या भीतीने दासी ज्याप्रमाणे बाहेर न येण्याची शपथ मोडीत नाही, त्याप्रमाणे असे आत्मस्वरूपाकडे लागलेले अंतःकरण बाहेर विषयाकडे धांव घेत नाही ॥ ९६० ॥

**तैसें ऐक्याचिये मुठी-। माजिवडें चित्त किरीटी। करूनि वेधीं नेहटी। आत्मयाच्या॥ ९६१॥**

**अर्थ**—अशा प्रकारे अर्जुना साधक अंत:करणाला आत्मैक्याच्या मुठीमध्ये ठेवून व त्या अंत:करणाला आत्म्याचा ध्यास लावतो॥ ९६१॥

**तेव्हा दृष्टादृष्ट स्पृहे। निमणें जालेंचि आहे। आगी दडपलिया धुयें। राहिजे जैसें॥ ९६२॥**

**अर्थ**—त्यावेळी अग्नी धुळेने दडपला म्हणजे जसा आपोआप नाहीसा होतो त्याप्रमाणे इहलोकाची व परलोकाची भोगेच्छा सहजच नष्ट होते॥ ९६२॥

**म्हणौनि नियमिलिया मानसीं। स्पृहा नासोनि जाय आपैसी। किंबहुना तो ऐसी। भूमिका पावे॥ ९६३॥**

**अर्थ**—म्हणून मनाचे नियंत्रण (निग्रह) केले की इच्छा आपोआपच नाहीशी होऊन जाते. किंबहुना त्याला (साधकाला) अशी (निष्काम) अवस्था प्राप्त होते॥ ९६३॥

**पैं अन्यथा बोधु आघवा। मावळोनि तया पांडवा। बोधमात्रींचि जीवा। ठावो होय॥ ९६४॥**

**अर्थ**—अर्जुना, संपूर्ण विपरीत ज्ञान (अज्ञान) त्याचे नाहीसे होऊन केवळ ज्ञानाच्या ठिकाणी त्याच्या अंत:करणाचा निश्चय स्थिर होतो.॥ ९६४॥

**धरवणी वेंचें सरे। तैसें भोगें प्राचीन पुरे। नवें तंव नुपकरे। कांहींचि करूं॥ ९६५॥**

**अर्थ**—जसे धरून ठेवलेले (साठवलेले) पाणी खर्च केले म्हणजे संपते, तसे प्रारब्धकर्म हे भोगल्याने नाहीसे होते. आणि नवीन कर्म (क्रियमाण) तर पापपुण्य निर्माण करण्यास (अहंकार नसल्यामुळे) कामी येत नाही॥ ९६५॥

**ऐशी कर्मे साम्यदशा। होय तेथ वीरेशा। मग श्रीगुरु आपैसा। भेटेचि गा॥ ९६६॥**

**अर्थ**—अशा कर्मांच्या योगाने हे वीर श्रेष्ठा अर्जुना! जेव्हा साम्यावस्था प्राप्त होते, तेव्हा आपोआपच श्रीगुरुची भेट होते॥ ९६६॥

**रात्रीची चौपाहरी। वेंचलिया अवधारीं। डोळ्या तमारी। मिळे जैसा॥ ९६७॥**

**अर्थ**—हे पहा रात्रीचे चार प्रहर संपले म्हणजे ज्याप्रमाणे डोळ्याला अंधकाराचा नाश करणाऱ्या सूर्याचे दर्शन होते॥ ९६७॥

**का येऊनि फळाचा घडु। पारुषवी केळीची वाढु। गुरु भेटोनि करी पाडु। मुमुक्षू तैसा॥ ९६८॥**

**अर्थ**—किंवा फळांचा घड आला म्हणजे तो केळीची वाढ जशी खुंटवितो त्याप्रमाणे श्रीगुरुची भेट होताच तसा प्रकार मुमुक्षूचा होतो (त्याचे कर्मकर्तृत्व सर्व बंद पडते)॥ ९६८॥

**मग आलिंगिला पूर्णिमा। जैसा उणीव सांडी चंद्रमा। तैसें होय वीरोत्तमा। गुरुकृपा तया॥ ९६९॥**

**अर्थ**—पौर्णिमेने आलिंगन दिलेला चंद्रमा ज्याप्रमाणे आपला सर्व कमीपणा टाकून देतो (आपल्या संपूर्ण प्रकाशाने प्रकाशतो) त्याप्रमाणे हे शूरश्रेष्ठा अर्जुना, गुरुकृपेने साधकाची तशी स्थिती होते (परिपूर्णदशा बाणते)॥ ९६९॥

**तेव्हां अबोधुमात्र असे। तो तंव तया कृपा नासे। तेथ निशीसवें जैसें। आंधारें जाय॥ ९७०॥**

**अर्थ**—रात्री बरोबर ज्याप्रमाणे अंधार नाहीसा होतो, त्याप्रमाणे अज्ञान म्हणून जेवढे असते तेवढे सारे त्यांच्या (श्रीगुरुंच्या) कृपेने नाहीसे होते॥ ९७०॥

**तैसी अबोधाचिये कुशी। कर्म कर्ता कार्य ऐशी। त्रिपुटी असे ते जैसी। गाभिणी मारिली॥ ९७१॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे अज्ञानाच्या पोटात कर्म, कर्ता व कार्य ही जी त्रिपुटी असते; ती, गर्भिणीला मारल्याप्रमाणे समूळ नष्ट होते. (गर्भिणीला मारल्यानंतर जसा तिच्या पोटांतील गर्भ नाहीसा व्हावा त्याप्रमाणे)॥ ९७१॥

**तैसेंचि अबोधनाशासवें। नाशे क्रियाजात आघवें। ऐसा समूळ संभवे। संन्यासु हा॥ ९७२॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे अज्ञानाच्या नाशाबरोबरच संपूर्ण कर्म म्हणून जितके आहे तितके सर्व नाश पावते. अशा प्रकारे हा समूळ संन्यास घडतो. (खराखुरा किंवा संपूर्ण कर्म त्याग)॥ ९७२॥

**येणें मूळज्ञान संन्यासें। दृश्याचा जेथ ठावो पुसे। तेथ बुझावें तें आपैसें। तोचि आहे॥ ९७३॥**

**अर्थ**—त्यामुळे मूळ अज्ञानाच्या नाहीसे होण्याने सर्व दृश्य पसारा नष्ट झाला मग जाणावयाचे जे ते, तो आपण स्वत: होतो॥ ९७३॥

**चेइलियावरी पाहीं। स्वप्नींचिया तिये डोहीं। आपणयातें काई। काढूं जाइजे॥ ९७४॥**

**अर्थ**—(अर्जुना) असे पाहा की, स्वप्नातून जागे झाल्यानंतर स्वप्नांतील डोहातून आपल्याला काय काढावे लागते ?॥ ९७४॥

**तैं मी नेणें आतां जाणेन। हें सरलें तया दु:स्वप्न। जाला ज्ञातृज्ञेयाविहीन। चिदाकाश॥ ९७५॥**

**अर्थ**—तेव्हा पूर्वी मला कळत नव्हते आता मी जाणतो हे त्याचे दु:स्वप्न नष्ट होते व ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय यांच्या (त्रिपुटी) कल्पनेविरहित तो केवळ चैतन्यस्वरूप होतो॥ ९७५॥

**मुखाभासेंसीं आरिसा। परौता नेलिया वीरेशा। पाहातेपणेंवीण जैसा। पाहाता ठाके॥ ९७६॥**

**अर्थ**—हे वीरश्रेष्ठा अर्जुना मुखाच्या प्रतिबिंबासहित आरसा दूर नेल्यावर ज्याप्रमाणे पहाणारा हा पहातेपणाशिवाय राहतो॥ ९७६॥

**तैसें नेणणें जें गेलें। तेणें जाणणेंही नेलें। मग निष्क्रिय उरलें। चिन्मात्रचि॥ ९७७॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे अज्ञान जेव्हा नाहीसे होते, तेव्हां ते ज्ञानासही (सापेक्षज्ञान) घेऊन जाते. मग केवळ निष्क्रिय ज्ञान मात्र शिल्लक राहते॥ ९७७॥

**तेथ स्वभावें धनंजया। नाहीं कोणीचि क्रिया। म्हणौनि प्रवादु तया। नैष्कर्म्य ऐसा॥ ९७८॥**

**अर्थ**—अर्जुना, या चैतन्याच्या ठिकाणी स्वभावत:च कोणतीही क्रिया राहत नसल्यामुळे त्याला नैष्कर्म्य असे म्हणतात॥ ९७८॥

**तें आपुलें आपणपें। असतचि होऊनि हारपे। तरंगु कां वायुलोपें। समुद्रु जैसा॥ ९७९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे वाऱ्यामुळे उत्पन्न होणाऱ्या लाटा वारा बंद झाला म्हणजे जशा समुद्ररूप होऊन जातात त्याप्रमाणे आपल्याला आपले जे यथार्थज्ञान होते (ते वृत्तिरूप व सापेक्ष असल्यामुळे) (अहंब्रह्मास्मिरूप ज्ञान) तेही खोटे ठरून आपल्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणी ते विलीन होते. (एकरूप होते)॥ ९७९॥

**तैसें न होणें निपजे। ते नैष्कर्म्यसिद्धि जाणिजे। सर्वसिद्धींत सहजें। परम हेचि॥ ९८०॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे मी ब्रह्मस्वरूप आहे हीही वृत्ति न उठणे ही जी स्थिती प्राप्त होते तीच 'नैष्कर्म्य सिद्धी' आहे हे समज. साहजिकच सर्व सिद्धीमध्ये ही सर्वश्रेष्ठ आहे॥ ९८०॥

**देउळाचिया कामा कळसु। परम गंगेसी सिंधुप्रवेशु। कां सुवर्णशुद्धी कसु। सोळावा जैसा॥ ९८१॥**
**तैसें आपुलें नेणणें। फेडीजे का जाणणें। तेंही गिळूनि असणें। ऐसी जे दशा॥ ९८२॥**
**तियेपरतें कांहीं। निपजणें येथ नाहीं। म्हणौनि म्हणिपे पाहीं। परमसिद्धि ते॥ ९८३॥**

**अर्थ**—कळस बसल्यावर ज्याप्रमाणे देवळाच्या कामाची समाप्ती होते, किंवा गंगेने समुद्रात प्रवेश केला म्हणजे पुढे तिचा प्रवाह बंद होतो, किंवा सोळा आणे कस लागला म्हणजे सोन्याच्या शुद्धीची क्रिया थांबते॥ ९८१॥ त्याप्रमाणे आपले अज्ञान ज्या ज्ञानाने (अहंब्रह्मास्मिरूप वृत्तिज्ञानाने) नाहीसे केले तेही ज्ञान (वृत्तिरूप व सापेक्ष असल्यामुळे) नाहीसे होऊन जी स्थिती येते॥ ९८२॥ त्या स्थितीपेक्षा किंवा दशेपेक्षा आता पलीकडे काहीही प्राप्त व्हावयाचे रहात नाही. म्हणूनच तिला 'परमसिद्धी' असे म्हणतात॥ ९८३॥

**गूढार्थदीपिका—ओवी क्रमांक ९८२.**

अज्ञान नाहीसे झाल्यावर तत्सापेक्ष ज्ञानही नाहीसे व्हावयाला पाहिजे. अज्ञानाबरोबरच तत्सापेक्ष ज्ञान नाहीसे झाले म्हणजे मग क्रियारहित असे केवळ ज्ञानमात्रच राहते.

झोपेतील 'मी निजलो' याचे विस्मरण व 'मी आता जागा झालो' याचे स्मरण हे दोन्हीही नाहीसे झाल्यावर जसे आपण राहतो तशी आत्मवस्तु आहे. जमीनीवर मडके ठेवले असता ती जमीन मडक्यासह आहे असे आपण

म्हणतो, मडके जमीनीवरून काढून घेतले असता जमीन आता मडक्या विरहित झाली असे आपण म्हणतो. पण वस्तुत: मडक्याच्या असण्या व नसण्याचा जमीनीशी कांही संबंध नसतो, त्याप्रमाणे आपण अत्यंत शुद्ध म्हणजे 'आहे-नाही' या भाव विरहित असायला पाहिजे. ''निदेचे नाहींपण। निमालियाहि जागेपण। असिजे कां तेण। कोण होऊनि जैसे॥ ४१ ॥ कां भूमि कुंभ ठेविजे। तै सकुंभता आपजे। तो नेलिया म्हणीजे। तेणेविण॥ ४२ ॥ तरी दोन्ही हे भाव। न शिवती भूमीचे अंग। तेवेळी भूमि तैसे चांग। चोख जे असणे॥ ४३ ॥ अमृतानुभव प्रक० ४

ज्ञानमात्र स्वरूपाच्या ठिकाणी जाणीव देखील उठणे योग्य नाही. कारण ज्ञानमात्र स्वरूप म्हणजेच आपल्या किंवा दुसऱ्या कोणाच्या ज्ञानाचा विषय न होणारे स्वरूप होय. तेव्हा स्वाभाविक शुद्ध आत्मस्वरूपस्थिती म्हणजे आपल्या किंवा दुसऱ्या कशाच्याही अस्तित्वाची किंवा नाहीपणाची, दोहोचीही जाणीव न होणे होय. आत्मस्वरूप केवळ ज्ञानस्वरूप मात्र आहे म्हणून आत्मस्वरूप होण्या करता जीवाला जाणीव नेणीव विरहित जाणीवस्वरूप होऊन राहिले पाहिजे. आचार्यांनीही हेच सांगितले आहे. ''अस्तीति प्रत्ययोयश्च यश्च नास्तीति वस्तुनि। बुद्धेरेव गुणावेतौ नतु नित्यस्य वस्तुन:'' विवेक चूडामणि श्लोक ५७३

**परी हेंचि आत्मसिद्धि। जो कोणी भाग्यनिधि। श्रीगुरुकृपालब्धि-। काळीं पावे॥ ९८४॥**

**अर्थ**—परंतु हीच आत्मप्राप्ती श्रीगुरुकृपा प्राप्त होण्याची वेळ आली म्हणजे, जो कोणी भाग्यशाली पुरुष असेल, त्यालाच प्राप्त होते. ॥ ९८४ ॥

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे। समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा॥ ५०॥**

**अर्थ**—अर्जुना, ही ज्ञाननिष्ठायोग्यतारूप सिद्धी ज्याला प्राप्त झाली आहे, त्याला ब्रह्माची प्राप्ती कशी होते ते मी थोडक्यात सांगतो, समजून घे. ही जी ब्रह्मप्राप्ती तोच ज्ञानाची परमसीमा होय॥ ५० ॥

**उदयजतांचि दिनकरु। प्रकाशुचि आते आंधारु। कां दीपसंगें कापुरु। दीपुचि होय॥ ९८५॥**
**तया लवणाची कणिका। मिळतखेंवो उदका। उदकचि होऊनि देखा। ठाके जेवीं॥ ९८६॥**
**कां निद्रित चेवविलिया। स्वप्नेंसि निद वायां। जाऊनि आपणपया। मिळे जैसा॥ ९८७॥**
**तैसें जया कोण्हासि दैवें। गुरुवाक्य श्रवणाचिसवें। द्वैत गिळोनि विसंवे। आपणया वृत्ती॥ ९८८॥**

**अर्थ**—सूर्य उगवताच जसा अंधारच प्रकाश होऊन जातो किंवा कापराला दिव्याचा स्पर्श होताच तो दिवाच होऊन जातो॥ ९८५ ॥ किंवा मिठाचा एक कण पाण्यांत मिसळताच तो ज्याप्रमाणे पाणीच होऊन जातो॥ ९८६ ॥ किंवा झोपलेल्याला जागे केल्यावर स्वप्नासह त्याची झोप नाहीशी होऊन तो पुन्हा आपल्या मूळ स्वरूपात येतो॥ ९८७॥ तशी दैवयोगाने सद्‌गुरुचा उपदेश ऐकल्याबरोबर ज्या कोणीचा वृत्ती भेदाचा नाश करून आत्मस्वरूपाच्या ठिकाणी स्थिरावते॥ ९८८ ॥

**तयासी मग करणें। हें बोलिजैल्चि कवणें। आकाशा येणें जाणें। आहे काई॥ ९८९॥**

**अर्थ**—त्या ज्ञान्याला मग कर्म करण्याचे उरते असे कोण म्हणेल? आकाशाला येणे जाणे आहे काय?॥ ९८९ ॥

**म्हणौनि तयासि कांहीं। त्रिशुद्धि करणें नाहीं। परी ऐसें जरी हें कांहीं। नव्हे जया॥ ९९०॥**

**अर्थ**—म्हणून त्याला निश्चये करून काहीही करावयाचे रहात नाही. पण असेही काही ज्याला घडणार नाही॥ ९९० ॥

**कानावचनाचिये भेटी-। सरिसाचि पैं किरीटी। वस्तु होऊनि उठी। कवणि एक जो॥ ९९१॥**

**अर्थ**—अर्जुना आपल्या कानाची व श्रीगुरुच्या वचनाची गाठ पडताक्षणीच जो कोणी एखादाच ब्रह्मस्वरूप होतो॥ ९९१ ॥

**गूढार्थदीपिका—ओवी क्रमांक ९९१. कानावचनाचिये भेटी—**

सद्‌गुरुच्या उपदेशाशिवाय ब्रह्मज्ञानाची प्राप्ती होते ही गोष्ट अद्वैत वेदान्ताला मान्य नाही. त्यामुळेच भारतात

असलेल्या बहुतेक सर्व संप्रदायात गुरूपदेशाचे महत्व मान्य करण्यात आले आहे. काही संप्रदायात तर दीक्षाविधी व शक्तिपात याचेही महत्व वर्णन करण्यात आले आहे. विचारांनी जसा मनाचा पालट होतो तसाच सद्‌गुरुंच्या वाणीच्या सामर्थ्याने मनाचा पालट होतो. अधिकारी असलेल्या शिष्याच्या ठिकाणी आपल्या शक्तीचा पात करून समाधि सुखाची थोडीशी चुणूकही अधिकारी सद्‌गुरु क्वचित दाखवून देतात. मुकुंदराजांच्या चरित्रात अशा तऱ्हेचा उल्लेख आलेला आहे.

शास्त्रांनी सांगितलेला मोक्षाचा मार्ग सर्वांना अध्ययनाने माहीत झाला तरी त्याचे आचरण करणे सुलभ नाही. प्रत्येकाच्या मनाची ठेवण निरनिराळी असते व विचार आणि विकार यांची गुन्तागुन्त प्रत्येकाच्या मनाची अलग अलग असते. ही गुन्तागुन्त सोडवण्यास श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ सद्‌गुरुशिवाय दुसऱ्या कोणाचीही मदत होऊं शकत नाही. साधन चतुष्टय संपन्न असलेला शिष्यदेखील या मनाच्या गुन्तागुन्तीत सांपडलेला असतो व केवळ आपल्या स्वत:च्या विचारांच्या सामर्थ्यावर तो मोक्षाचा मार्ग निष्कंटक आक्रमू शकत नाही. त्याच्या मनाची घडण लक्षात घेऊन सद्‌गुरु निरनिराळ्या प्रकृत्या ह्याच्या प्रेमाकरता रचून व त्याच्या संशयाची निवृत्तीकरून त्याला आत्मबोध करतात. अर्थातच मनाच्या या विविध घडणीमुळे सत्‌शिष्यांचेही अनेक भेद होत असतात. मात्र या सर्व सत्‌शिष्यांना अपवादभूत व म्हणूनच ललामभूत असलेला असा एखादाच शिष्य निघतो की जो सद्‌गुरुंचा बोध कानी पडताच एकदम आत्मस्वरूप होतो. अशा शिष्याची मनोभूमी वैराग्यादी साधन चतुष्टयामुळे इतकी परिपक्व झालेली असते की सद्‌गुरूंनी आत्मबोधाचे बीज त्यात टाकून आपल्या अमृतवाणीचा वर्षाव करताच तो अर्थानुरूप होतो व त्याला आत्मस्वरूपाचे कोंभ फुटतात, अर्थातच ही अलौकिक शिष्याची स्थिती आहे यात काही संशय नाही.

**एऱ्हवीं स्वकर्माचेनि वन्ही। काम्यनिषिद्धाचिया इंधनीं। रजतमें कीर दोन्ही। जाळिलीं आधीं॥ ९९२ ॥**

**अर्थ**—सामान्यत: त्याने स्वविहित कर्माच्या अग्नीमध्ये काम्य व निषिद्धाच्या इंधनाने रज आणि तम ही दोन्हीही आधीच जाळून टाकलेली असतात॥ ९९२ ॥

**पुत्र वित्त परलोक। यया तिहींचा अभिलाख। घरीं होय पाइक। हेंही जालें॥ ९९३ ॥**

**अर्थ**—मुलगा, द्रव्य व परलोक या तिन्ही विषयींची अभिलाषा ज्याच्या घरी दासी होऊन राहिली हीहि गोष्ट घडून आली॥ ९९३ ॥

**इंद्रियें सैरा पदार्थीं। रिगतां विटाळलीं होतीं। तियें प्रत्याहार तीर्थीं। न्हाणिलीं कीर॥ ९९४॥**

**अर्थ**—इंद्रियांनी स्वैरपणे (धर्म्याधर्म्यांचा विचार न करता) विषयांच्या ठिकाणी प्रवेश केल्यामुळे ती इंद्रिये विटाळली होती त्यांना (शुद्ध करण्याकरिता) प्रत्याहाररूपी तीर्थात स्नान घातले॥ ९९४॥

**आणि स्वधर्माचें फळ। ईश्वरीं अर्पूनि सकळ। घेऊनि केलें अढळ। वैराग्यपद॥ ९९५ ॥**

**अर्थ**—आणि स्वधर्म आचरण्याचे संपूर्ण फळ ईश्वराच्या ठिकाणी समर्पण करून त्याच्यायोगाने वैराग्याचे पद अढळ करून टाकले॥ ९९५ ॥

**ऐसी आत्मसाक्षात्कारीं। लाभे ज्ञानाची उजरी। ते सामुग्री कीर पुरी। मेळविली॥ ९९६ ॥**

**अर्थ**—आत्मसाक्षात्कारामध्ये ज्ञानाचा उत्कर्ष साधण्याकरता अशी जितकी म्हणून सामग्री असेल तितकी त्याने जुळविली॥ ९९६ ॥

**आणि तेचि समयीं। सद्‌गुरु भेटले पाहीं। तेवींचि तिहीं कांहीं। वंचिजेना॥ ९९७ ॥**
**परी वोखद घेतखेंवो। काय लाभे आपुला ठावो। का उदयजतांचि दिवो। मध्यान्ह होय॥ ९९८ ॥**
**सुक्षेत्रीं आणि वोल्टे। बीजही पेरिलें गोमटें। तरी आलोट फळ भेटे। परी वेळे कीं गा॥ ९९९ ॥**
**जोडला मार्ग प्रांजळ। मिनला सुसंगाचाही मेळ। तरी पाविजे वांचूनि वेळ। लागेचि कीं॥ १०००॥**

**अर्थ**—आणि त्याचवेळीं सद्‌गुरुंची भेटही झाली, आणि त्यांनी उपेक्षांही केली नाही (यथार्थ ज्ञानाचा बोध केला). ॥ ९९७ ॥ परंतु औषध घेताक्षणीच (रोगमुक्त होऊन) आपले मूळ स्वास्थ्य प्राप्त होते काय? किंवा सूर्य

उगवताच दुपार होते काय?॥ ९९८॥ चांगल्या आणि ओलावा असलेल्या शेतात उत्तम बी पेरले तर अमाप पीक देईल हे निश्चित. पण बाबारे थोडा वेळ लागेलच!॥ ९९९॥ सरळ रस्ता सांपडला चांगल्या लोकांची सोबतही मिळाली तर मुक्कामी पोहोचणारच. शिवाय थोडावेळ लागायचा तो लागणारच॥ १०००॥

**तैसा वैराग्यलाभ जाला। वरी सद्‌गुरुही भेटला। जीवीं अंकुरु फुटला। विवेकाचा॥ १००१॥**
**तेणें ब्रह्म एक आथी। येर आघवीचि भ्रांती। हेंही कीर प्रतीती। गाढी केली॥ १००२॥**
**परी तेंचि जें परब्रह्म। सर्वात्मक सर्वोत्तम। मोक्षाचेंही काम। सरे जेथ॥ १००३॥**
**यया तिन्ही अवस्था पोटीं। जिरवी जें गा किरीटी। तया ज्ञानासिही मिठी। दे जे वस्तु॥ १००४॥**
**ऐक्याचें एकपण सरे। जेथ आनंदकणुही विरे। कांहीचि नुरोनि उरे। जें कांहीं गा॥ १००५॥**
**तिये ब्रह्मीं ऐक्यपणें। ब्रह्मचि होऊनि असणें। तें क्रमेंचि करूनि तेणें। पाविजे पैं॥ १००६॥**

**अर्थ**—याप्रमाणे वैराग्याची प्राप्ती झाली त्यात सद्‌गुरुही भेटलेत व आत्मानात्म विवेकाचा अंत:करणात अंकुरही फुटला॥ १००१॥ त्यामुळे (आत्मानात्म विवेकामुळे) ब्रह्मच एक काय ते सत्य आहे बाकीचे सर्व भ्रांतिरूप आहे हाही दृढ अनुभव येऊन चुकला॥ १००२॥ परंतु तेच परब्रह्म जे सर्व व्यापक व सर्वोत्तम आहे; मोक्षाचेही प्रयोजन ज्या ठिकाणी (ब्रह्मानुभवात) समाप्त होते॥ १००३॥ जे ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान या त्रिपुटीला किंवा जागृति, स्वप्न व सुषुप्ती या अवस्थांना गिळून टाकते इतकेच नाही तर अर्जुना जी ब्रह्मवस्तु ज्ञानाचीही (ऐक्यरूप) जाणीव नाहीशी करते॥ १००४॥ ज्या ठिकाणी ब्रह्माच्या ऐक्याची जाणीवही नाहीशी होते, व आनंदाच्या जाणीवेचाही कण विरून जातो व काहीही शिल्लक न राहता (जाणीव नेणीव दोन्हीही) जे अवशिष्ट राहते (चिन्मात्र स्वरूप)॥ १००५॥ त्या ब्रह्माच्या ठिकाणी एकरूपतेने ब्रह्मच होऊन राहणे ही स्थिती त्याला (साधकाला) क्रमाक्रमानेच प्राप्त होते॥ १००६॥

**भुकेलियापासीं। वोगरिलें षड्रसीं। तो तृप्ति प्रतिग्रासीं। लाहे जेवीं॥ १००७॥**
**तैसा वैराग्याचा वोलावा। विचाराचा तो दिवा। आंबुथितां आत्मठेवा। काढीची तो॥ १००८॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे भुकेल्याला षड्‌स अन्नाचे भोजन वाढले असता त्याला जशी प्रत्येक घासाबरोबर तृप्ती होत जाते॥ १००७॥ त्याप्रमाणे वैराग्याचे तेल मिळून विवेकाचा दिवा प्रज्वलित झाला असता तो आत्मज्ञानाचा ठेवा काढतोच. (आत्मप्राप्ती त्याला होते)॥ १००८॥

**तरी भोगिजे आत्मऋद्धी। येवढी योग्यतेची सिद्धी। जयाच्या आंगीं निरवधी। लेणें जाली॥ १००९॥**
**तो जेणें क्रमें ब्रह्म। होणें करी गा सुगम। तया क्रमाचें आतां वर्म। आईक सांगों॥ १०१०॥**

**अर्थ**—तर आत्मस्वरूपाचे ऐश्वर्य भोगावे एवढ्या योग्यतेची सिद्धी ज्याच्या (साधकाच्या) अंगावर कायमचा अलंकार होऊन राहिली आहे॥ १००९॥ तो (साधक) ज्या क्रमाक्रमाने ब्रह्मप्राप्ती सुलभ करून घेतो त्या क्रमाचे वर्म आता सांगतो ते ऐक॥ १०१०॥

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च। शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च॥ ५१॥**

**अर्थ**—अत्यंत शुद्ध बुद्धीने युक्त होऊन धैर्याने आपल्या मनाचा निग्रह करून व शब्दादी विषयांचा त्याग करून प्रीति व द्वेष नाहीसे करून टाकतो॥ ५१॥

**तरी गुरु दाविलिया वाटा। येऊनि विवेकतीर्थतटा। धुऊनियां मळकटा। बुद्धीचा तेणें॥ १०११॥**
**मग राहूनें उगळिली। प्रभा चंद्रें आलिंगिली। तैसी शुद्धते जडली। आपणयां बुद्धि॥ १०१२॥**

**अर्थ**—सद्‌गुरुंनी दाखविलेल्या मार्गाने जाऊन विवेकरूपी तीर्थाच्या काठी बुद्धीचा मळ धुवून टाकतो॥ १०११॥ मग ज्याप्रमाणे राहूच्या ग्रासातून मुक्त झालेली चंद्राची प्रभा चंद्राकडून आलिंगिली जाते, त्याप्रमाणे बुद्धी शुद्ध होऊन (मूळच्या) आत्मस्वरूपाशी एकरूप होते॥ १०१२॥

**सांडूनि कुळें दोन्ही। प्रियासी अनुसरे कामिनी। द्वंद्वत्यागें स्वचिंतनीं। पडली तैसी॥ १०१३॥**

**अर्थ**—सासर व माहेर ही दोन्ही कुळे टाकून देऊन (त्यांचा अभिमान व स्नेह) पतिव्रता स्त्री जशी आपल्या पतीलाच अनुसरते, त्याप्रमाणे द्वंद्वाचा (सुखदुःखादींचा) त्याग करून बुद्धी केवळ आत्मचिंतनातच मग्न होऊन राहते॥ १०१३॥

**आणि ज्ञाना ऐसें जिव्हार। नेवों नेवों निरंतर। इंद्रियीं केले थोर। शब्दादिक जे॥ १०१४॥**
**ते रश्मिजाळ काढलेया। मृगजळ जाय लया। तैसें धृतिरोधें तयां। पांचांही केलें॥ १०१५॥**

**अर्थ**—आणि आत्मज्ञानासारख्या जिव्हाळ्याच्या वस्तूला दूरदूर ठेऊन इंद्रियांनी ज्या शब्दादिक विषयांचे स्तोम माजविले॥ १०१४॥ ते (इंद्रियांचे) पाच विषय, सूर्याच्या किरणांचा समुदाय (काढून घेतल्यावर) निघून गेल्याबरोबर ज्याप्रमाणे मृगजळ नाहीसे होते, त्याप्रमाणे इंद्रियाद्वारे धावणाऱ्या वृत्तींचा रोध करताच त्या नाहीशा होतात॥ १०१५॥

**नेणतां अधमाचिया अन्ना। खादलिया कीजे वमना। तैसीं वोकविलीं सवासना। इंद्रियें विषयीं॥ १०१६॥**

**अर्थ**—अजाणता नीचाचे अन्न खाल्ले असता ते ओकून टाकावे लागते, त्याप्रमाणे इंद्रियांकडून वासनेसह त्याने विषय ओकविले (त्याग केला)॥ १०१६॥

**मग प्रत्यगावृत्ती चोखटें। लाविलीं गंगेचेनि तटें। ऐसीं प्रायश्चित्तें धुवटें। केली येणें॥ १०१७॥**

**अर्थ**—मग ही इंद्रियें अंतर्मुखवृत्तीरूपी पवित्र गंगेच्या तीरावर आणून व प्रायश्चित्त देऊन त्याना शुद्ध केले॥ १०१७॥

**पाठीं सात्त्विकें धीरें तेणें। शोधारलीं तियें करणें। मग मनेंसीं योगधारणें। मेळविलीं॥ १०१८॥**

**अर्थ**—नंतर ती शुद्ध केलेली इंद्रिये सात्विक धैर्याच्या बळावर मनासह योग धारणेला लावली॥ १०१८॥

**तेवींचि प्राचीनें इष्टानिष्टें। भोगेंसीं येउनी भेटे। तेथ देखिलियाही वोखटें। द्वेषु न करी॥ १०१९॥**

**अर्थ**—तसेच प्रारब्धानुसार इष्टानिष्ट भोग त्याला प्राप्त होतात. त्यात अनिष्ट भोग वोढवला तरी तो त्याद्दल राग मानीत नाही॥ १०१९॥

**ना गोमटेंचि विपायें। तें आणूनि पुढां सूये। तयालागीं न होये। साभिलाषु॥ १०२०॥**

**अर्थ**—किंवा अकस्मात् चांगला भोग पुढे येऊन उभा राहिला तर त्याच्याबद्दल अभिलाषाही धरीत नाही॥ १०२०॥

**यापरी इष्टानिष्टीं। रागद्वेष किरीटी। त्यजूनि गिरिकपाटीं। निकुंजीं वसे॥ १०२१॥**

**अर्थ**—याप्रमाणे अर्जुना इष्ट येवो किंवा अनिष्ट येवो, त्याच्याविषयी (कोणत्याही प्रकारचा) रागद्वेष न बाळगतां तो पर्वताच्या गुहेत किंवा गुंफेत वास्तव्य करतो॥ १०२१॥

**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः। ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः॥ ५२॥**

**अर्थ**—तो एकांतवास करणारा, मिताहारी, वाणी शरीर व मन यांना स्वाधीन ठेवणारा, निरंतर ध्यान योगात रहाणारा आणि वैराग्याचा आश्रय करणारा असा असतो॥ ५२॥

**गजबजा सांडिलिया। वसवी वनस्थळिया। अंगाचिया मांदिया। एकलेया॥ १०२२॥**

**अर्थ**—लोकांनी गजबजलेले ठिकाण सोडून एकट्या शरीराच्या अवयवांच्या समुदायासह तो वनात वस्ती करतो॥ १०२२॥

**शमदमादिकीं खेळे। न बोलणेंचि चावळे। गुरुवाक्याचेनि मेळें। नेणे वेळु॥ १०२३॥**

**अर्थ**—तो शमदमादिकांमध्ये खेळतो, न बोलणेच बोलतो, व श्रीगुरुंनी केलेल्या उपदेश वाक्याच्या मननात सारखा तल्लीन असल्यामुळे वेळेचे देखील त्याला भान रहात नाही॥ १०२३॥

**आणि आंगा बळ यावें। नातरी क्षुधा जावें। कां जीभेचे पुरावे। मनोरथ॥ १०२४॥**

**अर्थ**—आणि आपल्या आंगात शक्ती यावी अथवा भूक निवावी किंवा जिभेचे चोचले पुरवावेत॥ १०२४॥

**भोजन करितांविखीं। यया तिहींतें न लेखी। आहारीं मिती संतोषीं। माप न सूये॥ १०२५॥**

**अर्थ**—या तिन्ही गोष्टी भोजन करताना त्याच्या मनात येत नाहीत. मोजक्या आहाराने त्याला होणाऱ्या संतोषाचे मोजमाप करिताच येत नाही॥ १०२५॥

**अनशनाचेनि पावकें। हारपति प्राणु पोखे। इतुकि याचि भागु मोटकें। अशन करी॥ १०२६॥**

**अर्थ**—उपवासाने जठराग्नी प्रक्षुब्ध होऊन प्राण नाश होईल म्हणून प्राणरक्षणा पुरतेच बेताचे अन्न सेवन करतो॥ १०२६॥

**आणि परपुरुषें कामिली। कुळवधू आंग न घाली। निद्रालस्या न मोकली। अशन तैसें॥ १०२७॥**

**अर्थ**—आणि परपुरुषाने इच्छा केली असता कुलीन स्त्री जशी त्याला थारा देत नाही, त्याप्रमाणे साधक निद्रा व आळस यांना वाव देत नाही. तसे त्याचे भोजन असते॥ १०२७॥

**दंडवताचेनि प्रसंगें। भुयीं हन अंग लागे। वांचूनि येर नेघे। राभस्य तेथ॥ १०२८॥**

**अर्थ**—(भगवंताला) साष्टांग नमस्कार घालतांना जे काय जमीनीला आंग लागेल ते लागेल त्या व्यतिरिक्त अविचाराने जमीनीवर लोळणे नाही॥ १०२८॥

**देहनिर्वाहापुरतें। राहावटी हातांपायांतें। किंबहुना आपैतें। सबाह्य केलें॥ १०२९॥**

**अर्थ**—देह चालण्यापुरताच हातापायांना राबवतो. फार काय सांगावे! त्याने अंतर्बाह्य (मन, शरीर व इंद्रियें) सर्व आपल्या स्वाधीन केलें॥ १०२९॥

**आणि मनाचा उंबरा। वृत्तीसी देखों नेदी वीरा। तेथ कें वाग्व्यापारा। अवकाशु असे॥ १०३०॥**

**अर्थ**—आणि अर्जुना, जो आपल्या वृत्तीला मनाचा उंबरठाही पाहू देत नाही (संकल्पविकल्पापर्यंत येऊ देत नाही) तेथे शब्दादिकांच्या व्यापाराला अवसर कोठे?॥ १०३०॥

**ऐसेनि देह वाचा मानस। हे जिणौनि बाह्यप्रदेश। आकळिलें आकाश। ध्यानाचें तेणें॥ १०३१॥**

**अर्थ**—अशा प्रकारें शरीर, वाणी व मन ही बाहेरची ठिकाणे जिंकून त्याने ध्यानाचे आकाश आपल्या स्वाधीन केले॥ १०३१॥

**गुरुवाक्यें उठविला। बोधीं निश्चयो आपुला। न्याहाळी हातीं घेंतला। आरिसा जैसा॥ १०३२॥**

**अर्थ**—श्री गुरुच्या उपदेशाने तो जागा झाला (अज्ञान नाहीसे होते) व आरसा हातात घेऊन आपले रूप स्पष्टपणे पहावे त्याप्रमाणे तो श्रीगुरुच्या बोधाच्या ठिकाणी आत्मस्वरूपाचा निश्चय पाहतो. (मी ब्रह्मस्वरूप आहे हा निश्चय तो करतो).॥ १०३२॥

**पैं ध्याता आपणचि परी। ध्यानरूप वृत्तिमाझारीं। ध्येयत्वें घे हे अवधारीं। ध्यानरूढी गा॥ १०३३॥**

**अर्थ**—तेव्हा अर्जुना, ऐक ध्यान करणारा (ध्याता) आपल्यालाच, ध्यानरूप झालेल्या वृत्तीमध्ये, ध्येयपणाने घेतो. हीं ध्यान करण्याची प्रसिद्ध रीत आहे॥ १०३३॥

**तेथ ध्येय ध्यान ध्याता। ययां तिहीं एकरूपता। होय तंव पांडुसुता। कीजे तें गा॥ १०३४॥**

**अर्थ**—तेव्हा अर्जुना, ध्येय, ध्यान आणि ध्याता (ही त्रिपुटी विसरून) या तिघांचीही एकरूपता होईपर्यंत हे ध्यान करावे लागते॥ १०३४॥

**म्हणौनि तो मुमुक्षु। आत्मज्ञानीं जाला दक्षु। परी पुढांसूनि पक्षु। योगाभ्यासाचा॥ १०३५॥**

**अर्थ**—म्हणून तो मुमुक्षू आत्मज्ञानामध्ये प्रवीण होतो. पण हे सर्व योगाभ्यासाचा पक्ष (मार्ग) पुढे करून (योगाभ्यासाचा आश्रय करून)॥ १०३५॥

**अपानरंध्रद्वया-। माझारीं धनंजया। पार्ष्णी पिडूनियां। कांवरुमूळ॥ १०३६॥**
**आकुंचूनि अध। देऊनि तिन्हीं बंध। करूनि एकवद। वायुभेदा॥ १०३७॥**
**कुंडलिनी जागवूनि। मध्यमा विकाशूनि। आधारादि भेदूनि। अग्नीवरी॥ १०३८॥**
**सहस्त्रदळाचा मेघु। पीयूषें वर्षोनि चांगु। तो मूळवरी वोघु। आणूनियां॥ १०३९॥**

**नाचतया पुण्यगिरी। चिद्भैरवाच्या खापरीं। मनपवनाची खीचपुरी। वाढूनियां॥ १०४०॥**

**अर्थ**—अर्जुना गुद व उपस्थ या दोन द्वारामधील जी शिवण आहे तिचा मध्य टाचेने दाबून॥ १०३६॥ अधोभाग (गुदस्थान) आकुंचन करून व मूळबंधादी तिन्ही बंध साधून आणि प्राणापानादी वायुभेदांची एकवाक्यता करून॥ १०३७॥ कुंडलिनी जागी करून, सुषुम्ना नाडीचा विकास करून व आधार चक्रापासून तो अग्निचक्रापर्यंत चक्रांचे भेदन करून॥ १०३८॥ सहस्रदळरूपी मेघांच्या अमृताचा चांगला वर्षाव करून तो (वर्षाव) मूलाधार चक्रापर्यंत आणून॥ १०३९॥ (आज्ञाचक्ररूपी) पुण्य पर्वतावर नाचत असलेल्या चैतन्यरूपी भैरवाच्या भिन्न पात्रात मन व प्राण यांची ऐक्यरूपी खिचडी वाढून॥ १०४०॥

**जालिया योगाचा गाढा। मेळावा सूनि हा पुढां। ध्यान मागिलीकडां। स्वयंभ केलें॥ १०४१॥**

**अर्थ**—योगाभ्यास चांगला दृढ झाल्यावर हा समुदाय (तीन बंधाचा) पुढे करून त्याच्या पाठीमागे ध्यानाला (ब्रह्मस्वरूपाच्या) स्वयंभू करून सोडतो॥ १०४१॥

**आणि ध्यान योग दोन्ही। इये आत्मतत्त्वज्ञानीं। पैठी होआवया निर्विघ्नीं। आधींचि तेणें॥ १०४२॥**
**वीतरागतेसारिखा। जोडूनि ठेविला सखा। तो आघवियाचि भूमिका-। सवें चाले॥ १०४३॥**

**अर्थ**—आणखी हे ध्यान व योग दोन्हीही ह्या आत्मतत्त्वज्ञानामध्यें निर्विघ्नपणे स्थिर होण्याकरता त्याने आधीच॥ १०४२॥ वैराग्यासारखा मित्र जोडून ठेवलेला असतो. तो (आरंभापासून तो ब्रह्मप्राप्तीपर्यंतच्या) सर्वभूमिकेवर त्याच्या बरोबर चालत असतो॥ १०४३॥

**पाहावें ते दिसें तंववरी। दिठीतें न संडी दीप जरी। तरी कें आहे अवसरी। देखावया॥ १०४४॥**

**अर्थ**—पहावयाची वस्तू दिसेपर्यंत दिव्याने डोळ्यांना जर सोडले नाही तर ती वस्तू दिसायला वेळ कोठे लागेल॥ १०४४॥

**तैसें मोक्षीं प्रवर्तल्या। वृत्ती ब्रह्मीं जाय लया। तंव वैराग्य आथी तया। भंगु कैचा॥ १०४५॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे मोक्षाच्या ठिकाणी प्रवृत्त झालेल्या पुरुषाची (अहंब्रह्मास्मि) वृत्ती ब्रह्माच्या ठिकाणी लय पावेपर्यन्त त्याच्या बरोबर वैराग्य असते. मग त्याचा (वैराग्याचा) नाश कसला॥ १०४५॥

**म्हणौनि सवैराग्यु। ज्ञानाभ्यासु तो सभाग्यु। करूनि जाला योग्यु। आत्मलाभा॥ १०४६॥**

**अर्थ**—म्हणून वैराग्यासह जो ज्ञानाचा अभ्यास करतो तोच आत्मप्राप्तीला योग्य होतो तोच भाग्यवान होय॥ १०४६॥

**ऐसी वैराग्याची अंगीं। बाणूनियां वज्रांगी। राजयोगतुरंगीं। आरूढला॥ १०४७॥**

**अर्थ**—अशाप्रकारे वैराग्याचे चिलखत अंगावर चढवून राजयोगरूपी (अद्वैतस्वरूप निर्विकल्प समाधि) घोड्यावर तो साधक बसतो॥ १०४७॥

**गूढार्थदीपिका—ओवी क्रमांक १०४७ राजयोग तुरंगी। आरूढला**

आत्मज्ञान झाल्यावरही वैराग्यरूपी मित्र हा ज्ञान्याबरोबर शेवट पर्यंत रहात असतो. वैराग्यावाचून ज्ञान टिकणे शक्य रहात नाही म्हणून वैराग्यावाचून ज्ञानाची कल्पना करता येत नाही. म्हणूनच वैराग्यासह ज्ञानाचा अभ्यास करणारा ज्ञानीच आत्मप्राप्तीचा लाभ करूं शकतो असे माउली म्हणते.

**(म्हणौनि सवैराग्यु। ज्ञानाभ्यासु तो सभाग्य)**

असा वैराग्यशील आत्मज्ञानी ध्यान व अष्टांगयोग यांचा अभ्यास करून राजयोगरूपी घोड्यावर आरूढ होतो. राजयोग म्हणजे निर्विकल्प समाधि अवस्था. निर्विकल्प समाधी ही सर्व योगांमध्ये श्रेष्ठ योग असल्यामुळे त्याला "राजयोग" असे म्हणतात. "योगानां राजा राजयोग:" अशी राजयोगाची व्युत्पत्ती आहे. जीव व शिव यांच्या ऐक्याला 'योग' असे म्हणतात.

भगवान् शंकराचार्यांनी हा राजयोग प्राप्त झाला असता ज्ञान्याची कशी स्थिती होते ह्याचे वर्णन 'योगतारावलि'

या आपल्या प्रकरण ग्रंथात केले आहे. ते म्हणतात राजयोगात साधक ब्रह्मस्वरूप होतो, त्याच्या दृष्टीला लक्ष्याची गरज रहात नाही. चित्ताला ध्येयवस्तूच्या ठिकाणी लावावे लागत नाही. त्याला देशाचे वा काळाचे भान रहात नाही. त्याला प्राणायामाची गरज उरत नाही. धारणा व ध्यान यांचेही कष्ट करावे लागत नाही. [न दृष्ट लक्ष्याणि न चित्तबन्धो न देशकालौ न च वायुरोधः। न धारणा-ध्यान-परिश्रमो वा समेधमाने सति राजयोगे॥ योगतारावलि—श्लोक १४]

**वरी आड पडिलें दिठी। सानें थोर निवटी। तें बळी विवेकमुष्टीं। ध्यानाचें खांडें॥ १०४८॥**

**अर्थ**—(साधक) विवेकाच्या बळकट मुठीत ध्यानरूप तलवार धरून जे कांही लहान मोठे दृष्टीच्या आड आलेले असेल त्याचा तो संहार करीत सुटतो॥ १०४८॥

**ऐसेनि संसाररणाआंतु। आंधारीं सूर्यु तैसा असे जातु। मोक्षविजयश्रीये वरैतु। होआवयालागीं॥ १०४९॥**

**अर्थ**—अशा रीतीने अंधारात सूर्य जातो तसा संसाररूपी रणांगणांत मोक्षरूपी विजयश्री वरण्याकरता तो (साधक) चाल करून जातो॥ १०४९॥

**अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम्। विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते॥ ५३॥**

**अर्थ**—जो मनुष्य अहंकार, सामर्थ्य उन्मत्तपणा, काम, क्रोध व संग्रह करणे या प्रवृत्तींना टाकून देऊन व ममतारहित होउन शांत असतो तो ब्रह्मरूप होण्यास योग्य असतो. ॥ ५३॥

**तेथ आडवावया आले। दोषवैरी जे धोपटिले। तयांमाजीं पहिले। देहाहंकारु॥ १०५०॥**

**अर्थ**—या ठिकाणी दुष्ट शत्रू जे जे आडवे येतात व ज्यांना धोपटून काढावे लागते त्यातला म्होरक्या देहाहंकार हा आहे. ॥ १०५०॥

**जो न मोकली मारुनी। जीवों नेदी उपजवोनी। विचंबवी खोडां घालुनी। हाडांचिया॥ १०५१॥**
**तयाचा देहदुर्ग हा थारा। मोडूनि घेतला तो वीरा। आणि बळ हा दुसरा। मारिला वैरी॥ १०५२॥**

**अर्थ**—जो (अहंकार) मेल्यानंतरही (मनुष्याला) सोडत नाही व जन्मल्यावरही सुखाने जगू देत नाही तर हाडांच्या खोडात अडकवून जीवाला तो कुचंबत ठेवतो॥ १०५१॥ हे वीरा अर्जुना! त्या त्या अहंकाराचा देहरूपी किल्ला हा मुख्य आधार आहे. त्याचा पाडाव करून त्याने तो काबींज केला आणि बळ हा दुसरा शत्रू मारला॥ १०५२॥

**जो विषयाचेनि नांवें। चौगुणेंही वरी थांवे। जेणें मृतावस्था धांवे। सर्वत्र जगा॥ १०५३॥**

**अर्थ**—विषयांचे नाव घेताच जो चौपटीहूनही अधिक वाढतो आणि ज्याच्या योगाने सर्व जगाला मृतावस्था प्राप्त होतो॥ १०५३॥

**तो विषयविषाचा अथावो। आघविया दोषांचा रावो। परी ध्यानखड्गांचा घावो। साहेल कैंचा॥ १०५४॥**

**अर्थ**—तो (बलरूपी शत्रू) विषयरूपी विषाचे ठिकाण असून सर्व दोषांचा राजा आहे. परंतु तो ध्यानरूपी तलवारीचा घाव कसा सहन करूं शकेल?॥ १०५४॥

**आणि प्रियविषयप्राप्ती। करी जया सुखाची व्यक्ति। तेचि घालूनि बुंथी। आंगीं जो वाजे॥ १०५५॥**

**अर्थ**—आणि आवडणाऱ्या विषयाची प्राप्ती ज्या सुखाची अभिव्यक्ती करते (सुखाला दाखविते), त्या सुखाचा अंगात बुरखा घालून जो गरजू लागतो॥ १०५५॥

**जो सन्मार्ग भुलवी। मग अधर्माच्या आडवीं-। सूनि वाघां सांपडवी। नरकादिकां॥ १०५६॥**

**अर्थ**—जो (दर्पशत्रू) सन्मार्गाला भुरळ पाडतो आणि अधर्माच्या अरण्यात घालवून नरकादिक वाघांच्या तावडीत देतो॥ १०५६॥

**तो विश्वासें मारितां रिपु। निवटूनि घातला दर्पु। आणि जयाचा अहा कंप। तापसांसी॥ १०५७॥**

**अर्थ**—विश्वास देऊन घात करणारा शत्रू जो दर्प तो मारून टाकला आणि अरेरे, ज्या क्रोधाचे नाव ऐकताच तपस्व्यांना थरकाप होतो. ॥ १०५७॥

**क्रोधा ऐसा महादोखु। जयाचा देखा परिपाकु। भरिजे तंव अधिकु। रिता होय जो॥ १०५८॥**

**अर्थ—**क्रोधासारखा भयंकर दोष ही ज्याची परिपक्व अवस्था आहे व जो भरला असता आणखी आणखी रिकामा होतो. (जसे जसे विषय द्यावेत तसतसा तो आणखी वाढतो)॥ १०५८॥

**तो कामु कोणेच ठायीं। नसे ऐसें केले पाहीं। कीं तेंचि क्रोधाही। सहजें आलें॥ १०५९॥**

**अर्थ—**(असा जो काम) तो कोणत्याही ठिकाणी नाही असे केले. (म्हणजे तो नि:शेष नाहीसा केला) मग क्रोधाची देखील तीच स्थिती झाली॥ १०५९॥

**मुळाचें तोडणें जैसें। होय कां शाखोद्देशें। कामु नाशलेनि नाशे। तैसा क्रोधु॥ १०६०॥**

**अर्थ—**जसे मूळ तोडण्याने शाखा तोडण्याचा उद्देश सफळ होतो त्याप्रमाणे कामाच्या नाशाने क्रोधाचाही नाश (आपोआपच) होतो.॥ १०६०॥

**म्हणौनि काम वैरी। जाला जेथ ठाणोरी। तेथ सरली वारी। क्रोधाचीही॥ १०६१॥**

**अर्थ—**म्हणून कामरूपी शत्रू जेथे युद्धात मेला तेव्हा क्रोधाचीही येण्याजाण्याची वारी संपली. (तोही त्या वेळेस नष्ट झाला)॥ १०६१॥

**आणि समर्थु आपुला खोडा। शिसें वाहवी जैसा होडा। तैसा भुंजौनि जो गाढा। परिग्रहो॥ १०६२॥**

**जो माथांचि पालाणवी। अंगा अवगुणा घालवी। जीवें दांडी घेववी। ममत्वाची॥ १०६३॥**

**अर्थ—**ज्याप्रमाणे सत्ताधीश आपले ओझे पैजेने दुसऱ्याच्या शिरावर टाकून त्याला ते वहावयास लावतो, त्याप्रमाणे भोग भोगून प्रबळ झालेला जो परिग्रह तो आपले खोगीर जीवाच्या मस्तकावर ठेऊन आपल्या आंगचे अवगुण त्याच्याठिकाणी जडवतो व त्याला ममत्वाची काठी धरावयाला लावतो॥ १०६२-१०६३॥

**शिष्य-शास्त्रादिविलासें। मठादिमुद्रेचेनि मिसें। घातले आहाती फांसे। निसंगा जेणें॥ १०६४॥**

**अर्थ—**ज्या परिग्रहाने शिष्य व शाखादिकांचा बडिवार वाढवून मठादी स्थापन करणे व खेचरी वगैर मुद्रेचे प्रदर्शन करणे इत्यादि लक्षणांच्या मिषाने नि:संग पुरुषाला (संगाच्या) पाशात अडकवले॥ १०६४॥

**घरीं कुटुंबपणें सरे। तरी वनीं वन्य होऊनि अवतरे। नागवीयाही शरीरें। लागला आहे॥ १०६५॥**

**अर्थ—**घरी कुटुंबाच्या रूपाने असलेला परिग्रह संपला तरी तो (परिग्रह) जंगलामध्ये रहाणारा या रूपाने पुन्हा प्रगट होतो व अगदी उघडा असला तरी तो शरीररूपाने त्याला लागलेला असतो॥ १०६५॥

**ऐसा दुर्जयो जो परिग्रहो। तयाचा फेडूनि ठावो। भवविजयाचा उत्साहो। भोगीतसे जो॥ १०६६॥**

**अर्थ—**जिंकण्याला कठीण असलेला असा जो परिग्रह त्याचे ठावठिकाण नष्ट करून संसारातून सुटण्याच्या विजयाचा आनंद जो भोगतो॥ १०६६॥

**तेथ अमानित्वादि आघवे। ज्ञानगुणाचे जे मेळावे। ते कैवल्यदेशींचे आघवे। रावो जैसे आले॥ १०६७॥**

**अर्थ—**त्यावेळी अमानित्वादी सर्व ज्ञानगुणांचे समुदाय ते जणुंकाय मोक्षदेशाचे राजेच असावेत त्याप्रमाणे येतात॥ १०६७॥

**तेव्हां सम्यक्ज्ञानाचिया। राणिवा उगाणूनि तया। परिवारु होऊनियां। राहत अंगें॥ १०६८॥**

**अर्थ—**तेव्हा यथार्थ ज्ञानाचे राजपद त्याला देऊन ते (गुण) आपण स्वत: त्याचे परिवार होऊन राहिलेत॥ १०६८॥

**प्रवृत्तीचिये राजबिदीं। अवस्थाभेदप्रमदीं। कीजत आहे प्रतिपदीं। सुखाचें लोण॥ १०६९॥**

**अर्थ—**प्रवृत्तिरूपी राजमार्गांत असलेल्या निरनिराळ्या अवस्थारूपी (जागृति, स्वप्न व सुषुप्ति) स्त्रिया पावलोपावली त्याच्यावरून सुखाचे निंबलोण उतरवीत असतात॥ १०६९॥

**पुढां बोधाचिये कांबीवरी। विवेकु दृश्याची मांदी सारी। योगभूमिका आरती करी। येती जैसिया॥ १०७०॥**

**अर्थ—**(त्या साधकाच्या) पुढें विवेक हा बोधरूपी काठीने दृश्यांची गर्दी दूर करतो व योगभूमिका जणुं काय (त्याला ओवाळायला) आरत्या घेऊन येतात.॥ १०७०॥

**तेथ ऋद्धिसिद्धींची अनेगें। वृंदें मिळती प्रसंगें। तये पुष्पवर्षी आंगें। नाहातसे तो॥ १०७१ ॥**

**अर्थ**—तेव्हां त्याप्रसंगी ऋद्धिसिद्धींचे अनेक समुदाय येतात. आणि त्यांच्या पुष्पवृष्टीने त्याचे आंग अगदी न्हाऊन निघते॥ १०७१ ॥

**ऐसेनि ब्रह्मैक्यासारिखें। स्वराज्य येतां जवळिकें। झळंबित आहे हरिखें। तिन्ही लोक॥ १०७२ ॥**

**अर्थ**—अशा प्रकारे ब्राह्मैक्यासारख्या स्वराज्याची प्राप्ती जवळ आली असता त्याला तिन्ही लोक आनंदाने उचंबळलेले दिसतात॥ १०७२ ॥

**तेव्हां वैरिया कां मैत्रिया। तयासि माझें म्हणावया। समानता धनंजया। उरेचिही ना॥ १०७३ ॥**

**अर्थ**—त्यावेळी अर्जुना, समभावामुळे त्याला हा माझा वैरी आहे अथवा हा माझा मित्र आहे असे म्हणण्याला काही उरतच नाही॥ १०७३ ॥

**हें ना भलतेणें व्याजें। तो जयातें म्हणे माझें। तें नोडवेचि कां दुजें। अद्वितीय जाला॥ १०७४ ॥**

**अर्थ**—इतकेच नाही, कोणत्याही निमित्ताने ज्याला त्याने माझे असे म्हटले ते सर्व त्याच्यापुढे दुजेपणाने ठरत नाही. कारण तो स्वत:च अद्वैतस्वरूप झालेला असतो॥ १०७४ ॥

**पैं आपुलिया एकी सत्ता। सर्वही कवळूनिया पांडुसुता। कही न लगती ममता। धाडिली तेणें॥ १०७५ ॥**

**अर्थ**—अर्जुना, याप्रमाणे तो केवळ आपल्या एकत्वाच्या भावाने सर्व विश्वाला कवटाळतो (पाहतो) आणि म्हणून त्याला ममता कधीच जडत नाही, तो तिचा सर्वस्वी त्याग करतो॥ १०७५ ॥

**ऐसा जिंतिलिया रिपुवर्ग। आपु मानलयां हें जग। अपैसा योगतुरंग। स्थिर जाला॥ १०७६ ॥**

**अर्थ**—याप्रमाणे शत्रुसमुदाय जिंकल्यानंतर आणि (मायिक) अशा या जगाचा निरास केल्यानंतर त्याचा योगरूपी घोडा आपोआपच स्थिर होतो॥ १०७६ ॥

**वैराग्याचें गाढलें। अंगीं त्राण होतें भलें। तेंही नावेक ढिलें। तेव्हां करी॥ १०७७ ॥**

**अर्थ**—त्यावेळी वैराग्याचे, अंगात बळकट घातलेले चिलखत सुद्धा, घटकाभर तो ढिले करतो॥ १०७७ ॥

**आणि निवटी ध्यानाचें खांडें। तें दुजें नाहींचि पुढें। म्हणूनि हातु आसुडे। वृत्तीचाही॥ १०७८ ॥**

**अर्थ**—आणि ध्यानरूपी तलवारीच्या योगाने ज्याचा नाश होतो असे दुसरे समोर काहीच नसल्यामुळे तो वृत्तीचाही हात झिटकारून देतो॥ १०७८ ॥

**जैसें रसौषध खरें। आपुलें काज करूनि पुरें। आपणही नुरे। तैसें होतसे॥ १०७९ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे खरे रसायन आपले कार्य पूर्ण करून आपणही शिल्लक उरत नाही, त्याप्रमाणे हे होते॥ १०७९ ॥

**देखोनि ठाकिता ठावो। धांवता थिरावे पावो। तैसा ब्रह्मसामीप्यें थांवो। अभ्यासु सांडी॥ १०८० ॥**

**अर्थ**—थांबण्याचे ठिकाण दिसले म्हणजे धावणारे पाय जसे थांबू लागतात त्याप्रमाणे ब्रह्मप्राप्ती झाली म्हणजे अभ्यास आपोआप रहातो॥ १०८० ॥

**घडतां महोदधीसी। गंगा वेगें सांडिजे जैसी। कां कामिनी कांतापासीं। स्थिर होय॥ १०८१ ॥**

**अर्थ**—समुद्राला मिळताच नदीचा वेग जसा बंद पडतो किंवा पतीची गांठ पडताच कामिनी (पत्नी) जशी शांत होते. ॥ १०८१ ॥

**नाना फळतिये वेळे। केळीची वाढी मांटुळें। कां गांवापुढें वळे। मार्गु जैसा॥ १०८२ ॥**

**अर्थ**—अथवा केळीचे झाड फळल्यावर ज्याप्रमाणे त्याची वाढ खुंटते किंवा गाव येताच ज्याप्रमाणे वाट संपते॥ १०८२ ॥

**तैसा आत्मसाक्षात्कारु। होईल देखोनि गोचरु। ऐसा साधनहतियेरु। हळूचि ठेवी॥ १०८३ ॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे आत्मसाक्षात्कार प्राप्त होईल असे समजताच तो (साधक) साधनरूपी हत्यारे हळूच ठेऊन देतो॥ १०८३ ॥

**म्हणौनि ब्रह्मेंसीं तया। ऐक्याचा समो धनंजया। होतसें तैं उपाया। वोहटु पडे॥ १०८४॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना, ब्रह्माशी ऐक्य होण्याच्यावेळी त्याच्या सर्व साधनमार्गांना वोहोटी लागते॥ १०८४॥

**मग वैराग्याची गोंधळुक। जे ज्ञानाभ्यासाचें वार्धक्य। योगफळाचाही परिपाक। दशा जें कां॥ १०८५॥**

**ते शांति पैं गा सुभगा। संपूर्ण ये तयाचिया आंगा। तैं ब्रह्म होआवयाजोगा। होय तो पुरुषु॥ १०८६॥**

**अर्थ**—मग वैराग्याची जी सांजवेळ, जी ज्ञानाच्या अभ्यासाचे वार्धक्य, योगाच्या फळाची जी परिपक्व दशा अशी ती संपूर्ण शान्ती, हे भाग्यवान् अर्जुना, त्याच्या आंगी खेळू लागते, तेव्हा तो पुरुष ब्रह्म होण्यास पात्र होतो॥ १०८५-१०८६॥

**पुनवेहूनी चतुर्दशी। जेतुलें उणेपण शशी। कां सोळेयाऊनि जैसी। पंधरावी वानी॥ १०८७॥**

**सागरींही पाणी वेगें। संचरे तें रूप गंगे। येर निश्चळ जें उगें। तें समुद्र जैसा॥ १०८८॥**

**ब्रह्मा आणि ब्रह्महोतिये। योग्यतें तैसा पाडु आहे। तेचि शांतीचेनि ल्वलाहें। होय तो गा॥ १०८९॥**

**अर्थ**—पौर्णिमेपेक्षा चतुर्दशीचे दिवशी जितका चंद्राच्या कलेत कमीपणा असतो किंवा सोळा आणे कसापेक्षा (सोन्यात) पंधरा आणे कसात जितकी कमतरता असते. किंवा॥ १०८७॥ समुद्रांत नदीने प्रवेश केल्यानंतर पाण्याचा वेग जेथपर्यंत दिसतो तोपर्यंत ती नदी व जेथे तो वेग थांबतो तो समुद्र॥ १०८८॥ त्याप्रमाणे ब्रह्म व ब्रह्म होणारा यांचा संबंध असतो आणि या शांतीमुळे तो लागलाच ब्रह्मरूप होतो॥ १०८९॥

**पैं तेंचि होणेनवीण। प्रतीती आलें जें ब्रह्मपण। ते ब्रह्म होती जाण। योग्यता येथ॥ १०९०॥**

**अर्थ**—परंतु तशी पूर्ण ब्रह्मरूपता येण्यापूर्वी जो ब्रह्माचा अनुभव आलेला असतो; तो ब्रह्म होण्याची योग्यता आहे असे समज॥ १०९०॥

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति। समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम्॥ ५४॥**

**अर्थ**—ब्रह्मरूप झालेला पुरुष अंत:करणांत आनंदी होऊन कशाचे दु:ख करीत नाही व कशाची इच्छा करीत नाही. तो सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी समबुद्धी ठेऊन माझी परमभक्ती प्राप्त करून घेतो॥ ५४॥

**ते ब्रह्मभावयोग्यता। पुरुषु तो मग पांडुसुता। आत्मबोध-प्रसन्नता-। पदीं बैसे॥ १०९१॥**

**अर्थ**—मग, अर्जुना, ब्रह्मरूप होण्याची योग्यता असलेला तो पुरुष आत्मज्ञानाने प्राप्त होणाऱ्या आनंदाच्या पदावर बसतो॥ १०९१॥

**जेणें निपजे रससोय। तो तापुही जैं जाय। तैं ते कां होय। प्रसन्न जैसी॥ १०९२॥**

**अर्थ**—ज्याने स्वयंपाक तयार होतो, तो अग्नी जेव्हा विझेल तेव्हाच तो स्वयंपाक मनाला आनंद देतो॥ १०९२॥

**नाना भरतिया ल्गबगा। शरत्काळीं सांडिजे गंगा। कां गीत राहतां उपांगा। वोहटु पडे॥ १०९३॥**

**तैसा आत्मबोधीं उद्यमु। करितां होय जो श्रमु। तोही जेथें समु। होऊनि जाय॥ १०९४॥**

**अर्थ**—अथवा शरद् ऋतूमध्ये गंगा ज्याप्रमाणे पुराचा वेग सोडून देते किंवा गाणे बंद होताच साथीची वाद्य साधने बंद पडतात॥ १०९३॥ त्याप्रमाणे आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी केलेले श्रम तेही जेथे शांत (बंद) होऊन जातात॥ १०९४॥

**आत्मबोधप्रशस्ती। हे तिये दशेची ख्याती। ते भोगीतसे महामती। योग्यु तो गा॥ १०९५॥**

**अर्थ**—'आत्मबोधानंद' या नावाने त्या अवस्थेची प्रसिद्धी आहे. हे अत्यंत बुद्धिमान् अर्जुना, तो योग्य पुरुष तिचा आनंद लुटतो॥ १०९५॥

**तेव्हां आत्मत्वें शोचावें। कांहीं पावावया कामावें। हें सरलें समभावें। भरितें तया॥ १०९६॥**

**अर्थ**—त्यावेळी सर्वत्र आत्मबुद्धी झाल्यामुळे एखाद्या विषयी दु:ख करावे किंवा कशाची तरी प्राप्ती व्हावी म्हणून इच्छा करावी या दोन्ही गोष्टी ब्रह्मसाम्य भावाच्या भरतीमुळे नाहीशा होतात॥ १०९६॥

**उदया येतां गभस्ती। नाना नक्षत्रव्यक्ती। हारविजती दीप्ती। आंगिका जेवीं॥ १०९७॥**

**अर्थ**—सूर्य उदयाला आला म्हणजे सर्व नक्षत्रे जशी आपल्या अंगची प्रभा हरवून बसतात॥ १०९७॥

**तेवीं उठतिया आत्मप्रथा। हे भूतभेदव्यवस्था। मोडीत मोडीत पार्था। वास पाहे तो॥ १०९८॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे हे अर्जुना, आत्मानुभव प्राप्त झाला म्हणजे तो पुरुष प्राणिमात्रातील भेदात्मक व्यवस्था मोडीत (अद्वैताची) वाटचाल करीत असतो (तो जिकडे तिकडे अद्वैतभाव बघत असतो)॥ १०९८॥

**पाटियेवरील अक्षरें। जैसीं पुसतां येती करें। तैसीं हारपती भेदांतरें। तयाचिये दृष्टी॥ १०९९॥**

**अर्थ**—पाटीवर काढलेली अक्षरे जशी हाताने पुसून काढता येतात, त्याप्रमाणे त्याच्या दृष्टीत भेदाभेद नाहीसे होतात॥ १०९९॥

**तैसेनि अन्यथाज्ञानें। जियें घेपती जागरस्वप्नें। तियें दोन्ही केली लीनें। अव्यक्तामाजीं॥ ११००॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे अन्यथा (चुकीच्या) ज्ञानामुळे ज्या जागृती व स्वप्न अवस्था निर्माण होतात त्या दोन्ही अवस्था अव्यक्तामध्ये (अज्ञानामध्ये) लीन होतात॥ ११००॥

**मग तेंही अव्यक्त। बोध वाढता झिजत। पुरलां बोधीं समस्त। बुडोनि जाय॥ ११०१॥**

**अर्थ**—मग तेही (मूळ अज्ञान) जसा जसा बोध वाढत जाईल तसे तसे नाहीसे होत होत पूर्ण बोधात पूर्णपणे गडप होते॥ ११०१॥

**जैसी भोजनाच्या व्यापारीं। क्षुधा जिरत जाय अवधारीं। मग तृप्तीच्या अवसरीं। नाहींच होय॥ ११०२॥**
**नाना चालीचिया वाढी। वाट होत जाय थोडी। मग पातला ठायीं बुडी। देऊनि निमे॥ ११०३॥**
**कां जागृती जंव जंव उद्दीपे। तंव तंव निद्रा हारपे। मग जागीनलिया स्वरूपें। नाहींच होय॥ ११०४॥**
**हें ना आपुलें पूर्णत्व भेटे। जेथ चंद्रासीं वाढी खुंटे। तेथ शुक्लपक्षु आटे। निःशेषु जैसा॥ ११०५॥**
**तैसा बोध्यजात गिळितु। बोधु बोधें ये मज आंतु। मिसळला तेथ साद्यंतु। अबोधु गेला॥ ११०६॥**

**अर्थ**—ऐक, जेवण चालले असता जशी (प्रत्येक घासाबरोबर) भूक कमी कमी होत जाते व पूर्ण तृप्ती झाली असता ती अजिबात नाहीशी होते॥ ११०२॥ किंवा चालणे जसजसे वाढत जाते तसतसा पल्ला कमी कमी होत जातो आणि ठरवलेल्या ठिकाणी पोहोचल्यावर वाट चालण्याचे सरते॥ ११०३॥ किंवा जो जो जागेपणा येत जातो तो तो झोप नाहीशी होत जाते आणि अखेर पूर्णपणे जागे झाल्यावर ती पूर्णपणे नाहीशी होते.॥ ११०४॥ हे राहू दे पौर्णिमेच्या दिवशी चंद्राला आपले पूर्णत्व प्राप्त होते व जेव्हा चंद्राचे वाढणे थांबते तेव्हा ज्याप्रमाणे शुक्लपक्ष निःशेष नाहीसा होतो॥ ११०५॥ त्याप्रमाणे ज्ञेय म्हणून जितके काही असेल ते सर्व अद्वैतज्ञानाने नाहीसे होऊन तो माझ्याशी एकरूप होतो तेव्हा अज्ञान समूळ नाहीसे होते॥ ११०६॥

**तेव्हां कल्पांताचिये वेळे। नदी सिंधूचें पेंडवळें। मोडूनि भरलें जळें। आब्रह्म जैसें॥ ११०७॥**
**नाना गेलिया घट मठ। आकाश ठाके एकवट। कां जळोनि काष्ठें काष्ठ। वन्हीचि होय॥ ११०८॥**
**नातरी लेणियांचे ठसे। आटोनि गेलिया मुसे। नामरूपभेदें जैसें। सांडिजे सोनें॥ ११०९॥**
**हेंही असो चेइलया। तें स्वप्न नाहीं जालिया। मग आपणचि आपणयां। उरिजे जैसें॥ १११०॥**
**तैंसा मी एकवांचूनि कांहीं। तया तयाहीसकट नाहीं। हे चौथी भक्ति पाहीं। माझी तो लाहे॥ ११११॥**

**अर्थ**—तेव्हा प्रलयकाली नदी व समुद्र यांच्या सीमा नाहीशा होऊन ब्रह्मांडात ज्याप्रमाणे सर्व पाणीच पाणी होऊन जाते॥ ११०७॥ किंवा घडा, मठ नाहीसे झाल्यानंतर आकाश (त्यांच्यातील) जसे एक होऊन जाते किंवा लाकडे जळल्यानंतर लाकूड जसे विस्तवच होऊन जाते॥ ११०८॥ किंवा मुशीमध्ये अलंकार टाकले असता ते आटून त्यांचा साज नाहीसा होतो व सोने जसे नामरूपाला (साजाच्या) सोडून देते॥ ११०९॥ हेही राहू द्या. पूर्णपणे जागे होऊन स्वप्न नाहीसे झाल्यानंतर मग आपणच आपल्या ठिकाणी एकटे जसे उरतो॥ १११०॥ त्याप्रमाणे (ज्ञानी पुरुषाला) माझ्याशिवाय त्याच्या सहवर्तमान त्याला दुसरे काहीही उरत नाही. पहा ही अशी माझी चौथी भक्ती त्याला

प्राप्त होते. (स्वत:च्या अस्तित्वाचेही भान न उरता त्याला मज परमात्म्याव्यतिरिक्त अन्य काहीच प्रतीत होत नाही. अशी ही माझी चौथी भक्ति त्याला लाभते, पाहा) ॥ ११११ ॥

**येर आर्तु जिज्ञासु अर्थार्थी। हे भजती जिये पंथीं। ते तिन्ही पावोनि चौथी। म्हणिपत आहे॥ १११२॥**

**अर्थ**—इतर जे आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी भक्त हे ज्या मार्गांनी माझें भजन करतांत, त्या तिन्ही मार्गांच्या अपेक्षेने या भक्तीला मी चवथी भक्ती म्हणत आहे. ॥ १११२ ॥

**एऱ्हवीं तिजी ना चौथी। हे पहिली ना सरती। पैं माझिये सहजस्थिति। भक्ति नाम॥ १११३॥**

**अर्थ**—तसे जर पाहिले तर, भक्ती ही तिसरी नाही व चौथीही नाही, पहिलीही नव्हे आणि दुसरी नव्हे. माझ्या ब्रह्मरूप सहजावस्थेलाच भक्ती हे नाव आहे. ॥ १११३ ॥

**जें नेणणें माझें प्रकाशूनि। अन्यथात्वें मातें दाऊनि। सर्वही सर्वीं भजौनि। बुझावीतसे जें॥ १११४॥**

**अर्थ**—जी माझी सहजस्थिती अज्ञानाला प्रकाशित करून मला विपरीत धर्मांनी (जगद्रूपाने) दाखवून सर्वांना सर्व ठिकाणी भक्ती (प्रेम) करायला लावून सर्वांना समजावीत असते. ॥ १११४॥

**जो जेथ जैसें पाहों बैसे। तया तेथ तैसेंचि असे। हें उजियेडें कां दिसे। अखंडें जेणें॥ १११५॥**

**अर्थ**—जो जेथे जसे पाहू लागतो, त्याला तेथे तसेच आहे असे वाटू लागते व हे त्याला ज्या अखंड (चित्) प्रकाशामुळे दिसते॥ १११५॥

**स्वप्नाचें दिसणें न दिसणें। जैसें आपलेनि असलेपणें। विश्वाचें आहे नाहीं जेणें। प्रकाशे तैसें॥ १११६॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे स्वप्नाचे दिसणे किंवा न दिसणे आपल्या अस्तित्वावर अवलंबून आहे, त्याप्रमाणे विश्वाचे असणे नसणे ज्या प्रकाशावर (चित्) अवलंबून आहे. ॥ १११६ ॥

**ऐसा हा सहज माझा। प्रकाशु जो कपिध्वजा। तो भक्ति या वोजा। बोलिजे गा॥ १११७॥**

**अर्थ**—अर्जुना, असा जो माझा सहज प्रकाश (चिद्रूपता) तो भक्ती या नावाने बोलला जातो॥ १११७॥

**म्हणोनि आर्ताच्या ठायीं। हे आर्ति होऊनि पाहीं। अपेक्षणीय जें कांहीं। तें मीचि केला॥ १११८॥**

**अर्थ**—म्हणून आर्ताच्या ठिकाणी ही भक्ती उत्कट इच्छेच्या रूपाने बनून त्यापासून जी काही अपेक्षा आहे (इच्छेचा विषय) तीत आलंबन म्हणून मीच रहात असतो॥ १११८॥

**जिज्ञासुपुढां वीरेशा। हेचि होऊनि जिज्ञासा। मी कां जिज्ञासु ऐसा। दाखविला॥ १११९॥**

**अर्थ**—हे वीरश्रेष्ठा, हीच (भक्ती) जाणण्याची इच्छा करणाऱ्यापुढे जिज्ञासा होऊन मीच जिज्ञासेचा विषय (जिज्ञासा) दाखविला जातो॥ १११९॥

**हेचि होऊनि अर्थना। मीचि माझ्या अर्थी अर्जुना। करूनि अर्थाभिधाना। आणी मातें॥ ११२०॥**

**अर्थ**—हीच भक्ती, अर्जुना, अर्थाच्या प्राप्तीची इच्छा होऊन मला अर्थरूप करून तीच मला अर्थ हे नाव देते॥ ११२०॥

**एवं घेऊनि अज्ञानातें। माझी भक्ति जे हे वर्ते। ते दावी मज द्रष्ट्याते। दृश्य करूनि॥ ११२१॥**

**अर्थ**—याप्रमाणे अज्ञानाला घेऊन माझी जी ही भक्ती व्यवहार करूं लागते, ती द्रष्ट्रस्वरूप असलेल्या मला दृश्य करून दाखवते॥ ११२१॥

**येथें मुखचि दिसे मुखें। या बोला कांहीं न चुके। परी दुजेपण हें लटिकें। आरिसा करी॥ ११२२॥**

**अर्थ**—आरशात पाहिले असता तोंडामुळेच तोंड दिसते. या म्हणण्यात काही चूकही नाही. पण आरसा मात्र खोटाच दोनपणा निर्माण करतो॥ ११२२॥

**दिठी चंद्रचि घे साचें। परी येतुलें हें तिमिराचें। जे एकचि असे तयाचे। दोनी दावी॥ ११२३॥**

**अर्थ**—दृष्टी खरोखर चंद्रालाच पहाते परंतु नेत्ररोग (तिमिर नावाचा) एवढे काम करतो की एकच चंद्राला दोन करून दाखवतो॥ ११२३॥

**तैसा सर्वत्र मीचि मियां। घेपतसें धनंजया। परी दृश्यत्व हें वायां। अज्ञानवशें॥ ११२४॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे अर्जुना सर्वत्र मीच माझ्याकडून आकलन केला जातो. परंतु दृश्यत्व हे खोटे असून ते अज्ञानवशतेमुळे आहे॥ ११२४॥

**तें अज्ञान आतां फिटलें। माझें द्रष्टृत्व मज भेटलें। निजबिंबीं एकवटलें। प्रतिबिंब जैसें॥ ११२५॥**

**अर्थ**—ते अज्ञान आता नाहीसे झाले व प्रतिबिंब ज्याप्रमाणे आपल्या बिंबात एकरूप व्हावे त्याप्रमाणे माझे दष्टृत्व मला भेटले. (द्रष्टा व दृश्य एकरूप झाले)॥ ११२५॥

**गूढार्थदीपिका—माझे द्रष्टृत्व मज भेटले।**

एका आत्मवस्तूशिवाय दुसरी वस्तूच नसल्याकारणाने दृश्याच्या अपेक्षेने वापरण्यात येणारा 'द्रष्टा' शब्दाचा प्रयोग खरोखर विचार करता चूकच म्हणावा लागेल. परंतु असे असले तरी आत्मवस्तूचे वर्णन शब्दाने करत असतांना त्या शब्दाशिवाय दुसऱ्या कोणत्याही शब्दाचा वापरही करता येत नाही. अंधाराची कधीच कल्पना नसलेल्या प्रकाशरूप अशा सूर्याचा उल्लेख अंधाराच्या अपेक्षेने वापरण्यात येणाऱ्या प्रकाश शब्दाव्यतिरिक्त आणखी कोणत्या शब्दाने करता येणार?

आत्मस्वरूपाच्या सच्चिदानंदरूप धर्माहून विलक्षण अशा अचित् जड व दुःखरूप दृश्याचा अज्ञाननिवृत्तिनंतर निरास होतो. म्हणजेच दृश्याचे स्वरूपही द्रष्टृस्वरूप आत्मस्वरूपाच्या लक्षणाचेच भासू लागते. बिंब व प्रतिबिंबात प्रतिबिंबाला बिंबाहून अलग अशी सत्ता रहात नाही. त्यामुळे प्रतिबिंब नाहीसे होताच ते मूळच्या बिंबातच विलीन होते. त्याचप्रमाणे ज्ञानरूप व आनंदरूप असलेल्या द्रष्टृस्वरूप अशा आत्मस्वरूपाच्या ठिकाणी ज्ञान व आनंद यांचे स्वाभाविक स्फुरण होऊन जो दोनपणाचा भास पाण्यावरील तरंगाप्रमाणे निर्माण होतो त्यामुळे द्रष्टा-दृश्य असा भास निर्माण होतो. वस्तुतः द्रष्टृस्वरूप अशा आत्मशक्तीचाच तो विलास असतो. मात्र अज्ञानामुळे हा दोनपणाचा विलास विभिन्नसत्ताक भासून द्वैतात परिणत होतो व अधिष्ठानरूप आत्मस्वरूपाचा विसर पडून सच्चिदानंदाच्या विरोधी धर्माचे दृश्य भासायला लागते. यालाच जगत् असे दुसरे नांव आपण देतो. ज्ञानाने ह्या अज्ञानाचा पूर्ण निरास झाला म्हणजे हेच दृश्य मूळच्या द्रष्टृस्वरूप आत्मस्वरूपाचा स्फुरणरूप विलास वाटतो व अशा रीतीने दृश्य म्हणून दुसरे काही नसून ते द्रष्टृस्वरूपच आहे असे यथार्थज्ञान होते व अज्ञानातील भिन्नसत्ताक व भिन्न धर्मांचा द्रष्टा-दृश्य भाव पूर्णपणे नाहीसा होतो. त्यांचा दोनपणा एकस्वरूपच म्हणजे सच्चिदानंदस्वरूप भासतो. यालाच अद्वैत म्हणतात.

**पैं जेव्हांही असे किडाळ। तेव्हांही सोनेंचि अढळ। परी तें कीड गेलिया केवळ। उरे जैसें॥ ११२६॥**

**अर्थ**—हीनकस धातु ज्यावेळी मिसळलेली असते त्यावेळी ही सोन्याचे सोनेपण अढळच असते, पण हीनकस ज्यावेळी जळून जाते त्यावेळी केवळ जसे खरे सोने उरते॥ ११२६॥

**हां गा पूर्णिमेआधीं कायी। चंद्रु सावयवुचि नाहीं। परी तिये दिवशीं भेटे पाहीं। पूर्णता तया॥ ११२७॥**

**अर्थ**—किंवा पौर्णिमेच्या आधी चंद्र काय सर्वांगांनी पूर्ण नसतो? परंतु ज्या दिवशी (पौर्णिमेच्या) मात्र त्याला पूर्णता प्राप्त होते असे वाटते॥ ११२७॥

**तैसा मीचि अज्ञानद्वारें। दिसें परी हस्तांतरें। मग द्रष्टृत्वीं तें सरे। मियांचि मी लाभें॥ ११२८॥**

**अर्थ**—याचप्रमाणे मीच अन्यथा ज्ञानाने दिसतो, पण (दृश्य रूपाने) भिन्नपणाने दिसतो. मग (ज्ञानाने) दृश्याचा निरास होऊन ते द्रष्टृत्वात मावळते व मलाच मी लाभतो॥ ११२८॥

**म्हणौनि दृश्यपथा-। अतीतु माझा पार्था। भक्तियोगु चवथा। म्हणितला गा॥ ११२९॥**

**अर्थ**—म्हणूनच, अर्जुना, दृश्यरूप मार्गाच्या पलीकडला माझा (चौथा) भक्तियोग आहे असे मी म्हटले॥ ११२९॥

**भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः। ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम्॥ ५५॥**

**अर्थ**—मी जेवढां आणि जसा आहे तसा मला तो भक्तिच्यायोगाने यथार्थ जाणतो व मला यथार्थ रूपात जाणल्यानंतर तो मद्रूप होतो.॥ ५५॥

**इया ज्ञानभक्ति सहज। भक्तु एकवटला मज। तो मीचि केवळ हें तुज। श्रुतही आहे॥ ११३०॥**

**अर्थ**—या ज्ञान भक्तीने जो भक्त माझ्याशी एकरूप झाला आहे तो भक्त केवळ मीच आहे हे तू ऐकलेच आहेस॥ ११३०॥

**जे उभऊनियां भुजा। ज्ञानिया तो आत्मा माझा। हें बोलिलों कपिध्वजा। सप्तमाध्यायीं॥ ११३१॥**

**अर्थ**—कारण की अर्जुना, सातव्या अध्यायामध्ये ज्ञानी (पुरुष हा) माझा आत्मा आहे असे हात वर करून मी सांगितलेच आहे॥ ११३१॥

**ते हे कल्पादीं भक्ति मियां। भागवतमिषें ब्रह्मया। उत्तम म्हणोनि धनंजया। उपदेशिली॥ ११३२॥**

**अर्थ**—अर्जुना ती ही भक्ती उत्तम आहे म्हणूनच मी ती कल्पाच्या आरंभी भागवताच्या निमित्ताने ब्रह्मदेवाला उपदेशिली॥ ११३२॥

**ज्ञानी इयेतें स्वसंविति। शैव म्हणती शक्ति। आम्ही परमभक्ति। आपुली म्हणों॥ ११३३॥**

**अर्थ**—ज्ञानी हिला स्वसंविती (आत्मज्ञान) म्हणतात. शैव हिला शक्ती म्हणतात आणि आम्ही हिला आपली श्रेष्ठ भक्ती म्हणतो॥ ११३३॥

**हे मज मिळतिये वेळे। तयां कर्मयोगियां फळे। मग समस्तही निखिळें। मियांचि भरे॥ ११३४॥**

**अर्थ**—कर्मयोगी मला मिळतात तेव्हाच त्यास ही भक्ती प्राप्त होते व मग (त्याच्या दृष्टिने) जिकडे तिकडे मीच भरून राहतो॥ ११३४॥

**तेथ वैराग्यविवेकेंसीं। आटे बंध मोक्षेंसीं। वृत्ती तये आवृत्तीसीं। बुडोनि जाय॥ ११३५॥**

**अर्थ**—त्यावेळी विवेकासह वैराग्य व मोक्षासह बंधही आटून जातात आणि मिथ्यावृत्तीबरोबरच ब्रह्माकारवृत्तीही नाहीशी होते॥ ११३५॥

**गूढार्थदीपिका—ओवी क्रमांक ११३५ वृत्ती तये अवृत्तीसीं। बुडोनि जाय।**

एका सगुण भगवंताशिवाय दुसरी वस्तु नाही असे सगुण भगवंताचे व्यापक ज्ञान झाल्यामुळे ज्यांच्या प्रेमाचा विषय एक सगुण भगवानच होतो व अशा त्या ज्ञानी भक्तांकडून होणारा सर्व व्यवहार त्यांच्या प्रेमाचा विषय असलेल्या एका भगवंता करताच होत असतो. अशा भगवद्भक्ताला म्हणजे कर्मयोग्याला भगवंताची प्राप्ती होऊन त्याला जिकडे तिकडे भगवानच नामरूपाने नटला असा प्रत्यय येतो. ह्या ज्ञानीभक्ताला येणाऱ्या अनुभवाचे वर्णन याठिकाणी माउली करत आहे.

ह्या ज्ञानीभक्ताच्या ठिकाणी 'अहंब्रह्मास्मिरूप' व 'सर्वं खल्विदं ब्रह्मरूप' या दोन्ही प्रकारचे ज्ञान (व्यतिरेक व अन्वयांतील) बाणलेले असते. पण हे दोन्ही प्रकारचे ज्ञान वृत्तिरूपच असल्यामुळे हे सापेक्षच ज्ञान म्हणावे लागते. वृत्ती जोपर्यंत कायम राहते तो पर्यंत परमानंदतेचा अनुभव येऊ शकत नाही. समाधीमध्ये अर्थातच वृत्ती लीन होत असल्या कारणामुळे समाधीत परमानंदतेचा अनुभव येतो. समाधीतून व्यवहारात आल्यावर म्हणजे व्युत्थान दशेत प्रारब्धाने वृत्तींचे स्फुरण होत असते. अशावेळी भक्तिरहित ज्ञानी अज्ञान दशेप्रमाणे वृत्तीवर आरूढ होत नाही. तो वृत्तींना मिथ्या समजून आपल्या ठिकाणी साक्षित्व ठेवण्याचा अभ्यास करतो. पण हे सर्व तो करीत असतांना समाधी-सारखी अखंड परमानंदता त्याच्या ठिकाणी मात्र राहू शकत नाही. जाणीवेचा विसर पडल्याशिवाय परमानंदता बाणू शकत नाही हा वेदान्ताचा सिद्धान्त आहे व सर्वांचा तसा अनुभवही आहे.

ज्ञानीभक्त किंवा कर्मयोगी ह्याला व्युत्थानात देखील नामरूपांनी त्याच्या प्रेमाचे आलंबन असलेला सगुण भगवानच नटलेला आहे असा अनुभव येत असल्यामुळे त्याच्या सर्व वृत्तींना आलंबन सगुण भगवान राहते. त्याच्या सर्व उठणाऱ्या वृत्ती समाधीप्रमाणेच सगुण भगवंताकार होतात. त्यामुळे समाधीवत् व्युत्थानातही त्याचा ब्रह्मानंद कायम रहातो. देवएकनाथांनी वर्णन करतांना म्हटले आहे की "समाधि व्युत्थानी हरि विलसे, त्याविण अन्य न काही भासे। मौनही वाचे पडे कि हरिरूप अखंड नयनापुढे।"

या सगुण भगवंताच्या परमप्रेमात निमग्न झालेल्या ज्ञानीभक्ताला अर्थातच आत्मानात्म विवेक किंवा विषयां विषयीचे वैराग्य, बंधाची कल्पना किंवा त्यातून मुक्त झाल्याची कल्पना, जगता विषयीचा मिथ्याभाव किंवा त्या जगताच्या अपेक्षेने असलेली ब्रह्मरूपतेची जाणीव या कशाचेच भान रहात नाही. त्याच्या दृष्टीने या सर्व गोष्टी पूर्णपणे नाहीशा झालेल्या असतात. प्रेमात कोणतीच जाणीव शिल्लक रहात नसल्या कारणाने प्रेमस्वरूप झालेल्या ज्ञानी भगवद्भक्तांना या सर्व गोष्टींचा पूर्ण विसर पडतो व त्यांची निर्विकल्प दशा अखंड कायम राहते हा भाव.

**घेऊनि ऐलपणातें। परत्व हारपे जेथें। गिळूनि चाऱ्ही भूतें। आकाश जैसें॥ ११३६॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे चारही भूतांना (पृथ्वी, आप, तेज व वायु) पचवून एकटे आकाशच मागे उरते त्याप्रमाणे जीवपणाला घेऊन ईश्वरपणाही जेथे नाहीसा होतो॥ ११३६॥

**तया परी थडथांद। साध्यसाधनातीत शुद्ध। तें मी होऊनि एकवद। भोगी तो मातें॥ ११३७॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे अलिप्तत्व, साध्य व साधन यांच्या पलीकडे असलेले असे शुद्ध स्वरूप ते मी, तो होऊन, ऐक्यरूपाने आत्मानंदाला (माते) अनुभवतो॥ ११३७॥

**घडोनि सिंधूचिया आंगा। सिंधूवरी तळपे गंगा। तैसा पाडु तया भोगा। अवधारीजो॥ ११३८॥**

**अर्थ**—समुद्राच्या आत घुसूनही गंगा जशी समुद्रावर शोभते. त्याचप्रमाणे या आत्मानंदाच्या अनुभवाचा प्रकार आहे हे लक्षात घे.॥ ११३८॥

**का आरिसयासि आरिसा। उटूनि दाविलिया जैसा। देखणा अतिशयो तैसा। भोगणां तिये॥ ११३९॥**

**अर्थ**—आरसा स्वच्छ करून दुसऱ्या आरशासमोर ठेवला असता पाहणारा व भोगणारा यांचे जसे एकमेकात सुरेख ऐक्य होते व एकमेकांचा आनंद घेतात त्याचप्रमाणे समरस होऊन आत्मानंदाचा अनुभव घेता येतो॥ ११३९॥

**हें असो दर्पणु नेलिया। तो मुखबोधुही गेलिया। देखलेपण एकलेया। आस्वादिजे जेवीं॥ ११४०॥**

**अर्थ**—हे असो, आरसा दूर केल्यावर व मुखाचा आभासही नाहीसा झाल्यावर, जसा पहाणारा एकटाच पाहिलेल्या मुखाच्या अनुभवाचा आस्वाद घेतो॥ ११४०॥

**चेइलिया स्वप्न नाशे। आपलें ऐक्यचि दिसे। तें दुजेनवीण जैसें। भोगिजे कां॥ ११४१॥**

**अर्थ**—किंवा जागे झाल्यावर स्वप्न नाहीसे होते आणि मग आपले ऐक्यच दिसू लागते. ते एकटेपण ज्याप्रमाणे दुसऱ्या शिवाय तो आपणच आपले भोगतो॥ ११४१॥

**तोचि जालिया भोग तयाचा। न घडे हा भावो जयांचा। तिहीं बोलें केवीं बोलाचा। उच्चारु कीजे॥ ११४२॥**

**अर्थ**—वस्तूशी एकरूप झाल्यावर वस्तूचा भोग घडत नाही असे जे म्हणतात ते, शब्दाने शब्दाचाच उच्चार कसे करतात?॥ ११४२॥

**गूढार्थदीपिका—ओवी क्रमांक ११४२**

अद्वैत ज्ञानस्वरूप झाल्यावरही ज्ञानीभक्त अशा अद्वैत अवस्थेत भक्ती म्हणजे परमप्रेम कसे करू शकतो याचे सोपपत्तिक विवेचन ११३७ ते ११५१ या ओव्यातून माउलीने केले आहे.

ज्ञानी भक्ताच्या ठिकाणी वृत्ति स्फुरण होतच राहते. स्फुरणरूप ज्ञानी व त्याला आधाररूप ब्रह्म अशा तऱ्हेचा पाणी व तरंगाप्रमाणे दोनपणाचा भास राहतो. ज्ञानाने त्याच्या अहंतेचा विषय त्याला आधाररूप ब्रह्म ज्याप्रमाणे असते त्याचप्रमाणे त्याच्या ममतेचा विषयही तेच आधाररूप ब्रह्म होत असते. आपल्या ममतेचा म्हणजेच प्रीतीचा विषय तो जेव्हा आपल्या आधाररूप परब्रह्माला करतो तेव्हा तेच परब्रह्म-तेही परमप्रेमास्पद असल्याकारणाने-ह्या ज्ञानी भक्ताच्या प्रेमाने उचंबळून येते आणि सगुण व साकार होते. अशा सगुण साकार स्वरूपाच्या ठिकाणी अंत:करणात तो ज्याप्रमाणे सर्वस्वाने प्रेम करतो. त्याचप्रमाणे हेच सगुणब्रह्म बाहेरही नामरूपाने नटलेले आहे असे समजून तिकडेही तो आपल्या प्रीतीचा प्रवाह वळवतो. त्याच्यादृष्टीने आत बाहेर एका सगुण भगवंताशिवाय दुसरी वस्तूच रहात नाही. त्यामुळे भक्तिरहित ज्ञान्याला बाहेर नामरूपांनी भासणाऱ्या दृश्याच्या ठिकाणी जसा मिथ्यात्वाचा प्रत्यय

येतो तसा या ज्ञानीभक्ताला येत नाही. त्याला आत बाहेर एकरसात्मक ब्रह्माचाच प्रत्यय येतो.

सामान्य माणसाला या अद्वैत दशेतील प्रेमाची कल्पना येण्याकरता माउलीने या ओव्यातून अनेक दृष्टान्त दिलेले आहेत. शब्दानेच 'शब्दा'चा उच्चार जसा केला जातो तसाच हा प्रकार आहे. पण शेवटी मात्र हे केवळ अनुभवानेच कळण्यासारखे आहे, बोलण्यासारखे नाही असे म्हणून ही स्थिती वाचेच्या पलीकडील आहे असे माउलीने पुढे 'हे अनुभवाचिजोगें नव्हे। बोला ऐसे' (ओ० ११५१) या ओवीने दाखविले आहे.

**तयांच्या नेणों गांवीं। रवी प्रकाशी हन दिवी। कीं व्योमालागीं मांडवी। उभिली तिहीं॥ ११४३॥**

**अर्थ**—आणि त्यांच्या गावात दिव्याकडून सूर्य प्रकाशला जात असेल तर नकळे! अथवा त्यांनी आकाशाला (आत) घेण्याकरता मांडव उभारला आहे की काय कळत नाही॥ ११४३॥

**हां गा राजन्यत्व नव्हतां आंगीं। रावो रायपण काय भोगी। कां आंधारु हन आलिंगी। दिनकरातें॥ ११४४॥**

**अर्थ**—आंगी क्षत्रियत्व नसता राजा राजेपण काय भोगणार! किंवा अंध:कार (अंधकाररूप राहून) सूर्याला कधी मिठी मारील काय?॥ ११४४॥

**आणि आकाश जें नव्हें। तया आकाश काय जाणवे। रत्नाच्या रूपीं मिरवे। गुंजांचें लेणें॥ ११४५॥**

**अर्थ**—आणि जे आकाशच नाही, त्याला आकाश कसे कळणार! गुंजाचा दागिना रत्नांचा दागिना म्हणून मिरवण्यासारखेच आहे॥ ११४५॥

**म्हणौनि मी होणें नाहीं। तया मीचि आहें केहीं। मग भजेल हें कायी। बोलों कीर॥ ११४६॥**

**अर्थ**—म्हणून जो मत्स्वरूप झाला नाही, त्याला मीच कोठे आहे? तो माझी मग भक्ती ती काय करील! हे बोलायलाच नको!॥ ११४६॥

**गूढार्थदीपिका—ओवी ११४६**

आत्मस्वरूपाची प्राप्ती करून घेतल्याशिवाय अखंड आत्मसुखाची आपली तळमळ शांत होणे शक्य नाही. ही जाणीव ज्याच्या ठिकाणी आत्मानात्म विवेक व मुमुक्षुत्व आहे अशाच्याच ठिकाणी होणार. इतरांच्या ठिकाणी विवेकालाच स्थान नसल्याकारणाने आत्मस्वरूपाचा विचारच तो करूं शकत नाही. त्याच्या विचारप्रणालीत परमेश्वर व त्याची प्राप्ती या दोघांनाही स्थान नाही. त्यामुळे परमेश्वरस्वरूप होऊन त्याची भक्ती करण्याचा प्रश्नच त्यांच्या मनात उत्पन्न होणे शक्य नाही.

जे लोक परमेश्वर व जीव यांचा भेद नित्य आहे असे मानतात त्यांच्या दृष्टीने परमेश्वर व जीव यांचे बिंब व प्रतिबिंब यांच्याप्रमाणे स्वरूप नसल्यामुळे प्रतिबिंब नाहीसे झाल्यावर बिंबात विलीन झाल्यावर जशी ऐक्याची स्थिती होते तशी ऐक्याची स्थिती त्यांच्या मनात संभवत नाही. त्यामुळे या अद्वैत दशेत येणाऱ्या आत्मानंदाच्या अनुभूतीची कल्पनाही ते करूं शकत नाहीत.

परमेश्वर व जीव यांच्यात द्वैत आहे व तेही नित्य आहे असे मानल्यास त्यांच्या सत्ता पृथक किंवा विभिन्न मानाव्या लागतात. विभिन्न सत्ता मानल्याबरोबर मर्यादितपणा परमेश्वरावरही येऊं पहातो. व मर्यादितपणामुळे इतर वैषयिक पदार्थांप्रमाणे तोही नाशिवंत ठरू पहातो. त्याचे अस्तित्वच अशा रीतीने नाशिवंत ठरल्यास त्याची प्राप्ती व तत्स्वरूप होणे ह्या दोन्ही गोष्टी द्वैतमतात संभवत नाही. द्वैताशिवाय प्रेमाची कल्पना त्यांच्या मतात संभवत नसल्यामुळे अद्वैत अवस्थेत भक्ती करण्याची कल्पनाच त्यांना करता येऊ शकत नाही.

माउलीच्या मताने अद्वैतज्ञानाशिवाय परमेश्वराची प्राप्ती नाही व परमप्रेम किंवा पराभक्तीही संभवतच नाही.

**यालागीं तो कर्मयोगी। मी जालाचि मातें भोगी। तारुण्य कां तरुणांगीं। जियापरी॥ ११४७॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे तरुण स्त्रीच्या ठिकाणी तारुण्य असते (ती त्याचा भोग घेते) त्याप्रमाणे कर्मयोगी मत्स्वरूप होऊन मला भोगतो॥ ११४७॥

**तरंग सर्वांगीं तोय चुंबी। प्रभा सर्वत्र विलसे बिंबीं। नाना अवकाश नभीं। लुंठतु जैसा॥ ११४८॥**

**अर्थ**—जसा तरंग सर्वांगाने पाण्याचे चुंबन घेतो किंवा प्रकाश बिंबाच्या ठिकाणी सर्वत्र व्यापून राहतो किंवा पोकळी आकाशात सर्वत्र भरून राहते॥ ११४८॥

**तैसा रूप होऊनि माझें। मातें क्रियावीण तो भजे। अलंकारु का सहजें। सोनयातें जेवीं॥ ११४९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे सोने स्वाभाविकपणे लगडपणाने असते. त्याप्रमाणे तो कर्मयोगी मत्स्वरूप होऊन कोणतीही क्रिया न घडता मला भजत असतो॥ ११४९॥

**गूढार्थदीपिका—ओवी ११४९**

११३८ ते ११४९ पर्यंतच्या ओव्यातून माउलीने ज्ञानोत्तर भक्तीचे स्वरूप वर्णन केले आहे.

वेदान्तात व भक्तिशास्त्रांत श्रद्धा आणि प्रेम हे पर्यायवाची शब्द आहेत. "श्रद्धया परयोपेत:" या गीतेच्या १२व्या अध्यायातील श्लोकावर टीका करताना "तैसी नित नवी भजता। श्रद्धा दिसे" "परी ठाकिलिया सागर। जैसा मागिलहि यावा अनिवार। तिये गंगेचिया ऐसा पडिभर। प्रेमभावा॥" या ओव्यातून श्रद्धा शब्दाचा अर्थ प्रेम माउलीने केला आहे. जे प्रेम नित्य नवेच राहते, शिळे कधी होतच नाही—म्हणजे भगवंताच्या सेवेत, नामस्मरणांत किंवा कोणत्याही कामात कधीही कंटाळा किंवा आता पुरे झाले असे वाटत नाही, त्याला श्रद्धा, परमप्रेम किंवा नित्य नवी श्रद्धा म्हणतात. या प्रेमात मनाला एक सारखा अखंड उल्हास असतो. हीच पराभक्ती होय.

माउली या ओव्यातून ज्ञानोत्तर अशा ऐक्य स्थितींतही सगुणसाकार भगवंताचे प्रेम कसे रहाते हे सांगत आहे.

व्यक्तिरेक ज्ञानाने नामरूपा विषयी जी उदासीन बुद्धी उत्पन्न होते ती, अन्वय ज्ञानाने नामरूपेहीं पूर्णब्रह्म आहेत असा अनुभव येऊन नि:शेष नाहीशी झाली की नामरूपासह असलेला परमात्माही निरुपाधिकच ठरतो. म्हणून त्याच्या नामरूपासह त्याच्यावर आत्मप्रेम जडते व त्या परमात्म्याच्या ठिकाणी **स्वामी सेवक** भावाने प्रेम करावेसे वाटते. हीच गोष्ट माउलीनी "ही ज्ञान निष्ठा जेथ हात वसे। तेथ भक्ती माझी उल्हसे" या ओवीतही पुढे सांगितली आहे. ज्ञाननिष्ठा म्हणजे बुद्धीची चिन्मात्र स्थिती झाली असताच ही पराभक्ती होते असे माउली म्हणते ही पराभक्ती ज्यांनी ज्ञाननिष्ठा संपादन केली आहे अशा पुरुषाच्या ठिकाणी अनुभवाने सिद्ध होत असल्यामुळे ती नुसत्या बोलण्याचा विषय नाही.

**का चंदनाची द्रुती जैसी। चंदनीं भजे अपैसी। का अकृत्रिम शशीं। चंद्रिका ते॥ ११५०॥**

**अर्थ**—अथवा चंदनाचा सुवास जसा चंदनाला आपोआप भजतो किंवा चांदणे जसे निसर्गत: चंद्राला भजते॥ ११५०॥

**तैसी क्रिया कीर न साहे। परी अद्वैतीं भक्ति आहे। हें अनुभवाचिजोगें नव्हे। बोलाऐसें॥ ११५१॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे (अद्वैतात) क्रिया करणे खरोखर जरी संभवत नाही, तर देखील अद्वैतात भक्ती राहत असते. हे अनुभवानेच कळण्यासारखे आहे, बोलण्या सारखे नाही॥ ११५१॥

**गूढार्थदीपिका—तैसी क्रिया कीर न साहे। परी अद्वैती भक्ती आहे।**

अद्वैत ज्ञानाने ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ही त्रिपुटी नाहीशी होत असल्याकारणाने ज्या अद्वैतज्ञान दशेत कोणत्याही प्रकारची क्रिया होणे संभवत नाही. पण त्याही दशेत परमप्रेमरूपा भक्ती मात्र रहाते हे खरे आहे. ही अद्वैतदशेत होणारी भक्ती अनुभव घेण्याची गोष्ट आहे, ती शब्दाने व्यक्त करण्या जोगी नाही.

अद्वैतज्ञान झालेल्या ज्ञान्याच्या ठिकाणी मिथ्या देहाभास व जगदाभास प्रारब्धामुळे रहात असतात; म्हणून ज्ञानाने मनोनाश व वासनाक्षय यांचा सतत अभ्यास चालू ठेवावा, असे वेदान्त म्हणतो. याच दशेला 'जीवन्मुक्त दशा' असे म्हणतात. प्रारब्ध संपून देहपात झाल्यावर अर्थातच देहाभास किंवा जगदाभास यांचा प्रश्न उपस्थित होत नाही व म्हणून तो ज्ञानी पूर्णमुक्त होतो. ह्याच दशेला विदेहमुक्ती असे वेदान्त म्हणतो. जीवन्मुक्ती व विदेहमुक्तीतील हा फरक केवळ देहाचा व जगताचा मिथ्याभास यावर अवलंबून आहे.

ज्ञानोत्तर सगुण भगवंताच्या ठिकाणी होणाऱ्या पराभक्तीमुळे ज्ञानी भक्तांच्या ठिकाणी कोणत्याच प्रकारची जाणीव शिल्लक रहात नसल्यामुळे देहाचा व जगताचा मिथ्याभासही त्यांचा पूर्णपणे निवृत झालेला असतो. हीच स्थिती त्यामुळेच विदेहमुक्तितुल्य रहात असल्यामुळे ज्ञानीभक्तांना जीवन्मुक्तीतच विदेहमुक्तीचा अनुभव येतो. त्यांच्या दृष्टीने जीवन्मुक्ती व विदेहमुक्ती हा फरकच रहात नाही. सगुण भगवंताच्या परमप्रेमांत तल्लीन झालेल्या या ज्ञानी भक्तांना सर्वनामरूपासह एक भगवान्‌च अनुभवाला येतो व हीच एक रसात्मक ब्रह्मस्थिती आहे. अद्वैत ज्ञानानंतर पराभक्तीने येणारा आपला अनुभव सांगतांना श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात की आम्हां भक्तांना भोग म्हणजे इष्ट परमानंद व मोक्ष म्हणजे विदेहमुक्ती या दोहों करता तुझ्या सगुण साकार मूर्तीवाचून दुसरे काहीही लागत नाही. म्हणूनच आता तुझ्या विश्वरूपाचा उपसंहार कर व सगुण श्रीकृष्णरूपाने प्रगट हो.

**आम्हां भोगमोक्षांचिया ठायीं। श्रीमूर्तीवांचूनि नाहीं।**
**म्हणौनी तैसाचि साकार होई। हे उपसंहारी आता॥**

(ज्ञानेश्वरी अ० ११-१६०८)

श्रीगुलाबराव महाराजांनी ज्ञानोत्तर भगवद्‌भक्तीने येणाऱ्या या अनुभवाचे वर्णन करताना म्हटले आहे की एकदा खाल्लेले अन्न वारंवार सेवन केले तरच त्या पदार्थांचे प्रेम अवीट होते. ब्रह्मानंद अवीट आहे असे सांगितले आहे. पण भक्तीवाचून दुसऱ्या मार्गाने त्या ब्रह्मानंदाचे सेवन होत नसल्यामुळे भक्तीवाचून, केवळ ज्ञानाने, ब्रह्मानंदाचा अवीटपणा अनुभवाला येत नाही.

**अहो जेवलेचि जेवावे। तैसे सेविलेंचि सेवावे।**
**तरीच ते स्वभावे। अविट होईल॥**
**ब्रह्मानंद अविट पूर्ण। त्याची कैसी काय खूण।**
**तें न कळेचि भक्तिवीण। न घडे सेवन पुनः पुनः॥**

[श्री गुलाबराव महाराजकृत भगवद्भक्ति सौरभ, पराग ८ श्लोक २९-३० व बाबाजी पंडीतांची त्यावरील भावार्थ प्रकाशिका]

**तेव्हां पूर्वसंस्कारछंदें। जें कांहीं तो अनुवादे। तेणें आळविलेनि वो दें। बोलतां मीचि॥ ११५२॥**

तेव्हां पूर्वीच्या संस्कारांमुळे तो जे काही बोलतो, ते बोलणेच माझी भक्ती होते व त्या आळवणीला साद देऊन मी वो देतो आणि बोलणारा मीच असतो॥ ११५२॥

**बोलतया बोलताचि भेटे। तेथें बोलिलें हें न घटे। तें मौन तंव गोमटें। स्तवन माझें॥ ११५३॥**

**अर्थ**—बोलणाऱ्याला बोलणाराच स्वतः भेटला, तर बोलणे होण्याचाच संभव नाही. तेव्हा मौन हेच उत्तम स्तवन होय.॥ ११५३॥

**म्हणौनि तया बोलतां। बोली बोलतां मी भेटतां। मौन होय तेणें तत्त्वतां। स्तवी तो मातें॥ ११५४॥**

**अर्थ**—म्हणून तो बोलत असताना त्याच्या बोलण्यात बोलणारा जो मी तो भेटत असल्या कारणाने ते त्याचे बोलणे मौनच होय. त्या मौनाने तत्त्वतः तो माझे स्तवन करतो.॥ ११५४॥

**तैसेंचि बुद्धी का दिठी। जें तो देखों जाय किरीटी। तें देखणें दृश्य लोटी। देखतेंचि दावी॥ ११५५॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे अर्जुना, बुद्धीने अथवा डोळ्याने तो जे पहावयास जातो, त्याचे ते पाहणे, दृश्याला नाहीसे करून द्रष्ट्यालाच दाखविते॥ ११५५॥

**आरिसया आधीं जैसें। देखतेंचि मुख दिसे। तयाचें देखणें तैसें। मेळवी द्रष्टें॥ ११५६॥**

**अर्थ**—आरशात पहाण्यापूर्वी जसे मुख होते तसेच ते आरशात पहातानाच दिसते, त्याप्रमाणे त्याच्या पहाण्यात द्रष्ट्याचेच दर्शन होते॥ ११५६॥

**दृश्य जाउनियां द्रष्टें। द्रष्ट्यासीचि जैं भेटे। तैं एकलेपणें न घटे। द्रष्टेपणही॥ ११५७॥**

**अर्थ**—जेव्हा दृश्याच्या कल्पनेचा निरास होऊन द्रष्टा द्रष्ट्यालाच भेटतो, तेव्हां द्रष्टाच एकमेव रहात असल्याकारणाने द्रष्टेपणही नाहीसे होते॥ ११५७॥

**तेथ स्वप्नींचिया प्रिया। चेवोनि झोंबों गेलिया। ठायिजे दोन्ही न होनियां। आपणचि जैसें॥ ११५८॥**

**अर्थ**—जाग आल्यावर स्वप्नातील प्रियेला आलिंगन देण्याला गेलेला पुरुष ज्याप्रमाणे स्त्री व पुरुष दोन्हीही (स्वप्नातील) नाहीसे झाल्यामुळे तो एकटाच केवळ राहतो॥ ११५८॥

**का दोहीं काष्टांचिये घृष्टी-। माजीं वन्हि एक उठी। तो दोन्हीं हे भाष आटी। आपणचि होय॥ ११५९॥**

**अर्थ**—किंवा दोन लाकडांच्या घर्षणातून एकच अग्नी निर्माण होतो व 'दोन लाकडे' ही भाषा संपून तोच केवळ एक राहतो.॥ ११५९॥

**नाना प्रतिबिंब हातीं। घेऊं गेलिया गभस्ती। बिंबताही असती। जाय जैसी॥ ११६०॥**

**अर्थ**—किंवा सूर्य आपले प्रतिबिंब हातात धरायला गेला असता (प्रतिबिंबा बरोबरच तत्सापेक्ष) बिंबताही ज्याप्रमाणे नाहीशी होते॥ ११६०॥

**तैसा मी होऊनि देखतें। तो घेऊ जाय दृश्यातें। तेथ दृश्य ने तिथें। द्रष्टृत्वेंसीं॥ ११६१॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे तो मत्स्वरूप द्रष्टा होऊन जेव्हा दृश्याला घेऊं पहातो, तेव्हा द्रष्टेपणाही दृश्यासह नाहीसा होतो॥ ११६१॥

**रवि आंधारु प्रकाशिता। नुरेचि जेवीं प्रकाश्यता। तेवीं दृश्यीं नाहीं द्रष्टृता। मी जालिया॥ ११६२॥**

**अर्थ**—सूर्य काळोखाला प्रकाशित करू लागला म्हणजे ज्याप्रमाणे प्रकाश्य जो आंधार तो उरत नाही (केवळ प्रकाशच राहतो) त्याप्रमाणे मत्स्वरूप झाले म्हणजे दृश्याच्या ठिकाणी (तोच असल्यामुळे तत्सापेक्ष) द्रष्टृपणही रहात नाही॥ ११६२॥

**मग देखिजे ना न देखिजे। ऐसी जे दशा निपजे। ते तें दर्शन माझें। साचोकारें॥ ११६३॥**

**अर्थ**—मग पाहणेही नाही किंवा न पाहणेही नाही अशी जी दशा उत्पन्न होते तेच माझे यथार्थ दर्शन होय॥ ११६३॥

**तें भलतयाही किरीटी। पदार्थाचिया भेटी। दृष्ट्दृश्यातीता दृष्टी। भोगी तो सदा॥ ११६४॥**

**अर्थ**—अर्जुना, कोणताही पदार्थ पहात असता तो द्रष्टा व दृश्य या भावरहित दृष्टीने त्यांचा अनुभव घेत असतो॥ ११६४॥

**आणि आकाश हें आकाशें। दाटलें न ढळें जैसें। मिया आत्मेन आपणपें तैसें। जालें तया॥ ११६५॥**

**अर्थ**—आणि आकाशानेच संपूर्ण आकाश घनदाट भरून गेले असल्यामुळे ते किंचित् देखील ज्याप्रमाणे हालत नाही, त्याप्रमाणे माझ्या आत्मस्वरूपाशी तो एकरूप झाला असल्यामुळे त्याला आपल्या ठिकाणी तसाच घनदाट आत्मस्वरूपाचा प्रत्यय येतो॥ ११६५॥

**कल्पांतीं उदक उदकें। रुंधिलिया वाहों ठाके। तैसा आत्मेनि मियां येकें। कोंदला तो॥ ११६६॥**

**अर्थ**—कल्पाच्या शेवटी (प्रलयाच्यावेळी) पाण्यानेच पाणी रोखले गेल्यामुळे पाण्याचे वाहणे बंद होते, त्याप्रमाणे माझ्या एका आत्मस्वरूपानेच तो संपूर्णपणे भरून जातो॥ ११६६॥

**पावो आपणपयां वळघे। केवीं वन्हि आपणपयां लागे। आपणपां पाणी रिघे। स्नाना कैसें॥ ११६७॥**

**अर्थ**—पाय आपल्यावरच कसा चढेल? विस्तव स्वत:लाच कसा जाळील? पाणी स्वत:च्याच स्नानाला कसे उपयोगी येईल?॥ ११६७॥

**म्हणोनि सर्व मी जालेपणें। ठेलें तया येणेंजाणें। तेचि गा यात्रा करणें। अद्वया मज॥ ११६८॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना, तोच सर्वत्र मीच झाल्याकारणाने त्याचे येणे जाणे थांबते. मी जो अद्वयस्वरूप त्या माझी हीच यात्रा आहे॥ ११६८॥

**पैं जळावरील तरंगु। जरी धांविन्नला सवेगु। तरी नाहीं भूमिभागु। क्रमिला तेणें॥ ११६९॥**

**अर्थ**—पाण्यावरील लाट जरी वेगाने उसळून धावली तरी तिच्याकडून जमीनीचा भाग आक्रमिला जात नाही.॥ ११६९॥

**जें सांडावें कां मांडावें। जें चालणें जेणें चालावें। तें तोयचि एक आघवें। म्हणोनियां॥ ११७०॥**

**अर्थ**—त्या लाटेला जे ठिकाण टाकून द्यावयाचे किंवा ज्या ठिकाणी तिला जावयाचे, तिचे जे चालणे किंवा ज्याने चालावयाचे ते संपूर्ण एक पाणीच असते म्हणून॥ ११७०॥

**गेलियाही भलतेउता। उदकपणें पांडुसुता। तरंगाची एकात्मता। न मोडेचि जेवीं॥ ११७१॥**

**अर्थ**—अर्जुना, ती लाट वाटेल तिकडे गेली तरी पाणीपणामुळे लाटेची पाण्याशी जी एकरूपता आहे ती ज्याप्रमाणे अजिबात ढळत नाही॥ ११७१॥

**तैसा मीपणें हा लोटला। तो आघवेंयाचि मज आतुं आला। या यात्रा होय भला। कापडी माझा॥ ११७२॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे मीपणाने (अहंब्रह्मास्मिरूपाने) हा पूर्णपणे भरलेला असता (हा मीपणाने 'अहंब्रह्मास्मि वृत्तीने उचंबळत असला तरी) तो सर्वस्वाने मत्स्वरूप झालेला असतो. या यात्रेमुळे तो चांगल्या प्रकारे माझा यात्रेकरू होतो॥ ११७२॥

**आणि शरीरस्वभाववशें। कांहीं येक करूं जरी बैसे। तरी मीचि तो तेणें मिषें। भेटें तया॥ ११७३॥**

**अर्थ**—आणि शरीराच्या स्वभावधर्मानुसार तो जे जे काही करू लागतो, (त्या सर्व व्यवहारात) ते ते सर्व मीच असल्यामुळे त्या त्या रूपाने मीच त्याला भेटत असतो॥ ११७३॥

**गूढार्थदीपिका—तरी मीचि तो तेणें मिषें। भेटे तया।**

ज्ञानी भक्ताचे प्रारब्धानुसार जे विषयांचे सेवन होते व जी इंद्रियांची प्रवृत्ती होते त्याचा उलगडा या ओवीत ज्ञानेश्वर महाराजांनी केला आहे.

अज्ञानी लोकांना ज्ञानीपुरुष विषय सेवन करतो असे दिसत असले तरी त्या ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणी त्याचे काहीच ज्ञान नसते. कारण भोक्ता भोग्य किंवा द्रष्टा दृश्य असे तो दोघांचे दोन पण पहात नसून भोग्याच्याठिकाणी व दृश्याच्या ठिकाणी तो आपल्या स्वतःलाच पहात असतो. त्यामुळे त्याच्या वृत्तीत आपण काही भोगले किंवा आपण काही पाहिले अशी जाणीवच उत्पन्न होत नाही. म्हणून ज्ञान्याची सर्व इंद्रियप्रवृत्ती विषय रहित असते.

'उत्तम भक्त विषय सेविती। हा बोल वाढला प्राकृताप्रति। त्यासी विषयी नाही विषयस्फूर्ति। त्यागिति भोगिती दोन्ही मिथ्या॥' (एक० भाग० अ० २) "मुक्तिमाजी विशेषु कायी। वृत्ति निर्विकल्प असे पाही। भक्तांच्या सर्व कर्मांचे ठायीं। स्फुरण नाही विषयांचे" (ए० भा० अ० ११) असे नाथांनी ज्ञान्यांच्या व्यवहाराविषयी म्हटले आहे.

अमृतानुभवाच्या नवव्या प्रकरणात माउली म्हणते. "विषयाचे नाव समजल्याबरोबर इंद्रिय-समुदाय आपापल्या विषयाकडे समोर धाव घेत असला तरी ज्याप्रमाणे दृष्टिसमोर आरसा आल्याबरोबर दृष्टि दृष्टीलाच पहाते किंवा एका दृष्टीलाच बोध होतो त्याप्रमाणे ज्ञानी भक्त पुरुषाच्या वृत्तीच्या स्फुरणाची स्थिती होते."

**म्हणोनि विषयांचेनि नावे। सुनीं इंद्रियाचे थवे। सैंघ घेती धावे। समोरही॥ ९॥**
**परी आरसा शिवे शिवे। तव दिठीसी दिठी फावे। तैसे झाले धावे। वृत्तीचिया॥ १०॥**

अज्ञान्याला त्याच्या अज्ञानामुळे ज्ञान्याच्या ठिकाणी व्यापार होत असताना दिसतो, ज्ञान्याला मात्र त्याचे अजिबात ज्ञान नसते हा भाव. लहरीचे व पाण्याचे जसे ऐक्य असते तसेच परमात्म्याचे व मी या वृत्तीचे ऐक्य आहे. हे ऐक्यज्ञान आपण विसरल्यामुळे मी म्हणजे आपण कोणी आहोत असे आपल्याला वाटते व आपण आपल्याला परमेश्वराहून निराळे समजू लागतो. ह्या विस्मृतिमुळेच सर्व नामरूपात स्फुरणारे मीपण आपण निरनिराळे समजून त्यांना निरनिराळे स्वतंत्र पदार्थ समजू लागलो अशा रीतीने भेदभावना आपल्याठिकाणी निर्माण झाली. या भेदभावनेला किंवा भेदज्ञानालाच जगत् हे नाव आहे, विसरणाऱ्या मीपणाला जीव ही संज्ञा आहे.

ज्ञानीभक्ताच्या दृष्टिकोनातून विचार करता ज्याप्रमाणे लहरी पाण्याला सोडून देऊन उठूं शकत नाही ती पाणी घेऊनच उठते, त्याप्रमाणे 'मी' वृत्ती देखील ज्ञानरूप शिवाला किंवा परमात्म्याला सोडून उठू शकत नाही. ती ज्ञानरूप शिवासहच स्फुरते म्हणून 'मी' वृत्तिरूप शक्तीचे व ज्ञानरूप शिवाचे स्वाभाविकच ऐक्य आहे या स्वाभाविक ऐक्यामुळेच 'मी' वृत्तीत ज्ञानरूप परमात्माच भरलेला आहे.

**तेथ कर्म आणि कर्ता। हें जाऊनि पांडुसुता। मीयां आत्मेनि मज पाहतां। मीचि होय॥ ११७४॥**

**अर्थ**—तेव्हा अर्जुना! कर्म आणि कर्ता हे दोन्ही भाव जाऊन तो मला आत्मत्वाने पाहात असल्यामुळे मत्स्वरूपच होतो.॥ ११७४॥

**पैं दर्पणातें दर्पणें। पाहिलिया होय न पाहणें। सोनें झांकिलिया सुवर्णें। न झांके जेवीं॥ ११७५॥**

**अर्थ**—आरशाने आरशालाच पाहिले तर न पाहिल्यासारखेच होते. सोन्याने सोने झांकले तर ते जसे झाकले जात नाही॥ ११७५॥

**दीपातें दीपें प्रकाशिजे। तें न प्रकाशणेंचि निपजे। तैसें कर्म मियां कीजे। तें करणें कैंचें॥ ११७६॥**

**अर्थ**—दिव्याने दिव्यालाच प्रकाशित केले तर ते न प्रकाशणेच होते. त्याप्रमाणे मद्रूप होऊन केलेले कर्म ते कर्म कसले?॥ ११७६॥

**कर्मही करितचि आहे। जैं करावें हें भाषचि जाये। तैं न करणेंचि होये। तयाचें केलें॥ ११७७॥**

**अर्थ**—कर्म तर करीतच असतो, पण ते केले पाहिजे ही भाषा जेव्हा नाहीशी होते, तेव्हा त्याने केलेले कर्मच हे कर्म न केल्यासारखे होते॥ ११७७॥

**क्रियाजात मी जालेपणें। घडे कांहींचि न करणें। तयाचि नांव पूजणें। खुणेचें माझें॥ ११७८॥**

**अर्थ**—यच्चयावत् कर्म मद्रूपच होत असल्याकारणाने काही एक न घडल्याप्रमाणे होते. तेच माझे खरोखर पूजन होय॥ ११७८॥

**म्हणौनि करीतयाही वोजा। तें न करणें हेंचि कपिध्वजा। निफजे तिया महापूजा। पूजी तो मातें॥ ११७९॥**

**अर्थ**—म्हणून हे अर्जुना, तो करतो त्या पद्धतीने ते त्याचे करणेच न करणे होते व त्याच महापूजेने तो माझी पूजा बांधतो॥ ११७९॥

**एवं तो बोले तें स्तवन। तो देखे तें दर्शन। अद्वया मज गमन। तो चाले तेंचि॥ ११८०॥**

**अर्थ**—अशा रितीने तो जे बोलेल ते माझे स्तवनच होते. तो जे पाहिल ते माझे दर्शन होते. तो चालेल तेच अद्वयस्वरूप अशा माझ्याकडे त्याचे येणे होते॥ ११८०॥

**तो करी तेतुली पूजा। तो कल्पी तो जपु माझा। तो असे तेंचि कपिध्वजा। समाधी माझी॥ ११८१॥**

**अर्थ**—अर्जुना, तो जे जे करतो, ती तो सारी माझी पूजा, तो जी जी कल्पना करील तो तो माझा जप आणि तो निजतो तीच माझी समाधी॥ ११८१॥

**जैसें कनकेंसीं कांकणें। असिजे अनन्यपणें। तो भक्तियोगें येणें। मजसीं तैसा॥ ११८२॥**

**अर्थ**—अलंकाराची सोन्याची ज्याप्रमाणे एकरूपता असते त्याप्रमाणे भक्तीच्या योगाने तो माझ्याशी एकरूप झालेला असतो॥ ११८२॥

**उदकीं कल्लोळु। कापुरीं परिमळु। रत्नीं उजाळु। अनन्यु जैसा॥ ११८३॥**
**किंबहुना तंतूसी पटु। कां मृत्तिकेसीं घटु। तैसा तो एकवटु। मजसीं माझा॥ ११८४॥**

**अर्थ**—पाण्याशी लाटेची, कापराशी सुवासाची किंवा रत्नाशी तेजाची अभिन्नता असते॥ ११८३॥ किंबहुना सूताशी वस्त्राचे किंवा मातीशी घड्याचे जसे तादात्म्य असते, त्याप्रमाणे तो (माझा भक्त) माझ्याशी एकरूप असतो॥ ११८४॥

**इया अनन्यसिद्धा भक्ती। या आघवाचि दृश्यजातीं। मज आपणपेंया सुमती। द्रष्ट्याते जाणें॥ ११८५॥**

**अर्थ**—हे सुमते, या स्वयंसिद्ध अनन्यरूप भक्तीच्या योगाने हे सर्व जे जे दिसणारे आहे ते ते सर्व तो मला द्रष्ट्याला आत्मत्वाने पहातो॥ ११८५॥

**तिन्ही अवस्थांचेनि द्वारें। उपाध्युपहिताकारें। भावाभावरूप स्फुरे। दृश्य जें हें॥ ११८६॥**

**अर्थ**—जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्थांच्या द्वाराने, स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन देहरूप उपाधींच्या रूपाने व विश्व, तैजस आणि प्राज्ञ या उपहिताच्या आकाराने जे भाव व अभावरूप दृश्य स्फुरण पावते॥ ११८६॥

**तें हें आघवेंचि मी द्रष्टा। ऐसिया बोधाचा माजिवटा। अनुभवाचा सुभटा। धेंडा तो नाचे॥ ११८७॥**

**अर्थ**—हे शूरश्रेष्ठा, हे जे सर्व दृश्य आहे ते द्रष्टृस्वरूप असलेल्या माझेच स्वरूप आहे अशा ज्ञानाच्या धुंदीत तो ऐक्यानुभावाचा झेंडा नाचवीत असतो.॥ ११८७॥

**गूढार्थदीपिका—ओवी ११८६-८७**

या पूर्वीच्या व या नंतरच्या ओव्यांतून माउलीनी अज्ञानाचा नाश होऊन ज्ञानाने ऐक्याची जी जाणीव निर्माण होते ती कशी होते हे समजवून सांगत असतांना सुवर्ण व अलंकार, पाणी व त्यावरील लाटा, कापूर आणि सुगंध, रत्न व त्याची कांती, तंतु व पट, माती व घट इत्यादी तादात्म्य संबंध दर्शविणारे दृष्टान्त दिले आहेत. त्याचप्रमाणे दोरी व साप किंवा स्वप्न व जागृती यांचेही दृष्टान्त दिले आहेत. (ओ०, ८२ ते ८५ व ओ० ८८ ते ९१)

शांकर वेदान्तात हे सर्व दृष्टान्त विवर्तवादाचे आहेत. विवर्ताची व्याख्या ''अतत्त्वोऽन्यथाप्रथा विवर्त इत्युदीरीत:'' ''पूर्वायस्थामपरित्यज्यैवावस्थान्तरभानं विवर्त:'' अशा तऱ्हेने केलेली आहे. कारणावस्था नाहिशी न होता मूळ वस्तू थोड्या निराळ्या फरकाने भासणे असा त्याचा अर्थ आहे, यात निराळ्या तऱ्हेने भासणाऱ्या म्हणून विवर्त असलेल्याची सत्ता मूळ वस्तूचीच सत्ता असते. ज्याला वेदान्तात 'अधिष्ठान' असा पारिभाषिक शब्द वापरतात. श्रीज्ञानेश्वर महाराजांनी या विवर्तालाच अनेक ठिकाणी स्फुरण किंवा स्फुर्ती हा शब्द वापरला आहे.

स्फुरण व आधार म्हणजे ज्यावर ते स्फुरते ते अधिष्ठान यांचाही संबंध विवर्त व अधिष्ठानाप्रमाणेच आहे. कारण स्फुरणाचीही सत्ता आधाराचीच किंवा अधिष्ठानाचीच असते. पाणी व तरंग आणि दोरी व साप हे दोन्ही दृष्टान्त विवर्ताचेच असले तरी त्यात थोडा फरक आहे तो आपण या ठिकाणी लक्षात ठेवायला पाहिजे. पाणी व तरंग किंवा तंतु व पट किंवा माती व घडा यात मूळ कारणरूप अधिष्ठानाचे ज्ञान लोपवून तरंग, पट किंवा घडा यांचे ज्ञान आपणाला होत नाही नव्हे, मूळ कारणाचे ज्ञान कायम राहून या भासांचे आपणाला ज्ञान होते. म्हणून हा विवर्त असला तरी ज्ञानपूर्वक विवर्त आहे.

यालाच मधुराद्वैताचार्य श्रीगुलाबराव महाराजांनी अनध्यस्त म्हणजे ज्यात अध्यास किंवा अज्ञान नाही असा विवर्त असे नाव दिले आहे. याच्या उलट रज्जुसर्प किंवा स्वप्न जागृती या उदाहरणांत अधिष्ठानाचे ज्ञान लोपवून भास किंवा विवर्ताचे ज्ञान होते. त्यामुळे हा अज्ञानयुक्त किंवा अध्यस्त विवर्त आहे.

जागृति, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थांच्या द्वारा उपाधी व उपहित यांच्या रूपाने जेवढे काही भावाभाव स्फुरतात ते सर्व दृश्यभावाभाव म्हणजे (नाशिवंत, जड व दु:ख रूपाने भासणारे) जग होय, असा अज्ञानयुक्त किंवा अध्यस्त स्फुरणाचा उल्लेख करून ज्ञानदृष्टी प्राप्त झाली असता हाच सर्व अज्ञान दृष्टीचा देखावा चैतन्यरूप ब्रह्माच्या विलासाचा (सत्, चिद् व आनंद धर्मांच्या) म्हणजेच चिद्विलासाचा देखावा होतो असे माउली या ठिकाणी म्हणते. आचार्यांच्या विवर्तवादात व माउलीच्या स्फुरणवादात वेदान्ताचे यथार्थज्ञान असल्यास फरक वाटण्याचे कारण नाही.

**रज्जु जालिया गोचरु। आभासतां तो व्याळाकारु। रज्जुच ऐसा निर्धारु। होय जेवीं॥ ११८८॥**

**अर्थ**—ही दोरी आहे असे दिसू लागले म्हणजे सर्पाच्या आकाराचा होणारा भास जाउन ती दोरीच आहे असा ज्याप्रमाणे आपला निश्चय होतो.॥ ११८८॥

**भांगारापरतें कांहीं। लेणें गुंजहीभरी नाहीं। हें आटुनियां ठायीं। कीजे जैसें॥ ११८९॥**

**अर्थ**—सोन्या व्यतिरिक्त अलंकार म्हणून गुंजभर देखील कांही नाही हे अलंकार आटवून ज्याप्रमाणे निश्चित करावे॥ ११८९ ॥

**उदका येकापरतें। तरंग नाहींचि हें निरुतें। जाणोनि तया आकारातें। न घेपे जेवीं॥ ११९०॥**

**अर्थ**—एका पाण्याव्यतिरिक्त तरंग म्हणून काहीच नाही हे समजल्यावर ज्याप्रमाणे तरंगाच्या आकाराची स्वतंत्र वस्तू घेतली जात नाही॥ ११९० ॥

**नातरी स्वप्नविकारां समस्तां। चेऊनियां उमाणें घेतां। तो आपणयापरौता। न दिसे जैसा॥ ११९१॥**

**अर्थ**—किंवा स्वप्नातील यच्चयावत् दिसणाऱ्या गोष्टींचा जागे झाल्यावर हिशोब करायला लागलो असता ज्या प्रमाणे आपल्या व्यतिरिक्त दुसरे काहीही दिसत नाही॥ ११९१ ॥

**तैसें जें कांहीं आथी नाथी। येणें होय ज्ञेयस्फूर्ती। तें ज्ञाताचि मी हे प्रतीती। होऊनि भोगी॥ ११९२॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे जे काही 'आहे-नाही' या भावाने ज्ञेयाचे स्फुरण होते ते सर्व मी ज्ञाताच आहे. हा त्याला अनुभव येऊन तो तसा अनुभव भोगतो॥ ११९२ ॥

**जाणे अजु मी अजरु। अक्षयो मी अक्षरु। अपूर्व मी अपारु। आनंदु मी॥ ११९३॥**

**अर्थ**—मी जन्मरहित आहे, मी वार्धक्यरहित आहे, मी नाशरहित आहे, मी अविनाशी आहे, मी अनादी आहे, मी अमर्यादित आहे व आनंदही मीच आहे असे तो जाणतो. ॥ ११९३ ॥

**अचळु मी अच्युतु। अनंतु मी अद्वैतु। आद्यु मी अव्यक्तु। व्यक्तुही मी॥ ११९४॥**

**अर्थ**—मी स्थिर आहे. मी न ढळणारा आहे, मी नित्य आहे, मी अद्वैत आहे, मी सर्वांच्या आधीचा आहे, मी निराकार आहे व साकारही मीच आहे. ॥ ११९४ ॥

**ईश्य मी ईश्वरु। अनादि मी अमरु। अभय मी आधारु। आधेय मी॥ ११९५॥**

**अर्थ**—नियम्य व नियात्मक मीच, अनादी व अमर मीच अभय मीच व आधार मीच आणि आधारभूतही मीच आहे. ॥ ११९५ ॥

**स्वामी मी सदोदितु। सहजु मी सततु। सर्व मी सर्वगतु। सर्वातीतु मी॥ ११९६॥**

**अर्थ**—मी मालक असून नित्य आहे, मी स्वत:सिद्ध व अखंड आहे, सर्व मीच असून मीच सर्वत्र आहे व सर्वांच्या पलीकडचाही मीच आहे. ॥ ११९६ ॥

**नवा मी पुराणु। शून्यु मी संपूर्णु। अस्थूलु मी अनणू। जें कांहीं तें मी॥ ११९७॥**

**अर्थ**—मी नवा व जुना आहे, मी शून्य व संपूर्ण आहे, जे काही स्थूळ नाही व जे अणु नाही तेही मीच आहे. ॥ ११९७ ॥

**अक्रियु मी येकु। असंगु मी अशोकु। व्याप्यु मी व्यापकु। पुरुषोत्तमु मी॥ ११९८॥**

**अर्थ**—मी क्रियारहित आहे, मी एकटाच आहे, मी संगरहित व शोकरहित आहे, व्याप्य व व्यापक मीच व उत्तम पुरुषही मीच आहे. ॥ ११९८ ॥

**अशब्दु मी अश्रोत्रु। अरूपु मी अगोत्रु। समु मी स्वतंत्रु। ब्रह्म मी परु॥ ११९९॥**

**अर्थ**—मी शब्दरहित व कानरहित आहे, मी रूपरहित व गोत्ररहित आहे, मी समस्वरूप व स्वतंत्र आहे, मी परब्रह्म आहे॥ ११९९ ॥

**ऐसें आत्मत्वें मज एकातें। इया अद्वयभक्ती जाणोनि निरुतें। आणि याही बोधा जाणतें। तेंही मीचि जाणें॥ १२००॥**

**अर्थ**—अशा प्रकारे मला एकाला अद्वैतभक्तीद्वारे आत्मस्वरूपाने खरोखर जाणतो आणि याही ज्ञानाला जाणणारा तोही मीच आहे हे तो जाणतो॥ १२०० ॥

**पैं चेइलेयानंतरें। आपुलें एकपण उरे। तेंही तोंवरी स्फुरे। तयाशींचि जैसें॥ १२०१॥**

**कां प्रकाशतां अर्कु। तोचि होय प्रकाशकु। तयाही अभेदा द्योतकु। तोचि जैसा॥ १२०२॥**

**तैसा वेद्याच्या विलयीं। केवळ वेदकु उरे पाहीं। तेणें जाणवे तयातेंही। हेंही जो जाणे॥ १२०३॥**

**अर्थ**—स्वप्नातून जागे झाल्यानंतर आपले एकपणच शिल्लक रहाते व तेही आपल्याला आपल्याच ठिकाणी स्फुरते॥ १२०१॥ किंवा सूर्य प्रकाशत असताना तोच प्रकाशक होतो व त्या अभेदाचा (प्रकाश्य व प्रकाशक यांच्या) जसा तोच दाखवणारा (द्योतक) असतो.॥ १२०२॥ त्याचप्रमाणे जाणल्या जाणाऱ्या वस्तूंचा नाश झाल्यानंतर केवळ ज्ञाताच शिल्लक राहतो. त्या ज्ञात्याकडूनच तोही स्वत: जाणला जातो हेही जो जाणतो.॥ १२०३॥

**गूढार्थदीपिका—ओवी १२०३ तेणें जाणवे तयातेंही। हेंही जो जाणे।**

स्वप्न पहात असणारा माणूस स्वप्नात देखील वस्तुत: एकटाच असतो. पण आपल्याच कल्पनेने तो अनेक दृश्ये स्वप्नात निर्माण करतो व अनेक गोष्टीचा तेथे अनुभव घेतो. स्वप्नातून जागे झाल्यानंतर स्वप्नातील अनेक वस्तू पूर्णपणे नाहीशा होतात व त्याचे एकटेपण केवळ शिल्लक राहते व ते एकटेपणही तो जाणत राहतो.

सूर्य प्रकाशत असतांना तो आपलाच प्रकाशक होतो कारण सूर्याच्या अस्तित्वाचे ज्ञान त्याच्याच प्रकाशामुळे आपल्याला कळते. प्रकाश व प्रकाशक असा जो सूर्य ह्यांचा अभेदही जसा त्याच्यामुळे कळतो म्हणून त्या अभेदाला दाखवणाराही तोच असतो. प्रकाशक, प्रकाश्य व प्रकाश ते तिन्हीही एक सूर्यच असतो. त्याचप्रमाणे अद्वैत ज्ञानानंतर विपरीत धर्मांनी भासणारे ज्ञेय पूर्णपणे नाहीसे झाल्यावर केवळ ज्ञाताच शिल्लक राहतो. ज्ञात्याच्या ठिकाणचे हे ज्ञातृत्व ज्ञेयाच्या अपेक्षेने आलेले असते. पण ही ज्ञातृत्वाची वृत्तीच असल्यामुळे ती त्या वृत्तीला आधार असलेल्या अशा ब्रह्मावरच स्फुरणार व हे आधाररूप ब्रह्म ज्ञानस्वरूप असते. आता तो आपण आपल्याच व्यापक स्वरूपाला जाणतो व 'मी ब्रह्मस्वरूप' आहे असे म्हणतो. हे त्याचे ज्ञान स्फुरणरूप किंवा वृत्तिरूप असल्यामुळे त्या ज्ञानाला जाणणारेही ज्ञान अधिष्ठानरूप परब्रह्माला होत असते. त्यालाच ईश्वर म्हणतात. अधिष्ठानरूप ईश्वराची ही निरपेक्ष ज्ञातृरूपता नित्य असते म्हणून तिला वेदान्तात नित्यदृष्टी असे म्हणतात.

**तया अद्वयपणा आपुलिया। जाणती ज्ञप्ती जे धनंजया। ते ईश्वरचि मी हे तया। बोधासि ये॥ १२०४॥**

**अर्थ**—अर्जुना, त्या आपल्या अद्वयपणाला जाणणारी जी ज्ञातृरूपता (ज्ञानवृत्ती) ती ईश्वरच आहे व तो ईश्वरच मी आहे असे त्यास ज्ञात झालेले असते.॥ १२०४॥

**मग द्वैताद्वैतातीत। मीचि आत्मा एकु निभ्रांत। हें जाणोनि जाणणें जेथ। अनुभवीं रिघे॥ १२०५॥**
**तेथ चेइलयां येकपण। दिसे जें आपुलयां आपण। तेंही जाता नेणों कोण। होईजे जेवीं॥ १२०६॥**
**कां डोळां देखतिये क्षणीं। सुवर्णपण सुवर्णीं। नाटितां होय आटणी। अळंकाराचीही॥ १२०७॥**
**नाना लवण तोय होये। मग क्षारता तोयत्वें राहे। तेही जिरतां जेवीं जाये। जालेपण तें॥ १२०८॥**
**तैसा मी तो हें जें असे। ते स्वानंदानुभवसमरसें। काल्वूनियां प्रवेशे। मजचिमाजीं॥ १२०९॥**

**अर्थ**—मग द्वैत व अद्वैत यांच्या पलीकडे असणारा जो आत्मा तो नि:संशय मीच आहे हे समजून हे (वृत्तिरूप) ज्ञान जेथे अनुभवात प्रवेश करते. (अनुभवरूप होऊन जाते)॥ १२०५॥ स्वप्नातून जागे झाल्यानंतर आपल्याला आपला जो एकपणा दिसू लागतो तोही नाहीसा झाला असता काय होऊन राहते हे जसे कळत नाही. (त्या अनुभवाचे काय स्वरूप असते हे जसे कळत नाही.)॥ १२०६॥ किंवा सोन्याकडे त्याच्या मूळ स्वरूपाच्या (अधिष्ठानरूपाने) दृष्टीने पहाताक्षणीच आटणी (खरोखर) न करताच अलंकाराची आटणी होते.॥ १२०७॥ किंवा पाण्यांत मीठ टाकल्यानंतर मीठ पाणीरूप होऊन जाते व त्याचा खारटपणा पाण्याच्यारूपाने राहतो व तो खारेपणाही जिरून गेल्यानंतर ज्याप्रमाणे मीठाचे पाणी झाल्याचा भावही नाहीसा होतो॥ १२०८॥ त्याप्रमाणे मी (देव) व तो (भक्त) हा जो दोनपणा असतो, तो आत्मानंदाच्या अनुभवात समरसपणाने मिसळून तो माझ्याच ठिकाणी प्रवेश करतो॥ १२०९॥

**आणि तो हे भाष जेथ जाये। तेथें मी हें कोण्हासी आहे। ऐसा मी ना तो तिये सामाये। माझ्याचि रूपीं॥ १२१०॥**

**अर्थ**—आणि 'तो' ही भाषा जेथे नाहीशी होते तेथें 'मी' पणा कोणी धारण करायचा? अशा रीतीने 'मी' ही नाही व 'तो' ही नाही अशा माझ्याच स्वरूपामध्ये तो मिळतो॥ १२१०॥

**जेव्हां कापुर जळों सरे। तयाचि नाम अग्नि पुरे। मग उभयातीत उरे। आकाश जेवीं॥ १२११ ॥**

**कां धाडलिया एका एकु। वाढे तो शून्य विशेखु। तैसा आहे नाहींचा शेखु। मीचि मग आथी॥ १२१२ ॥**

**अर्थ**—जेव्हा कापूर जळून संपतो, त्याचवेळेला अग्नीही त्याच्याच नावाबरोबर नाहीसा होतो. मग त्यांच्याहून वेगळे असलेले केवळ आकाशच एक ज्याप्रमाणे शेष राहते॥ १२११ ॥ किंवा एकातून एक वजा केला असता जसे शून्य शेष राहते, त्याप्रमाणे आहे नाहीचा शेष मग मीच राहतो॥ १२१२ ॥

**तेथ ब्रह्म आत्मा ईशु। यया बोला मोडे सौरसु। न बोलणेयाही पैसु। नाहीं तेथ॥ १२१३ ॥**

**अर्थ**—तेव्हा ब्रह्म, आत्मा ईश्वर या शब्दांच्या बोलण्याचे स्वारस्यच नाहीसे होते व न बोलण्यालाही (त्यांच्या सापेक्ष) तेथे जागा राहत नाही॥ १२१३ ॥

**न बोलणेंही न बोलोनी। तें बोलिजे तोंड भरुनी। जाणिव नेणिव नेणोनी। जाणिजे तें॥ १२१४ ॥**

**अर्थ**—न बोलणेही न बोलता ते तोंड भरून बोलावे व जाणीव नेणीव रहित होऊन ते जाणावे॥ १२१४ ॥

**तेथ बुझिजे बोधु बोधें। आनंदु घेपे आनंदें। सुखवरी नुसधे। सुखचि भोगिजे॥ १२१५ ॥**

**अर्थ**—त्या ठिकाणी बोधानेच बोध जाणायचा; आनंदानेच आनंद घ्यावयाचा व सुखानेच केवळ सुख भोगावयाचे॥ १२१५ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय किंवा भोक्ता, भोग्य व भोग या त्रिपुटिरहित व त्यामुळेच ज्ञातृत्व व भोक्तृत्व ह्यांच्या पलीकडे असलेल्या निर्विकल्प दशेचे वर्णन माउली या ठिकाणी करत आहे. सामान्य माणसाला त्रिपुटीशिवाय ज्ञानाची व आनंदाची कल्पना करता येत नाही. निर्विकल्प दशा वाचेच्या पलीकडची असल्यामुळे शब्दांनी तिचे वर्णन करून सांगत असताना शब्दांची द्विरुक्ती करावी लागते.

ज्ञानीभक्त हा पाण्यावरील तरंगाप्रमाणे स्फुरणरूप असतो त्यामुळे परब्रह्म व त्याचा आधार आधेयरूप भास नाहीसा होत नाही. हा भास विषमसत्ताक असल्यामुळे पाणी व तरंगाप्रमाणे तो भास पूर्णपणे अद्वैतरूप आहे. परब्रह्माप्रमाणेच हा ज्ञानीभक्त चित्‌रूप व आनंदरूप आहे. त्यामुळे या अद्वैत दशेत पाणीरूप असलेल्या लहरीने तिला आधाररूप पाण्याचे ज्ञान करावे किंवा आनंद घ्यावा तशाच प्रकारे हा सच्चिदानंदरूप ज्ञानीभक्त आपल्या आधाररूप सच्चिदानंदरूप परब्रह्माचेच ज्ञान व आनंद अद्वैतरूपाने अनुभवतो. ही अवस्था त्यामुळेच बोधानेच बोध घ्यावा किंवा आनंदानेच आनंद भोगावा या स्वरूपाची आहे.

**तेथ लाभु जोडला लाभा। प्रभा आलिंगिली प्रभा। विस्मयो बुडाला उभा। विस्मयामाजीं॥ १२१६ ॥**

**अर्थ**—त्या अवस्थेत लाभालाच लाभ होतो. प्रभाच प्रभेला आलिंगन देते व आश्चर्यच आश्चर्यात पूर्णपणे बुडते॥ १२१६ ॥

**समु तेथ सामवला। विश्रामु विश्रांति आला। अनुभव वेडावला। अनुभूतिपणें॥ १२१७ ॥**

**अर्थ**—तेथे शमाला शांती मिळते, विश्रामाला विश्रान्ती मिळते व अनुभव अनुभूतिनेच वेडावून जातो॥ १२१७ ॥

**किंबहुना ऐसें निखळ। मीपणा जोडे तया फळ। सेवूनि वेली वेल्हाळ। कर्मयोगाची ते॥ १२१८ ॥**

**अर्थ**—फार काय सांगावे! असे शुद्ध मी पणाचे फळ त्या कर्मयोग्याला, कर्मयोगाची सुंदर वेळ सेवन करून (आश्रय करून) प्राप्त होते॥ १२१८ ॥

**पैं कर्मयोगिया किरीटी। चक्रवर्तीच्या मुकुटीं। मी चिद्रत्न ते साटोवाटीं। होय तो माझा॥ १२१९ ॥**

**अर्थ**—आणि अर्जुना, त्या कर्मयोगरूप सार्वभौम राजाच्या मुकुटात चैतन्यरूप रत्न मी होतो व त्याच्या मोबदल्यात तो मद्रूप होऊन राहतो. (आपली जीवदशा सोडून देऊन)॥ १२१९ ॥

**कीं कर्मयोगप्रासादाचा। कळसु जो हा मोक्षाचा। तयावरील अवकाशाचा। उवावो जाला तो॥ १२२० ॥**

**अर्थ**—किंवा कर्मयोगरूपी मंदिराचा जो हा मोक्षरूपी कळस त्यावरील आकाशाचा तो कर्मयोगी विस्तार होतो.॥ १२२० ॥

**गूढार्थदीपिका—ओवी १२२० तयावरील अवकाशाचा। ऊवावो जाला तो।**

आत्यंतिक दु:ख निवृत्ती व परमानंदप्राप्ती ही जी मोक्षाची दोन अंगे आहेत त्यापैकी अद्वैतज्ञानाने पहिले अंग प्राप्त होते व अद्वैत ज्ञानोत्तर सगुण भगवंताच्या भक्तीने दुसरे अंग प्राप्त होते.

जीवाची आत्यंतिक तळमळ अखंड तळमळ अखंड परमानंद प्राप्ती करताच आहे. मात्र ती प्राप्ती आत्यंतिक दु:ख निवृत्ति शिवाय प्राप्त होऊ शकत नाही त्यामुळे अद्वैत ज्ञानाची प्राप्ती ही मोक्षाच्या दुसऱ्या म्हणजे परमानंदरूप अंगाच्या प्राप्तीचे साधन ठरते.

सर्व व्यवहार भगवंता प्रीत्यर्थ होणाऱ्या कर्मयोगात मोक्षाची दोन्ही अंगे समाविष्ट झालेली आहेत, कर्मयोगाच्या पहिल्या अवस्थेत प्रेमाची उत्कटता राहत नसल्यामुळे तीत ज्ञानाचे अंग प्रधान राहत असते व प्रेमाचे अंग अर्थातच गौण. ह्या अवस्थेत 'अहंब्रह्मास्मि' व 'सर्वं खाल्विदं ब्रह्म' ह्या दोन्ही प्रकारच्या अद्वैतज्ञानाचा अनुभव त्या कर्मयोग्याला येत असतो.

हे दोन्ही प्रकारचे ज्ञानवृत्तिरूप असल्यामुळे जाणीव कायम ठेवणारे आहे. जोपर्यन्त जाणीव कायम आहे तो पर्यन्त निर्विकल्प दशेचा अनुभव येऊं शकत नाही हे आतापर्यन्तच्या विवेचनांवरून आपण पाहिलेच आहे.

कर्मयोगाच्या दुसऱ्या अवस्थेत सगुण भगवंताविषयीच्या वाढत्या प्रेमाने प्रेमाचे अंग प्रधान होते व ज्ञानाचे गौण. त्यामुळे ह्या ज्ञानीभक्त असलेल्या कर्मयोग्याला आंत व बाहेर एक सगुण भगवंताशिवाय दुसऱ्या कशाचेच भान राहत नाही ह्या प्रेमाच्या अवस्थेत कोणत्याही प्रकारची जाणीवच शिल्लक राहत नसल्यामुळे परब्रह्माच्या अत्यंत व्यापकतेचा अनुभव ह्या प्रेमाच्या समरस अवस्थेत त्या ज्ञानीभक्ताला येतो. अशा रीतीनें हा ज्ञानी भक्त कर्मयोगरूपी मंदिराचा मोक्षरूपी कळस होतो. आकाश व्यापकतेचे निर्विकल्पकतेचे प्रतीक आहे. म्हणूनच आकाशासारख्या व्यापक व निर्विकल्प अवस्थेचा अनुभव ह्या अवस्थेत त्याला येत असल्यामुळे कळसावरील आकाशावरील आकाशाचा विस्तार तो कर्मयोगी होतो असे माउलीने म्हटले आहे.

**नाना संसार आडवीं। कर्मयोग वाट बरवी। जोडिली ते मदैक्यगांवीं। पैठी जालीसे॥ १२२१॥**

**अर्थ**—अथवा संसाररूपी अरण्यात कर्मयोगाची उत्तम वाट असून ती मत्स्वरूपरूपी गावात येऊन ठेपली आहे. ॥ १२२१ ॥

**हें असो कर्मयोगवोघे। तेणें भक्तचिद् गंगे। मी स्वानंदोदधी वेगें। ठाकिला कीं गा॥ १२२२॥**

**अर्थ**—हे असो. कर्मयोगाच्या ओघाने ज्ञान व भक्तीच्या नदीबरोबर 'मी' या आत्मानंदरूपी सागराला तो मोठ्या वेगाने येऊन मिळालेला असतो॥ १२२२॥

**हा ठायवरी सुवर्मा। कर्मयोगीं आहे महिमा। म्हणौनि वेळोवेळां तुम्हां। सांगतों आम्ही॥ १२२३॥**

**अर्थ**—हे मर्मज्ञ अर्जुना, येथपर्यंत कर्मयोगाची एवढी मोठी थोरवी आहे. म्हणूनच मी तुला पुन: पुन: सांगत आहे॥ १२२३॥

**पैं देशें काळें पदार्थें। साधूनि घेईजे मातें। तैसा नव्हे मी आयतें। सर्वांचे सर्वही॥ १२२४॥**

**अर्थ**—देश, काळ, पदार्थ इत्यादिकांच्या साधनाने (त्रिविध परिच्छेदासह) माझी प्राप्ती होईल अशातला मी नाही. तर मी स्वत:सिद्ध असून सर्व ठिकाणी आहे. (देशकालादीसुद्धा मद्व्यतिरिक्त नाहीत हा भाव.)॥ १२२४॥

**म्हणौनि माझ्या ठायीं। जाचावें न लगे कांहीं। मी लाभें इयें उपायीं। साचचि गा॥ १२२५॥**

**अर्थ**—म्हणून (मला वेगळे समजून) माझ्या प्राप्तीकरता काहीही कष्ट करण्याची आवश्यकता नाही. अरे, या पूर्वोक्त उपायांनी खरोखरच माझी प्राप्ती होते॥ १२२५॥

**गूढार्थदीपिका—म्हणौनि माझ्या ठायीं। जाचावें न लगें कांहीं।**

एखादी वस्तू आपल्याहून भिन्न असते तेव्हाच आपण कष्ट करून तिला प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करतो. आपण आपल्यालाच प्राप्त करून घेण्याचे कष्ट करीत नाही. आत्मवस्तू आपण स्वत:च असल्याकारणाने तिच्या

प्राप्तीकरता कष्ट करण्याची आवश्यकता नाही. पुन्हा ती वस्तू नित्य असल्याकारणाने ती कोणत्याही ज्ञानाने किंवा कर्माने निर्माण करता येत नाही. (न हि नित्यं वस्तु कर्मणा ज्ञानेन वा क्रियते। गीताभाष्य अ० ८ श्लोक ६७)

'ज्ञानादेव तु कैवल्यम्' असे जे म्हणण्यात येते त्याचा मग अर्थ काय? या म्हणण्याचा अर्थ ज्ञानाने अज्ञानाचा म्हणजेच द्वैताच्या अनुभवाचा नाश होतो व स्वत:सिद्ध असलेले आत्मज्ञान प्रगट होते असा आहे. मी अकर्ता, अक्रिय व फलरहित आहे व माझ्याशिवाय दुसरी वस्तूच नाही, अशा तऱ्हेचे ज्ञान ज्ञान्याला होऊन कर्माला कारण होणाऱ्या भेदबुद्धीचा नाश होतो. ज्ञानाचा अज्ञानाशी विरोध आहे. त्यामुळे रज्जुसर्पाच्या उदाहरणात दिव्याच्या प्रकाशाने अधिष्ठानरूप दोरीचे ज्ञान होताच सर्पाची ज्याप्रमाणे त्रैकालिक निवृत्ती होते त्याचप्रमाणे अधिष्ठानरूप ब्रह्माचे ज्ञान होताच अज्ञानजन्य सर्व विपरीत धर्माच्या दृश्याची त्रैकालिक निवृत्ती होते. (आत्मज्ञानस्य तु केवलस्य नि:श्रेयस हेतुत्वं, भेदप्रत्यय निवर्तकत्वेन कैवल्यफलावसायित्वात्.........न मत्त: अन्य: अस्ति कश्चित् इत्येवं रूपं आत्मविषयकं ज्ञानं उत्पद्यमानं कर्मप्रवृत्तिहेतुभूताया: भेद बुद्धे: निवर्तकत्वात्।.......अविद्या निवर्तकत्वे सति दृष्टकैवल्यफलावसानत्वात्..........गीता शांकरभाष्य अ० १८ श्लोक ६७)

कर्मयोगात ज्ञान व भक्तीचा संगम असल्याकारणाने त्या कर्मयोगाच्या साधनाने उभयविध पुरुषार्थरूप मोक्षाची प्राप्ती नि:संदेह व निश्चित होते असा भाव.

**एक शिष्य एक गुरु। हा रूढला साच व्यवहारु। तो मत्प्राप्तिप्रकारु। जाणावया॥ १२२६॥**

**अर्थ**—एक शिष्य व एक गुरु हा जो (परमार्थात) रूढ व्यवहार जगात चालू आहे तो माझ्या प्राप्तीचा मार्ग (स्वरूप, साधन व फळ) जाणून घेण्याकरताच आहे.॥ १२२६॥

**अगा वसुधेच्या पोटीं। निधान सिद्ध किरीटी। वन्हि सिद्ध काष्ठीं। दोहां दूध॥ १२२७॥**

**अर्थ**—अर्जुना, पृथ्वीच्या पोटात धनाचा ठेवा आयताच आहे, लाकडात अग्नी आयताच आहे व कासेत दूध आयतेच असते॥ १२२७॥

**परी लाभें तें असतें। तया कीजे उपायातें। येर सिद्धचि तैसा येथें। उपायीं मी॥ १२२८॥**

**अर्थ**—तसे पाहिले तर, असते त्याचीच प्राप्ती होऊ शकते. परंतु त्या करता उपायमात्र करावे लागतात. त्याचप्रमाणे मूळचा मी सिद्धच असलो तरी साधनमार्गानेच माझी प्राप्ती करून घ्यावी लागते॥ १२२८॥

**हा फळहीवरी उपावो। कां पां प्रस्तावीतसे देवो। हें पुसतां तरी अभिप्रावो। येथिंचा ऐसा॥ १२२९॥**

**अर्थ**—फळ सांगितल्यानंतर देखील साधन मार्ग पुन्हा सांगण्याचा भगवान् उपक्रम का करीत आहे अशी जर विचारणा करशील तर या सांगण्याचा हेतु हा आहे.॥ १२२९॥

**जे गीतार्थाचें चांगावें। मोक्षोपायपर आघवें। आन शास्त्रोपाय कीं नव्हे। प्रमाणसिद्ध॥ १२३०॥**

**अर्थ**—गीतेतील बोधाचा चांगुलपणा यात आहे की संपूर्ण गीताशास्त्र मोक्षाच्या प्राप्तीचे साधनमार्ग सांगणारे आहे इतर शास्त्रांनी सांगितलेले उपाय प्रमाणाने (अनुभूती) सिद्ध होणारे नाहीत.॥ १२३०॥

**वारा आभाळचि फेडी। वांचूनि सूर्यातें न घडी। कां हातु बाबुळी धाडी। तोय न करी॥ १२३१॥**

**तैसा आत्मदर्शनीं आडळु। असे अविद्येचा जो मळु। तो शास्त्र नाशी येरु निर्मळु। मी प्रकाशें स्वयें॥ १२३२॥**

**अर्थ**—वारा (सूर्या आड येणाऱ्या) अभ्रांना दूर सारतो त्या व्यतिरिक्त तो काही सूर्याला नवीन तयार करीत नाही किंवा हात पाण्यावरील शेवाळाला दूर सारतो, पाणी नवीन तयार करीत नाही॥ १२३१॥ त्याचप्रमाणे आत्मदर्शनाला प्रतिबंध करणारा जो अज्ञानाचा मळ असतो तो शास्त्राच्यामुळे नाहीसा होतो, एरव्ही मी निर्मळ आणि स्वयंप्रकाशच आहे.॥ १२३२॥

**गूढार्थदीपिका—येर निर्मळ। मी प्रकाशे स्वये।**

आत्मा शब्दाने म्हणजे शास्त्राने प्रकाशित होत नाही. शास्त्राने अविद्यादिक अडथळे किंवा प्रतिबंध दूर होतात व मग आत्मा स्वयं प्रकाशतो. कारण तो चैतन्यस्वरूप म्हणजे प्रकाश स्वरूपच आहे. स्वयंप्रकाशरूप असलेल्या

सूर्याला दाखवण्याकरता ज्याप्रमाणे दुसऱ्या तेजाची आवश्यकता नाही, त्याप्रमाणे स्वयं प्रकाशरूप चैतन्यात्म्याला प्रकाशित करण्याकरता शब्दादिकांची आवश्यकता नाही.

जेवढ्या काही विपरीत म्हणजे स्वरूप विसरून कल्पना केल्या असतील त्याच नाहीशा करावयाच्या असतात. ब्रह्मज्ञानाकरता स्वतंत्र आणखी प्रयत्न करण्याची आवश्यकता नाही. कारण ब्रह्म आपले स्वरूपच असल्यामुळे ते अत्यंत प्रसिद्धच आहे, असे आचार्य म्हणतात.

**''अविद्याद्यारोपित निराकरणमात्रं ब्रह्मणि कर्तव्यम्, न तु ब्रह्मविज्ञाने यत·। अत्यंत प्रसिद्धत्वात्।''**

गीताशांकरभाष्य अध्याय १८

**म्हणोनि आघवींचि शास्त्रें। अविद्याविनाशाचीं पात्रें। वांचोनि न होती स्वतंत्रें। आत्मबोधीं॥ १२३३॥**

**अर्थ**—म्हणून संपूर्ण शास्त्रे अविद्येचा नाश करण्याची साधने आहेत. त्या व्यतिरिक्त, स्वतंत्रपणे आत्मबोध करण्यास ती समर्थ नाहीत (आत्मबोध करणे त्यांच्या आधीन नाही.)॥ १२३३॥

**तया अध्यात्मशास्त्रांसीं। जैं साचपणाची ये पुसी। तैं येइजे जया ठायासी। ते हे गीता॥ १२३४॥**

**अर्थ**—त्या आत्मज्ञान प्रतिपादक शास्त्रांना जेव्हा आपला खरेपणा सिद्ध करण्याचा प्रश्न येतो तेव्हा त्यांना ज्या ठिकाणी जावे लागते ते हे गीताशास्त्र होय॥ १२३४॥

**भानुभूषिता प्राचिया। सतेजा दिशा आघविया। तैसी शास्त्रेश्वरा गीता या। सनाथें शास्त्रें॥ १२३५॥**

**अर्थ**—सूर्योदयाने पूर्व दिशेला शोभा आणली असता ज्याप्रमाणे सर्व दिशा प्रकाशमान होतात त्याप्रमाणे या एका श्रेष्ठ गीताशास्त्राने सर्व शास्त्रे सनाथ होतात. (सर्वशास्त्रांना छत्र लाभते अथवा सर्व शास्त्रांना आधार गवसतो)॥ १२३५॥

**हें असो येणें शास्त्रेश्वरें। मागां उपाय बहुवे विस्तारें। सांगितला जैसा करें। घेवों ये आत्मा॥ १२३६॥**

**अर्थ**—हे असो. या शास्त्रात श्रेष्ठ अशा या गीतेने ज्यारीतीने आत्मा हाताने घेता येईल (करतलामलकवत् स्पष्ट आकलन होईल) असा साधनमार्ग मागे पुष्कळ विस्ताराने सांगितला॥ १२३६॥

**परी प्रथमश्रवणासवें। अर्जुना विपायें हें फावे। हा भावो सकणवे। धरूनि श्रीहरी॥ १२३७॥**
**तेंचि प्रमेय एक वेळ। शिष्यीं होआवया अढळ। सांगतसे मुकुळ-। मुद्रा आतां॥ १२३८॥**

**अर्थ**—परंतु पहिल्यानेच ऐकल्या बरोबर हे अर्जुनास क्वचितच् समजले असेल अशी कल्पना कृपाळू अशा भगवंताच्या मनात येऊन॥ १२३७॥ एकवेळ सांगितलेला सिद्धान्तच शिष्याच्या ठिकाणी चांगला बिंबावा म्हणून श्रीकृष्ण आता पुन: संक्षेपाने सांगत आहेत.॥ १२३८॥

**आणि प्रसंगें गीता। ठावोही हा संपता। म्हणौनि दावी आद्यंता। एकार्थत्व॥ १२३९॥**

**अर्थ**—आणि सहजासहजी गीता देखिल समाप्त होत असल्यामुळे तिच्या आरंभापासून तो शेवटापर्यंत एकाच अर्थाचे प्रतिपादन आहे हे भगवान् दाखवीत आहेत.॥ १२३९॥

**जे ग्रंथाच्या मध्यभागीं। नाना अधिकारप्रसंगीं। निरूपण अनेगीं। सिद्धांतीं केलें॥ १२४०॥**
**तरी तेतुलेही सिद्धांत। इये शास्त्रीं प्रस्तुत। हें पूर्वापर नेणत। कोण्ही जैं मानी॥ १२४१॥**
**तैं महासिद्धांताचा आवांका। सिद्धांतकक्षा अनेका। भिडऊनि आरंभु देखा। संपवितु असे॥ १२४२॥**

**अर्थ**—या गीता-ग्रंथाच्या मध्यभागात निरनिराळ्या अधिकार प्रसंगी अनेक सिद्धान्त मांडून जे प्रतिपादन केले॥ १२४०॥ ते तितकेही सिद्धान्त या गीता शास्त्रांत आहेत असे पूर्वापार संबंध न समजता कोणी मानील॥ १२४१॥ म्हणून अनेक सिद्धान्ताची एक वाक्यता करूनच महासिद्धान्ताचे तात्पर्य सांगितले असल्यामुळे आरंभी प्रतिपादन केलेल्या सिद्धान्तानेच समाप्तीही केली आहे.॥ १२४२॥

**एथ अविद्यानाशु हें स्थळ। तेणें मोक्षोपादान फळ। या दोहीं केवळ। साधन ज्ञान॥ १२४३॥**

**अर्थ**—या गीताशास्त्रात अविद्येची निवृत्ती हा प्रतिपाद्य विषय आहे. त्याच्या योगाने मोक्षाची प्राप्ती करून घेणे हे प्रयोजन आहे. व दोन्ही गोष्टी साध्य करून घेण्याचे साधन केवळ ज्ञान आहे.॥ १२४३॥

**हें इतुलेंचि नानापरी। निरूपिलें ग्रंथविस्तारीं। तें आतां दोहीं अक्षरीं। अनुवादावें॥ १२४४॥**

**अर्थ**—हे इतकेच नाना प्रकारांनी या ग्रंथात विस्ताराने सांगितले. तेच आता दोन शब्दात पुन्हा सांगावयाचे आहे. ॥ १२४४ ॥

**म्हणौनि उपेयही हातीं। जालया उपायस्थिती। देव प्रवर्तलें तें पुढती। येणेंचि भावें॥ १२४५॥**

**अर्थ**—म्हणून साध्यही प्राप्त झाल्यावर पुन्हा उपाय सांगण्यास देव प्रवृत्त झाले ते याच उद्देशाने॥ १२४५॥

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः। मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम्॥ ५६॥**

**अर्थ**—(कायावाचामनाने) मला शरण आलेला पुरुष सर्वकाळ सर्वकर्मे करीत असला तरी माझ्या कृपेमुळे शाश्वत व अविनाशी असे पद प्राप्त करतो. ॥ ५६ ॥

**मग म्हणे गा सुभटा। तो कर्मयोगी या निष्ठा। मी होऊनी होय पैठा। माझ्या रूपीं॥ १२४६॥**

**अर्थ**—मग भगवान् म्हणतात योद्ध्या अर्जुना, अशा निष्ठेने (स्थिर भक्तीने) तो कर्मयोगी, मत्स्वरूप होऊन माझ्याच ठिकाणी अढळपणे राहतो. ॥ १२४६ ॥

**स्वकर्मांच्या चोखौळीं। मज पूजा करूनि भली। तेणें प्रसादें आकळी। ज्ञाननिष्ठेतें॥ १२४७॥**

**अर्थ**—स्वकर्मरूप चांगल्या पुष्पांनी माझी सुंदरपूजा करून माझ्या प्रेमरूप कृपाप्रसादाने, ज्ञाननिष्ठा, तो प्राप्त करून घेतो. ॥ १२४७ ॥

**ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे। तेथ भक्ति माझी उल्लासे। तिया मजसी समरसें। सुखिया होय॥ १२४८॥**

**अर्थ**—तो ज्ञानमार्ग जेव्हा हस्तगत होतो, तेव्हा माझ्या भक्तीचा आविर्भाव होतो व तिच्या योगाने माझ्याशी समरस होऊन तो सुखी होतो. ॥ १२४८ ॥

**गूढार्थदीपिका—ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे। तेथ भक्ती माझी उल्लासे।**

श्रीज्ञानेश्वर महाराजांनी या ओवीत ज्ञान व भक्ती यांचा जनक व जन्य हा संबंध दाखविला आहे. ज्ञानप्राप्तीनंतरच परमप्रेम होऊ शकते. म्हणून ज्ञानसाधन व भक्तीसाध्य हे ओघानेच सिद्ध होते. ज्ञान हे जाणीवरूप असल्या कारणाने ती जाणीव जोपर्यन्त नाहीशी होत नाही तोपर्यन्त परमानंद प्रगट होऊ शकत नाही. प्रीतीचाच स्वभाव असा आहे की ती जाणिवेची जाणीव होऊ देत नाही. म्हणूनच प्रीती किंवा प्रेमवृत्ती जोपर्यन्त प्रधान होत नाही तो पर्यंत समरसतेचा म्हणजेच परमानंदाचा अनुभव येऊ शकत नाही. श्रीज्ञानेश्वर महाराजांनी या ओवीत अद्वैत ज्ञाननिष्ठा ही पहिली पायरी, त्यानंतर परमप्रेमाचा सगुण भगवंताच्या ठिकाणी आविष्कार ही दुसरी पायरी, त्यामुळे समरसतेचा अनुभव ही तिसरी पायरी व त्यामुळे परमानंदता ही शेवटची अवस्था असा थोडक्यांत क्रम दर्शविला आहे. ऐक्याची जाणीव नाहीशी होऊन ऐक्य किंवा समरसता बाणण्याचे सामर्थ्य ज्ञानरूप चिद्वृत्तीत नसून आनंदरूप प्रीति किंवा पराभक्तीत आहे हा भाव. अद्वैत वेदान्तात देखील ज्ञानवृत्तीची जाणीव निःशेष नाहीशी होणे यालाच ज्ञानाची पराकाष्ठा म्हटले आहे. ''अहं भवोदयाभावः बोधस्य परमावधिः'' ज्ञान लीन झाले असताच खरा मोक्ष होतो असे श्रीज्ञानेश्वर महाराजही अमृतानुभवात म्हणतात. ''ज्ञानें मोक्षु घडे। ते निमालेनि।'' अमृता प्र० ३ ओवी २४.

**आणि विश्वप्रकाशितया। आत्मया मज आपुलिया। अनुसरे जो करूनियां। सर्वत्रता हे॥ १२४९॥**

**अर्थ**—आणि विश्वाला प्रकाशित करणारा जो मी आत्मा. त्या मला, माझे सर्वत्र व्यापकत्व जाणून जो मला अनुसरतो॥ १२४९ ॥

**सांडूनि आपला आडळ। लवण आश्रयी जळ। का हिंडोनि राहे निश्चळ। वायु व्योमीं॥ १२५०॥**

**अर्थ**—आपला प्रतिबंध (कठीणपणा) टाकून देऊन मीठ ज्याप्रमाणे पाण्यात विरघळून जाते किंवा इकडे तिकडे हिंडून वायू जसा आकाशात शांत राहतो॥ १२५० ॥

**तैसा बुद्धी वाचा कायें। जो मातें आश्रऊनि ठाये। तो निषिद्धेंही विपायें। कर्मे करू॥ १२५१॥**

**परी गंगेच्या संबंधीं। बिदी आणि महानदी। ऐक्य तेवीं माझ्या बोधीं। शुभाशुभांसी॥ १२५२॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे बुद्धी, वाणी व देहाने ज्याने केवळ माझाच आश्रय केला आहे त्याच्याकडून चुकून एखादे वेळी निषिद्ध कर्मे केली गेली॥ १२५१॥ तरी गंगेला मिळणारा ओहोळ व मोठी नदी ज्याप्रमाणे गंगारूप होऊन जातात त्याप्रमाणे माझ्या ज्ञानामध्ये नंतर शुभ व अशुभ हे (दोन्हीही) एकरूपच होतात॥ १२५२॥

**का बावनें आणि धुरें। हा निवाडु तंवचि सरे। जंव न घेपती वैश्वानरें। कवळूनि दोन्ही॥ १२५३॥**

**अर्थ**—चंदन आणि साधे लाकूड हा भेद अग्नी जो पर्यन्त त्या दोघांनाही कवटाळीत नाही, तो पर्यन्तच असतो॥ १२५३॥

**नाना पांचिकें आणि सोळें। हें सोनया तंवचि आलें। जंव परिसु आंगमेळें। एकवटीना॥ १२५४॥**

**अर्थ**—हिणकस व शुद्ध सोने हा फरक परिसाचा त्यांना अंगस्पर्श होत नाही तो पर्यन्तच॥ १२५४॥

**तैसें शुभाशुभ ऐसें। हें तंवचिवरी आभासे। जंव येकु न प्रकाशें। सर्वत्र मी॥ १२५५॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे शुभ व अशुभ हे तो पर्यन्तच भासतात जो पर्यन्त माझा सर्वत्र व्यापकत्वाने अनुभव येत नाही.॥ १२५५॥

**अगा रात्री आणि दिवो। हा तंवचि द्वैतभावो। जंव न रिगिजे गांवो। गभस्तीचा॥ १२५६॥**

**अर्थ**—अरे, जो पर्यन्त सूर्याच्या कक्षेत प्रवेश केला नाही तो पर्यन्तच रात्र आणि दिवस हा भेद असतो॥ १२५६॥

**म्हणौनि माझिया भेटी। तयाचीं सर्व कर्मे किरीटी। जाऊनि बैसे तो पाटीं। सायुज्याच्या॥ १२५७॥**

**अर्थ**—अर्जुन, म्हणूनच माझी भेट होताक्षणीच त्याची सर्व कर्मे (शुभ व अशुभ) नाहीशी होऊन तो मुक्तीच्या पदावर जाऊन बसतो॥ १२५७॥

**देशें काळें स्वभावें। वेंचु जया न संभवे। तें पद माझें पावे। अविनाश तो॥ १२५८॥**

**अर्थ**—देशामुळें, काळामुळे किंवा नैसर्गिक धर्मामुळे ज्याच्यात कोणत्याही तऱ्हेचा ऱ्हास संभवत नाही अशा त्या माझ्या अविनाशी पदाला तो प्राप्त होतो.॥ १२५८॥

**किंबहुना पांडुसुता। मज आत्मयाची प्रसन्नता। लहे तेणें न पविजतां। लाभु कवणु असे॥ १२५९॥**

**अर्थ**—किंबहुना अर्जुना, माझ्या आत्मस्वरूपाचा प्रसाद प्राप्त झाल्यावर त्याला अप्राप्य असा कोणता लाभ आहे?॥ १२५९॥

**चेतसा सर्वकर्माणि मयि सन्न्यस्य मत्परः। बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव॥ ५७॥**

**अर्थ**—अंतःकरणपूर्वक सर्व कर्मे माझ्या ठिकाणी समर्पण करून व मत्पर होत बुद्धियोगाच्या आश्रयाने आपले चित्त माझ्या ठिकाणी सतत ठेव॥ ५७॥

**याकारणें गा तुवां इया। सर्व कर्मा आपुलिया। माझ्या स्वरूपीं धनंजया। संन्यासु कीजे॥ १२६०॥**

**अर्थ**—या करता, अर्जुना, तू आपल्या सर्व कर्मांचा माझ्या सगुण स्वरूपाचे ठिकाणी संन्यास कर. (सर्व कर्मे मला समर्पण कर)॥ १२६०॥

**परी तोचि संन्यासु वीरा। करणीयेचा झणें करा। आत्मविवेकीं धरा। चित्तवृत्ति हे॥ १२६१॥**

**अर्थ**—परंतु अर्जुना, हा नित्य कर्माचा संन्यास नव्हे! आपली चित्तवृत्ती तू आत्मविचाराकडे लाव॥ १२६१॥

**मग तेणें विवेकबळें। आपणपें कर्मावेगळें। माझ्या स्वरूपीं निर्मळे। देखिजेल सर्व॥ १२६२॥**

**अर्थ**—मग त्या आत्मविचाराच्या सामर्थ्याने तुला आपल्याला कर्माहून वेगळे करता येऊन माझ्या निर्मळ स्वरूपाच्या ठिकाणी सर्व असल्याचे तुला दिसून येईल.॥ १२६२॥

**आणि कर्माची जन्मभोये। प्रकृति जे का आहे। ते आपणयाहूनि बहुवे। देखसी दूरीं॥ १२६३॥**

**अर्थ**—आणि कर्माची जन्मभूमी जी प्रकृती आहे ती (आपल्याहून) आत्मस्वरूपापासून खूपच दूर आहे असे तूं पाहशील॥ १२६३॥

**तेथ प्रकृति आपणयां-। वेगळी नुरे धनंजया। रूपेंवीण का छाया। जयापरी॥ १२६४॥**

**अर्थ**—मग अर्जुना, पदार्थाहून छाया जशी अलग राहू शकत नाही तशी ती प्रकृतीही आत्मस्वरूपाहून वेगळी उरणार नाही. ॥ १२६४ ॥

**ऐसेनि प्रकृतिनाशु। जालया कर्मसंन्यासु। निफजेल अनायासु। सकारणु॥ १२६५ ॥**

**अर्थ**—अशा प्रकारे प्रकृतीचा नाश झाल्यावर कारणासहित कर्मसंन्यास आपोआपच घडून येईल॥ १२६५ ॥

**मग कर्मजात गेलिया। मी आत्मा उरें आपणयां। तेथ बुद्धि घापे करूनियां। पतिव्रता॥ १२६६ ॥**

**अर्थ**—अशा प्रकारे सर्व कर्मे नाहीशी झाल्यावर मग केवळ मी आत्मा आपल्या ठिकाणी उरतो. त्याठिकाणी तूं आपली बुद्धी पतिव्रतेसारखी एकनिष्ठ करून ठेवावी॥ १२६६ ॥

**बुद्धि अनन्यें येणें योगें। मजमाजीं जैं रिगे। तैं चित्त चैत्यत्यागें। मातेंचि भजे॥ १२६७॥**

**अर्थ**—या रीतीने अनन्य असणाऱ्या भक्तीने बुद्धी माझ्या ठिकाणी रममाण झाली म्हणजे चित्तही आपले विषय-चिंतन टाकून देऊन केवळ माझ्याच ठिकाणी रंगते. ॥ १२६७ ॥

**ऐसें चैत्यजातें सांडिलें। चित्त माझ्या ठायीं जडलें। ठाके तैसें वहिलें। सर्वदा करी॥ १२६८ ॥**

**अर्थ**—अशाप्रकारे सर्व विषयचिंतन सोडून देऊन चित्त माझ्याच ठिकाणी सर्वदा जडून राहील असाच साधनमार्ग तूं लवकर कर. ॥ १२६८ ॥

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि । अथ चेत्त्वमहङ्कारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि॥ ५८ ॥**

**अर्थ**—मत्स्वरूप झालेला तूं माझ्या कृपेने सर्व जन्ममरणरूप संकट परंपरा तरून जाशील. पण अहंकाराने जर तूं मी सांगतो ते ऐकणार नाहीस तर मात्र नाश पावशील. ॥ ५८ ॥

**मग अभिन्ना इया सेवा। चित्त मियांचि भरेल जेव्हां। माझा प्रसादु जाण तेव्हां। संपूर्ण जाहला॥ १२६९ ॥**

अर्थ—मग या अभिन्न सेवेने (अभेद भक्तीने) चित्तात मी भरून जाईन तेव्हा माझी कृपा पूर्ण झाली असे समज॥ १२६९ ॥

**तेथ सकळदुःखधामें। भुंजीजती जियें मृत्युजन्में। तियें दुर्गमेंचि सुगमें। होती तुज॥ १२७० ॥**

**अर्थ**—ज्या जन्ममृत्युमुळे सर्व दुःखे भोगली जातात ती अटळ असल्यामुळे त्यातून पार पडणे दुस्तर असले तरी तुला मात्र त्यातून सहज पार पडता येईल॥ १२७० ॥

**सूर्याचेनि सावायें। डोळा सावाइला होये। तैं आंधाराचा आहे। पाडु तया॥ १२७१ ॥**

**अर्थ**—सूर्याच्या मदतीचा हात डोळ्याला मिळाल्यावर त्या डोळ्यांना आंधाराची काय किंमत?॥ १२७१ ॥

**तैसा माझेनि प्रसादें। जीवकणु जयाचा उपमर्दे। तो संसाराचेनि बाधे। बागुलें केवीं॥ १२७२ ॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे माझ्या कृपाप्रसादाने ज्याच्या जीवभावाचा कण पूर्णपणे नाहीसा झालेला आहे त्याला संसाराचा वागुलबोवा काय त्रास देणार?॥ १२७२ ॥

**म्हणौनि धनंजया। तूं संसारदुर्गती यया। तरसील माझिया। प्रसादास्तव॥ १२७३ ॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना, माझ्या कृपाप्रसादाने या संसाररूपी वाईट गतीतून तू पार पडशील॥ १२७३ ॥

**अथवा हन अहंभावें। माझें बोलणें हें आघवें। कानामनाचिये शिंवे। नेदिसी टेंकों॥ १२७४॥**

**अर्थ**—पण जर अहंकारामुळे माझे हे सर्व बोलणे आपल्या कानाच्या व मनाच्या हद्दीलाही शिवू देणार नाहीस. ॥ १२७४ ॥

**तरी नित्य मुक्त अव्ययो। तूं आहासि तें होऊनि वावो। देहसंबंधाचा घावो। वाजेल आंगीं॥ १२७५ ॥**

**अर्थ**—तर मग तू नित्यमुक्त व अव्यक्त असूनही ते सारे व्यर्थ होऊन देहाभिनाचा घाव तुला लागल्याशिवाय रहाणार नाही. ॥ १२७५ ॥

**जया देहसंबंधाआंतु। प्रतिपदीं आत्मघातु। भुंजतां उसंतु। कहींच नाहीं॥ १२७६ ॥**

**अर्थ**—ज्या देहतादात्म्यात पावलोपावली आत्मघात आहे व त्याचे फळ भोगत असता उसंत कधीच मिळत नाही ॥ १२७६ ॥

**येवढेनि दारुणें। निमणेनवीण निमणें। पडेल जरी बोलणें। नेघसी माझें॥ १२७७॥**

अर्थ—माझे हे बोलणे जर मनावर घेणार नाहीस तर मरण नसतानाही (आत्मदृष्टीने) येवढे भयंकर मरण तुला भोगावे लागेल॥ १२७७॥

**यदहङ्कारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे । मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति॥ ५९॥**

**अर्थ**—अहंकाराच्या बळावर 'मी युद्ध करणार नाही' असा जो तू विचार करीत आहेस तो तुझा निश्चय व्यर्थ आहे. प्रकृतीच तुला युद्ध करण्याला प्रवृत्त करील. ॥ ५९ ॥

**पथ्यद्वेषिया पोषी ज्वरु। कां दीपद्वेषिया अंधकारु। विवेकद्वेषें अहंकारु। पोषूनि तैसा॥ १२७८॥**

**अर्थ**—पथ्याचा द्वेष करणारा जसा ज्वराला पोसतो किंवा दिव्याचा द्वेष करणारा जसा अंधाराला बाळगतो त्याप्रमाणे विवेकाच्या द्वेषाने अहंकार बळावून॥ १२७८॥

**स्वदेहा नाम अर्जुनु। परदेहा नाम स्वजनु। संग्रामा नाम मलिनु। पापाचारु॥ १२७९॥**
**इया मती आपुलिया। तिघां तीन नामें ययां। ठेऊनियां धनंजया। न जुंझें ऐसा॥ १२८०॥**
**जीवामाजीं निष्टंकु। करिसी जो आत्यंतिकु। तो वायां धाडील नैसर्गिकु। स्वभावोचि तुझा॥ १२८१॥**

**अर्थ**—आपल्या देहाला अर्जुन व दुसऱ्यांच्या देहांना सगेसोयरे असे नाव देऊन व युद्धाला वाईट व पापकारक कृत्य असे म्हणून॥ १२७९॥ अर्जुना, अशा आपल्या या विचारसरणीने तिघांना तीन नावे देऊन मी लढणार नाही असा॥ १२८०॥ जो तू आपल्या मनात ठाम निश्चय केला आहेस त्या निश्चयाला तुझा जन्मजात क्षात्रस्वभावच व्यर्थ करून टाकील. ॥ १२८१॥

**आणि मी अर्जुनु हे आत्मिक। ययां वधु करणें हें पातक। हें माया वांचूनि तात्त्विक। कांहीं आहे॥ १२८२॥**

**अर्थ**—आणि मी अर्जुन व हे माझे आप्तेष्ट, यांचा वध करणे हे पाप आहे या म्हणण्यात भ्रमावाचून दुसरा काही तात्विक भाग आहे?॥ १२८२॥

**आधीं जुंझार तुवां होआवें। मग जुंझावया शस्त्र घेयावें। कां न जुंझावया करावें। देवांगण॥ १२८३॥**

**अर्थ**—आधी तूं लढण्यास हो, मग लढण्याकरता शस्त्रें ग्रहण कर किंवा न लढण्याची शपथ तरी घे॥ १२८३॥

**म्हणौनि न जुंझणें। म्हणसी तें वायाणें। ना मानूं लोकपणें। लोकदृष्टीही॥ १२८४॥**

**अर्थ**—म्हणून मी लढत नाही ही भाषा व्यर्थच आहे. हे तिऱ्हाइतपणे व लोकदृष्टीनेही बरोबर नाही॥ १२८४॥

**तऱ्ही न जुंझें ऐसें। निष्टंकिसी जें मानसें। तें प्रकृति अनारिसें। करवीलचि॥ १२८५॥**

**अर्थ**—तरी मी लढणार नाही असा जो तूं मनाने निर्धार करीत आहेस, तो तुझा निर्धार तुझी क्षात्र प्रकृती निष्फळ करीलच॥ १२८५॥

**स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा। कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत्॥ ६०॥**

**अर्थ**—अर्जुना, प्रकृतिसिद्ध असलेल्या स्वतःच्या कर्मामुळे बद्ध झालेला तू, मोहामुळे जे कर्म करूं इच्छित नाहीस, ते कर्म तूं (अगतिक होऊनच करशील) केल्याशिवाय रहाणार नाहीस॥ ६०॥

**पैं पूर्वे वाहतां पाणी। पव्हिजे पश्चिमेचे वाहणीं। तरी आग्रहो उरे तें आणी। आपुलिया लेखा॥ १२८६॥**

**अर्थ**—पाणी पूर्वेकडे वहात असता आपण पश्चिमेकडे पोहूं लागलो तर, आपला हट्ट तेवढा दिसणार. बाकी ते (पाणी) त्याला आपल्याच वळणाला आणणार!॥ १२८६॥

**का साळीचा कणु म्हणे। मी नुगवें साळीपणें। तरी आहे आन करणें। स्वभावासी॥ १२८७॥**

**अर्थ**—किंवा साळीचा दाणा 'मी साळीपणाने उगवणार नाही' म्हणू लागला तर स्वभावाच्या विरूद्ध करणे त्याला शक्य आहे?॥ १२८७॥

**तैसा क्षात्रसंस्कारसिद्धा। प्रकृती घडिलासी प्रबुद्धा। आतां नुठी म्हणसी हा धांदा। परी उठविजसीचि तूं॥ १२८८॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे हे बुद्धिमंता, क्षात्र संस्काराने तुझी प्रकृती बनलेली आहे. आता तूं (युद्धकरण्यास) उठत नाही म्हणतोस, पण युद्धधर्माचा हा व्यवहार तुला उठवल्याशिवाय राहणार नाही॥ १२८८॥

**पैं शौर्य तेज दक्षता। एवमादिक पांडुसुता। गुण दिधले जन्मतां। प्रकृती तुज॥ १२८९॥**

**अर्थ**—अर्जुना, शौर्य, तेज, दक्षता इत्यादि गुण प्रकृतिने तूला जन्मताच दिलेले आहेत.॥ १२८९॥

**तरी तयांचिया समवाया-। अनुरूप धनंजया। न करितां उगलिया। नयेल असों॥ १२९०॥**

**अर्थ**—तर अर्जुना, त्या गुणांच्या समुच्चयानुरूप (त्यांच्या स्वभावानुरूप) तूं जर करणार नाहीस तर ते गुण तुला स्वस्थ बसवणार नाहीत॥ १२९०॥

**म्हणौनियां तिहीं गुणीं। बांधलासि तूं कोदंडपाणी। त्रिशुद्धी निघसी वाहणीं। क्षात्राचिया॥ १२९१॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना, तूं त्या (शौर्यादि) गुणांनी बांधला गेला आहेस. म्हणूंनच तू क्षात्रधर्माच्या प्रवाहाने जाशील हे निश्चित आहे.॥ १२९१॥

**ना हें आपुलें जन्ममूळ। न विचारीतचि केवळ। न जुंझें ऐसें अढळ। व्रत जरी घेसी॥ १२९२॥**
**तरी बांधोनि हात पाये। जो रथीं घातला होये। तो न चले तरी जाये। दिगंता जेवीं॥ १२९३॥**
**तैसा तूं आपुलियाकडुनी। मी कांहींच न करीं म्हणौनी। ठासी परी भरंवसेनि। तूंचि करिसी॥ १२९४॥**

**अर्थ**—अथवा आपल्या जन्मजात मूळ प्रकृतिचा विचार न करताच केवळ मी लढणार नाही असे जर अढळ व्रत घेशील॥ १२९२॥ तर हातपाय बांधून, रथात टाकलेला जरी पायाने चालत नसला तरी दूर देशाला ज्याप्रमाणे जातोच.॥ १२९३॥ त्या प्रमाणे तूं आपण स्वत: काहीच करणार नाही असे म्हणून स्वस्थ बसलास तरी खात्रीने तूंच (युद्ध) करशील॥ १२९४॥

**उत्तरु वैराटींचा राजा। पळतां तूं कां निघालासि जुंझा। हा क्षात्रस्वभावो तुझा। जुंझवील तुज॥ १२९५॥**

**अर्थ**—विराट देशाचा राजा उत्तर तो युद्धात पळत असता तू त्यावेळी लढाईस कां निघालास? तुझा हा क्षात्र स्वभावच तुला लढायला लावील.॥ १२९५॥

**महावीर अकरा अक्षौहिणी। तुवां येकें नागविले रणांगणीं। तो स्वभावो कोदंडपाणी। जुंझवील तूतें॥ १२९६॥**

**अर्थ**—हे अर्जुना, अकरा अक्षौहिणी असलेले मोठे बलाढ्य वीर युद्धांत तूं एकट्याने मोहनास्त्राचा प्रयोग करून नागविलेस (पराजित केलेस) तो तुझा स्वभावच (क्षात्रवृत्ती) तुला युद्ध करावयाला लावील.॥ १२९६॥

**हां गा रोगु कायी रोगिया। आवडे दरिद्र दरिद्रिया। परी भोगविजे बळिया। अदृष्टें जेणें॥ १२९७॥**

**अर्थ**—अरे रोग्याला रोग आणि गरीबाला गरिबी काय आवडत असते! परंतु ज्या बलवान् प्रारब्धाने या वाईट गोष्टी भोगविल्या जातात.॥ १२९७॥

**तें अदृष्ट अनारिसें। न करील ईश्वरवशें। तो ईश्वरुही असे। हृदयीं तुझ्या॥ १२९८॥**

**अर्थ**—तें प्रारब्ध ईश्वराधीन असल्यामुळे वेगळे काही करणार नाही व तो ईश्वरही तुझ्याच हृदयात वास करीत आहे.॥ १२९८॥

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति। भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया॥ ६१॥

**अर्थ**—अर्जुना यंत्रावर जणूं काय चढवलेल्या सर्व प्राणिमात्रांना (आपल्या) मायेच्या योगाने फिरवणारा ईश्वर सर्व प्राणीमात्रांच्या हृदयाच्या ठिकाणी स्थित आहे.॥ ६१॥

**सर्व भूतांच्या अंतरीं। हृदयमहाअंबरीं। चिद्वृत्तीच्या सहस्त्रकरीं। उदयला असे जो॥ १२९९॥**

**अर्थ**—सर्व प्राणीमात्रांच्या आत हृदयरूपी महा आकाशात चैतन्य वृत्तींच्या सहस्त्रकिरणांनी युक्त असलेला ईश्वररूपी असा जो उदयाला आला आहे.॥ १२९९॥

**गूढार्थदीपिका**—चित्वृत्तीचिया सहस्त्रकरी। उदयला असे जो।

आत्मा हा चैतन्याचा सागर आहे. चैतन्याचा स्वभाव स्फुरणरूप असल्याकारणाने त्या चैतन्याच्या सागरावर शुद्ध चैतन्यमय लहरी उठतात. ज्याप्रमाणे आकाशाच्या ठिकाणी वायु स्वभावत:च स्फुरतो त्याप्रमाणे चैतन्याच्या समुद्रावर आत्मस्वरूपाची चैतन्यशक्ती लहरीच्या रूपांनी स्फुरण पावते. हे स्फुरण अर्थातच निरुपाधिकच असते अज्ञानी जीव मात्र याच सच्चिदानंद स्फूर्तीवर आपल्या अज्ञानामुळे सृष्टीचा आरोप करतो.

सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी **'अहं बहुस्याम् प्रजायेय'** मी पुष्कळ स्वरूपाचे व्हावे अशी परब्रह्माच्या ठिकाणी संकल्प स्फूर्ती होते असे तैत्तिरीय उपनिषदात सांगितले आहे. त्यावर भाष्य करतांना श्रीशंकराचार्य म्हणतात **''सत्यज्ञानलक्षणाः स्वात्मभूतत्वाद्विशुद्धाः''** परब्रह्माची मी बहुस्वरूप व्हावे ही संकल्पस्फूर्ती आत्मस्वरूपाशी एकरूप व सच्चिदानंदस्वरूपच असते. हे शक्तिरूपाने परब्रह्माचे होणारे स्फुरण सर्वांच्याच हृदयात असते व म्हणूनच सर्व सृष्टीचे कारण जो ईश्वर किंवा शिव, तो सर्व जीवांच्या हृदयामध्ये अनंत चैतन्य वृत्तींसह प्रगट झाला आहे असे श्रीज्ञानेश्वर महाराज या ओवीत सांगतात.

त्याची ओळख आपल्याला आपल्या ठिकाणी उठणाऱ्या 'मी' या वृत्तीने होते. आचार्य म्हणतात **''तस्मात्सर्व शरीरेष्वमहमित्येव भासते स्पष्टः। यः प्रत्ययोऽपि शुद्धस्तस्य ब्रह्मैव भवति मुख्योऽर्थः''** सर्वांच्या शरीरात 'मी' मी म्हणून जे स्फुरण होते त्याचा मुख्य अर्थ परब्रह्मच आहे. आचार्यांनी हीच गोष्ट **'अहं शब्देन विख्यातः एक एव स्थितः परः'** यातही सांगितली आहे. देहाचा अहंकार सोडून देऊन आपल्याठिकाणी केवळ 'मी' 'मी' म्हणून स्फूरण होते तेच परब्रह्म होय. श्रीज्ञानेश्वर महाराजांनीही ज्ञाने० अ० १८ ओवी १३१५ मध्ये हेच सांगितले आहे.

**अवस्थात्रय तिन्ही लोक। प्रकाशूनि अशेख। अन्यथादृष्टि पांथिक। चेवविले॥ १३००॥**

**अर्थ**—जागृति, स्वप्न व सुषुप्ती या तिन्हीही अवस्था व स्वर्ग, मृत्यु व पाताळ हे तिन्ही लोक यांना पूर्णत: प्रकाशित करून विपरीत ज्ञानाने भुललेले जीव ज्याने जागे केले आहेत. ॥ १३०० ॥

**वेद्योदकाच्या सरोवरीं। फांकतां विषयकल्हारीं। इंद्रियषट्पदाचारी। जीवभ्रंमरातें॥ १३०१॥**

**अर्थ**—दृश्य जगद्रूपी पाण्याच्या सरोवरात विषयरूपी कमळांना (शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध) उमलवून इंद्रियरूपी सहा पाय (श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिव्हा, घ्राण व मन) असलेल्या जीवरूप भ्रमराकडून त्या कमळांचे सेवन करवतो॥ १३०१ ॥

**असो रूपक हें तो ईश्वरु। सकल भूतांचा अहंकारु। पांघरोनि निरंतरु। उल्हासत असे॥ १३०२॥**

**अर्थ**—हे रूपक राहू दे. सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी, मीपणाने स्फुरणारा जो अहंकार, (समष्टिरूप) तो पांघरून, तो ईश्वर निरंतर विलसत असतो. ॥ १३०२ ॥

**स्वमायेचें आडवस्त्र। लावूनि एकला खेळवी सूत्र। बाहेरी नटी छायाचित्र। चौऱ्याशीं लक्ष॥ १३०३॥**

अर्थ—आपल्या मायेचा पडदा लावून आतून एकटाच दोरी हालवितो व पडद्याच्या बाहेरच्या बाजूला चौऱ्यासी लक्ष योनीरूपी चित्रे नाचवितो. ॥ १३०३ ॥

**तया ब्रह्मादिकीटांता। अशेषाही भूतजातां। देहाकार योग्यता। पावोनि दावी॥ १३०४॥**

**अर्थ**—ब्रह्मदेवापासून तो कीटकापर्यंत संपूर्ण प्राणिमात्रांना ज्यांची योग्यता (पापपुण्यरूप) पाहून त्यांना तो देहाकार देतो. ॥ १३०४॥

**तेथ जें देह जयापुढें। अनुरूपपणें मांडे। तें भूत तया आरूढे। हें मी म्हणौनि॥ १३०५॥**

**अर्थ**—तेव्हा जो देहाचा आकार ज्या प्राण्याच्या कर्मानुसार त्याच्यापुढे मांडला जातो त्या देहाच्या आकारावर तो प्राणी ''मीच तो देह आहे'' असे म्हणून त्यावर आरूढ होतो. ॥ १३०५ ॥

**सूत सूतें गुंतलें। तृण तृणेंचि बांधलें। का आत्मबिंबा घेतलें। बाळकें जळीं॥ १३०६॥**
**तयापरी देहाकारें। आपणपेंचि दुसरें। देखोनि जीव आविष्करे। आत्मबुद्धी॥ १३०७॥**

**अर्थ**—सुताचा गुंडाळा जसा सुतानेच बांधला असतो, किंवा गवताची पेंडी जशी गवतानेच बांधलेली असते

किंवा पाण्यात पडलेल्या आपल्या प्रतिबिंबाला लहान मूळ जसे आपणच आहो असे समजते॥ १३०६॥ त्याचप्रमाणे देहाच्या आकाराच्या रूपाने आपलेच दुसरे रूप समजून जीव त्या देहाच्या ठिकाणी तादात्म्यबुद्धीने प्रगटतो म्हणजे देहरूप आकाराने जो दुसरा तो मीच आहे म्हणून तिथे (भ्रमाने) मीपणा धारण करतो.॥ १३०७॥

**ऐसेनि शरीराकारीं। यंत्रीं भूतें अवधारीं। वाहूनि हालवी दोरी। प्राचीनाची॥ १३०८॥**

**अर्थ**—याप्रमाणे शरीराच्या आकाररूपी यंत्रावर यच्चयावत् प्राणीमात्र बसवून ईश्वर प्रारब्ध कर्माची दोरी हालवितो.॥ १३०८॥

**तेथ जया जें कर्मसूत्र। मांडूनि ठेविलें स्वतंत्र। तें तिये गती पात्र। होंचि लागे॥ १३०९॥**

**अर्थ**—तेव्हा ज्या प्राण्याचे जे स्वतंत्र प्रारब्धकर्मरूपी सूत्र ठरवून ठेवलेले असते त्यानुसार तो प्राणी त्या गतीला पात्र होतोच.॥ १३०९॥

**किंबहुना धनुर्धरा। भूतांतें स्वर्गसंसारा-। माजी भोवंडी तृणें वारा। आकाशीं जैसी॥ १३१०॥**

**अर्थ**—फार काय सांगायचे! अर्जुना, वारा जसा पाला पाचोळा आकाशांत ज्याप्रमाणे गरगर फिरवतो, त्याप्रमाणे हा ईश्वर प्राण्यांना स्वर्गादिसंसारामध्ये फिरवीत असतो.॥ १३१०॥

**भ्रामकाचेनि संगें। जैसे लोहो वेढा रिगे। तैसीं ईश्वरसत्तायोगें। चेष्टती भूतें॥ १३११॥**

**अर्थ**—लोहचुंबकाच्या सान्निध्याने लोखंड ज्याप्रमाणे गोल गोल फिरते त्याप्रमाणे ईश्वराच्या सत्तेच्या योगाने (सामर्थ्याने) सर्व प्राणीमात्र आपापला व्यवहार करतात.॥ १३११॥

**जैसे चेष्टा आपुलिया। समुद्रादिक धनंजया। चेष्टती चंद्राचिया। सन्निधी येकी॥ १३१२॥**
**तया सिंधू भरितें दाटे। सोमकांत पाझरु फुटे। कुमुदांचकोरांचा फिटे। संकोचु तो॥ १३१३॥**
**तैसीं बीजप्रकृतिवशें। अनेकें भूतें येकें ईशें। चेष्टविजती तो असे। तुझ्या हृदयीं॥ १३१४॥**

**अर्थ**—अर्जुना चंद्राच्या एका सान्निध्याने समुद्रादिक आपापली हालचाल करतात॥ १३१२॥ समुद्राला भरती येते चंद्रकांत मण्याला पाझर फुटतो, चंद्रविकासी कमळांचा व चकोर पक्षांचा संकोच नाहीसा होतो.॥ १३१३॥ त्याप्रमाणे कारणरूप प्रकृती (अज्ञान) च्या स्वाधीन झालेले प्राणिमात्र ज्या एका ईश्वराकडून चेष्टविले जातात व तो ईश्वर तुझ्या हृदयात आहे.॥ १३१४॥

**अर्जुनपण न घेतां। मी ऐसें जें पांडुसुता। उठतसे तें तत्त्वता। तयाचें रूप॥ १३१५॥**

**अर्थ**—अर्जुना, अर्जुनपणाची जाणीव सोडून देऊन तुझ्या ठिकाणी 'मी' असे जे स्फुरते, तेच खरोखर ईश्वराचे स्वरूप आहे.॥ १३१५॥

**गूढार्थदीपिका—अर्जुनपण न घेतां। मी ऐसे जे पांडुसुता।**

अर्जुनपणा म्हणजे देहाचा अहंकार सोडून आपल्याठिकाणी 'मी' पणा जो स्फुरतो तोच ईश्वर होय, हे ईश्वराचे स्फुरण असले तरी स्फुरणामुळेच ते मर्यादित आहे. या स्फुरणात ज्ञान व आनंद किंवा प्रेम आहे. हे वस्तूत: निरुपाधिक स्फुरण असताना, आपण हे 'मी' पण देहाला धरून बाळगतो त्यामुळे अमर्याद व निरुपाधिक असलेलेच स्फुरण सोपाधिक व मर्यादित होते. 'तत्वमसि' या महावाक्याच्या उपदेशाने जेव्हा देहावरील 'मी' पणा आपण सोडून देऊन तो आत्म्याच्या ठिकाणी स्थापन करतो, तेव्हा तेच शुद्ध किंवा विद्यावृत्तीचे स्फुरण होते. व तेच 'मी' स्फुरण परमात्मा होते, 'अहं ब्रह्मास्मि' ज्ञानातील हा शुद्ध 'अहं' अर्जुनपणा म्हणजे देहाचा अहंकार सोडून रहात असतो. याच शुद्ध 'अहं' विद्यावृत्तीने त्या शुद्ध अहंला आधारभूत असलेल्या व्यापक ब्रह्माला व्याप्त केले जात असल्यामुळे ब्रह्मज्ञानात ''वृत्तीव्याप्ती'' राहते 'फलव्याप्ती' राहत नाही असे वेदान्ती म्हणतात.

**यालागीं तो प्रकृतीतें। प्रवर्तवील हें निरुतें। आणि जुंझवील तूतें। न जुंझसी जरी॥ १३१६॥**

**अर्थ**—ह्या करिताच तो ईश्वर प्रकृतीला प्रवृत्त करील हे निश्चित आहे. आणि तू जरी युद्ध करणार नसलास तरी तीं प्रकृती तुला युद्ध करायला लावील.॥ १३१६॥

**म्हणोनि ईश्वरु तो गोसावी। तेणें प्रकृती हे नेमावी। तिया सुखें राबवावीं। इंद्रिये आपुलीं॥ १३१७॥**

**अर्थ**—म्हणून ईश्वर हा स्वामी असून तो प्रकृतीचे नियमन करतो व इंद्रियांकडून त्यांची कामे तो बिना आयास करून घेते. ॥ १३१७॥

**तूं करणें न करणें दोन्ही। लाऊनि प्रकृतीच्या मानीं। प्रकृतीही का अधीनी। हृदयस्था जया॥ १३१८॥**

**अर्थ**—प्रकृति ही हृदयांत रहाणाऱ्या ज्या ईश्वराच्या स्वाधीन आहे त्या प्रकृतीकडे करणे न करणे या दोन्ही गोष्टी तूं सोपवून दे. ॥ १३१८॥

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत। तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम्॥ ६२॥**

**अर्थ**—हे भरतकुलोत्पन्ना! मन वाणी आणि शरीर या सर्वभावाने तू त्यालाच शरण जा. त्याच्या कृपेने तुला अत्यंत श्रेष्ठ शान्ती व शाश्वत स्थान प्राप्त होईल. ॥ ६२॥

**तया अहं वाचा चित्त आंग। देऊनियां शरण रिग। महोदधी का गांग। रिगालें जैसें॥ १३१९॥**

**अर्थ**—गंगेचे पाणी जसे महासागराला मिळते त्याप्रमाणे त्याला अहं, वाचा, मन व काया अर्पण करून शरण जा. ॥ १३१९॥

**मग तयाचेनि प्रसादें। सर्वोपशांतिप्रमदे। कांतु होऊनियां स्वानंदें। स्वरूपींच रमसी॥ १३२०॥**

**अर्थ**—मग त्या ईश्वराच्या कृपाप्रसादाने शांतिरूपी प्रमदेचा (स्त्री) पती होउन तूं आत्मानंदाने स्वस्वरूपातच रममाण होशील॥ १३२०॥

**संभूति जेणें संभवे। विश्रांति जेथें विसंवे। अनुभूतिही अनुभवे। अनुभवा जया॥ १३२१॥**

**अर्थ**—उत्पत्ती ज्याच्यामुळे संभवते, विश्रांतीलाही जेथे विसावा मिळतो व अनुभवालाही अनुभव घडतो॥ १३२१॥

**तिये निजात्मपदींचा रावो। होऊनि ठाकसी अव्ययो। म्हणे लक्ष्मीनाहो। पार्था तूं गा॥ १३२२॥**

**अर्थ**—लक्ष्मीचा पती म्हणाला, अर्जुना, तू त्या अशा स्वत:च्या आत्मस्वरूपाचा नित्य राजा होऊन राहशील॥ १३२२॥

**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया। विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु॥ ६३॥**

**अर्थ**—गूढाहून अत्यंत गूढ असे ज्ञान तुला मी सांगितले याचा विचार करून तुझी जशी इच्छा असेल, त्याप्रमाणे कर. ॥ ६३॥

**हें गीतानाम विख्यात। सर्ववाङ्मयाचें मथित। आत्मा जेणें हस्तगत। रत्न होय॥ १३२३॥**

**अर्थ**—ज्याच्या योगाने आत्मज्ञानासारखे रत्न प्राप्त होते, असे हे गीता नावाचे प्रसिद्ध असलेले सर्व वाङ्मयाचे मंथन करून काढलेले सार आहे॥ १३२३॥

**ज्ञान ऐसिया रूढी। वेदांतें जयाची प्रौढी। वानितां कीर्ति चोखडी। पातली जगीं॥ १३२४॥**

**अर्थ**—वेदान्ताने 'ज्ञान' या नावाने ज्या गीताशास्त्राचा मोठेपणा वर्णन केल्यामुळे जगात ज्याला खूप ख्याती प्राप्त झाली. ॥ १३२४॥

**बुद्ध्यादिकें डोळसें। हें जयाचें का कडवसें। मी सर्वद्रष्टाही दिसें। पाहला जया॥ १३२५॥**

**अर्थ**—बुद्ध्यादिक डोळस पदार्थ हे ज्या गीताशास्त्राच्या ज्ञानाचे कडवसे आहेत व मी जो द्रष्ट्रस्वरूप त्याचे ज्ञानही ज्या गीता शास्त्रामुळे अनुभवाला येते. ॥ १३२५॥

**तें हें गा आत्मज्ञान। मज गोप्याचेंही गुप्त धन। परी तूं म्हणूनि आन। केवीं करूं॥ १३२६॥**

**अर्थ**—अशा तऱ्हेचे हे आत्मज्ञान (गीतारूपी) माझ्या सारख्याला अत्यंत गोपनीय आहे. परंतु तू असल्यामुळे तुझ्यापासून कसे लपवून ठेवू?॥ १३२६॥

**याकारणें गा पांडवा। आम्हीं आपला हा गुप्त ठेवा। तुज दिधला कणवा। जाकळिलेपणें॥ १३२७॥**

**अर्थ**—अर्जुना, म्हणूनच आम्ही आपला हा गुप्त ठेवा करुणेने ओथंबल्यामुळे तुला दिला आहे. ॥ १३२७॥

**जैसी भुलली वोरसें। माय बोले बाळादोषें। प्रीति ही परी तैसें। न करूंचि हो॥ १३२८॥**

**अर्थ**—प्रेम पान्हयाने भुललेली आई जशी आपल्या बाळाला खोटे खोटेच (त्याचे दोष दाखवूनच) बोलत असते व तो प्रेमाचाच व्यवहार असतो परंतु आम्ही तसे करणार नाही॥ १३२८॥

**येथ आकाश आणि गाळिजे। अमृताही सालि फेडिजे। का दिव्याकरवीं करविजे। दिव्य जैसें॥ १३२९॥**
**जयाचेनि अंगप्रकाशें। पाताळींचा परमाणु दिसे। तया सूर्याहि का जैसें। अंजन सूदलें॥ १३३०॥**
**तैसें सर्वज्ञेंही मियां। सर्वही निर्धारूनियां। निकें होय तें धनंजया। सांगितलें तुज॥ १३३१॥**

**अर्थ**—आकाशही जसे गाळून घ्यावे, अमृताचीही जशी साल काढावी, किंवा दिव्याकडून जसे दिव्य करण्यास लावावे.॥ १३२९॥ ज्याच्या आंगच्या प्रकाशाने पाताळात असलेलाही परमाणु देखील दिसतो त्या सूर्याच्याही डोळ्यात जसे अंजन घालावे.॥ १३३०॥ त्याप्रमाणे अर्जुना, सर्वज्ञ अशा मी तुला सर्व बाजूंनी विचार करून खरे काय तेच सांगितले॥ १३३१॥

**आतां तूं ययावरी। निकें हें निर्धारीं। निर्धारूनि करीं। आवडे तैसें॥ १३३२॥**

**अर्थ**—आता यावर तू विचार करून खरे तत्त्व कोणते ते निश्चित कर व तुला जे आवडेल ते कर.॥ १३३२॥

**यया देवाचिया बोला। अर्जुनु उगाचि ठेला। तेथ देवो म्हणती भला। अवंचकु होसी॥ १३३३॥**

**अर्थ**—या देवाच्या बोलण्यावर अर्जुन उगाच राहिला. देव अर्जुनाला म्हणतात. तू बराच भिडस्त आहेस.॥ १३३३॥

**वाढितया पुढें भुकेला। उपरोधें म्हणे मी धाला। तैं तोचि पीडे आपुला। आणि दोषुही तया॥ १३३४॥**
**तैसा सर्वज्ञु श्रीगुरु। भेटलिया आत्मनिर्धारु। न पुसिजे जैं आभारु। धरूनियां॥ १३३५॥**

**अर्थ**—वाढणाऱ्यापुढे भुकेला मनुष्य भूक असून भिडेने "मी तृप्त झालो" म्हणाला तर त्या भुकेमुळे त्रासही होतो आणि खोटे बोलल्याचा दोषही लागतो.॥ १३३४॥ त्याप्रमाणे सर्वज्ञ श्रीगुरू भेटले असता भीड धरून जर आत्मज्ञान विचारून घेतले नाही॥ १३३५॥

**तैं आपणपेंचि वंचे। आणि पापही वंचनाचें। आपणयाचि साचे। चुकविलें तेणें॥ १३३६॥**

**अर्थ**—तेव्हा आपणच आपल्याला फसविल्यासारखे होते व फसवल्याचे पापही लागते. खरे तर ज्याने आपल्यालाच आपल्या सत्यस्वरूपाला मुकवलेले असते.॥ १३३६॥

**पैं उगेपणा तुझिया। हा अभिप्रावो कीं धनंजया। जें एकवेळ आवांकुनियां। सांगावें ज्ञान॥ १३३७॥**

**अर्थ**—परंतु अर्जुना, तुझ्या उगेपणामुळे मला असे वाटते की पुन्हा एकवेळ मी ते सर्व ज्ञान साररूपाने सांगावे.॥ १३३७॥

**तेथ पार्थु म्हणे दातारा। भलें जाणसी माझिया अंतरा। हें म्हणों तरी दुसरा। जाणता असे काई॥ १३३८॥**

**अर्थ**—तेव्हा अर्जुन म्हणाला! हे उदार भगवंता, आपण माझे अंत:करण बरोबर जाणता. पण असे म्हणणेही व्यर्थच आहे. तुमच्या शिवाय दुसरा कोणी जाणता आहे काय?॥ १३३८॥

**येर ज्ञेय हें जी आघवें। तूं ज्ञाता एकचि स्वभावें। मा सूर्यु म्हणौनि वानावें। सूर्यातें काई॥ १३३९॥**

**अर्थ**—स्वाभाविकपणे तुम्हीच एक ज्ञाता आहात, बाकी सर्व यच्चयावत् ज्ञेय आहे. तेव्हा सूर्य म्हणून सूर्याला काय ते वाखाणायचे?॥ १३३९॥

**या बोला श्रीकृष्णें। म्हणितलें काय येणें। हेंचि थोडें गा वानणें। जे बुझतासि तूं॥ १३४०॥**

**अर्थ**—या बोलण्यावर श्रीकृष्ण म्हणाले "हे जे स्तुतिपर वर्णन कशाला? सांगितलेले समजतोस हेच काय थोडे वर्णन झाले?"॥ १३४०॥

**सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः। इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम्॥ ६४॥**

**अर्थ**—सर्वात अत्यंत गुह्य असे माझे उत्कृष्ट बोलणे तू पुन्हा ऐक. तू मला अत्यंत आवडता आहेस म्हणूनच मी तुला हे हिताचे सांगतो.॥ ६४॥

**तरी अवधान पघळ। करूनियां आणिक एक वेळ। वाक्य माझें निर्मळ। अवधारीं पां॥ १३४१ ॥**

**अर्थ**—तर आता आपले लक्ष चांगले विस्तृत करून आणखी एकवेळ माझा नि:संदिग्ध असा उपदेश ऐक. ॥ १३४१ ॥

**हें वाच्य म्हणौनि बोलिजे। का श्राव्य मग आयिकिजे। तैसें नव्हे परी तुझें। भाग्य बरवें॥ १३४२ ॥**

**अर्थ**—हे बोलण्यासारखे आहे म्हणून बोलायचे किंवा ऐकण्यासारखे आहे म्हणून ऐकायचे असे नाही परंतु तुझे भाग्यच चांगले आहे. ॥ १३४२ ॥

**कूर्मीचिया पिलियां। दिठी पान्हा ये धनंजया। का आकाश वाहे बापिया। घरींचें पाणी॥ १३४३ ॥**

**अर्थ**—अर्जुना, कासवीला पिलांना पाहता क्षणीच पान्हा फुटतो; चातकाकरितां घरचे पाणी आकाश धरून ठेवते. ॥ १३४३ ॥

**जो व्यवहारु जेथ न घडे। तयाचें फळचि तेथ जोडे। काय दैवें न सांपडे। सानुकूळें॥ १३४४॥**

**अर्थ**—जो व्यवहार जेथे घडत नाही, त्याचे फळ तेथेच प्राप्त होते. दैव जर अनुकूल असेल तर काय मिळणार नाही. ॥ १३४४ ॥

**एऱ्हवीं द्वैताची वारी। सारूनि ऐक्याच्या परिवरीं। भोगिजे तें अवधारीं। रहस्य हें॥ १३४५ ॥**

**अर्थ**—तसे पाहिले तर द्वैताची येरझार बाजूला सारून ऐक्याच्या घरात जी गोष्ट भोगावयाची; ती, ही आहे हे लक्षात ठेव ॥ १३४५ ॥

**आणि निरुपचारा प्रेमा। विषय होय जें प्रियोत्तमा। तें दुजें नव्हे कीं आत्मा। ऐसेंचि जाणावें॥ १३४६ ॥**

**अर्थ**—सर्वात प्रिय अर्जुना जे निर्हेतुक प्रेमाचा विषय असते ते दुसरे कोणी नाही तर आत्माच आहे असे समजावे. ॥ १३४६ ॥

**आरिसाचिया देखिलया। गोमटें कीजे धनंजया। तें तया नोहे आपणयां-। लागीं जैसें॥ १३४७॥**

**तैसें पार्था तुझेनि मिषें। मी बोलें आपणयाचि उद्देशें। माझ्या तुझ्या ठाईं असे। मीतूंपण गा॥ १३४८ ॥**

**अर्थ**—आरशात पहाण्याकरता आरशाला अर्जुना, स्वच्छ जे आपण करतो ते त्याच्या करता नसते तर आपल्या करता जसे असते. ॥ १३४७ ॥ त्याप्रमाणे अर्जुना तुला निमित्त करून मी जो बोलतो ते मलाच उद्देशून आहे. माझ्या व तुझ्या ठिकाणी मीतूपणा आहे काय? ॥ १३४८ ॥

**म्हणौनि जिव्हारींचें गुज। सांगतसें जीवासि तुज। हें अनन्यगतीचें मज। आथी व्यसन॥ १३४९ ॥**

**अर्थ**—म्हणून; तू आमचा जीवलग असल्याकारणाने जिव्हाळ्याची गुप्त गोष्ट तुला आम्ही सांगत आहोत. अनन्यगतीच्या भक्ताचे मला हे मोठे वेडच आहे. ॥ १३४९ ॥

**पैं जळा आपणपें देतां। लवण भुललें पंडुसुता। कीं आघवें तयाचें होतां। न लजेचि तें॥ १३५० ॥**

**अर्थ**—अर्जुना, आपल्या स्वत:ला पाण्यात झोकून देताना मीठ जसे आपल्याला (खडेपणाला) विसरते व आपण सर्वस्वी त्याचे (पाण्याचे) होताना ते लाजत नाही. ॥ १३५० ॥

**तैसा तूं माझ्या ठाईं। राखों नेणसीचि कांहीं। तरी आतां तुज काई। गोप्य मी करू॥ १३५१ ॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे तूं माझ्या पासून काहीही लपवून ठेवणे जाणत नाहीस तर मी तरी आता तुझ्यापासून काही गुप्त ठेवीन काय? ॥ १३५१ ॥

**म्हणौनि आघवींचि गूढें। जें पाऊनि अति उघडें। तें गोप्य माझें चोखडें। वाक्य आईक॥ १३५२ ॥**

**अर्थ**—म्हणून जे गुह्य पाहिले असता यच्चयावत् बाकीची गुह्ये उघडी वाटतात असे माझे गूढ व यथार्थ बोलणे ऐक. ॥ १३५२ ॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु। मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे॥ ६५ ॥**

**अर्थ**—माझ्या ठिकाणी मन ठेव. माझा भक्त हो. माझे यजन करणारा हो. मला नमस्कार कर. माझ्याचकडे तूं येशील. तूं मला प्रिय असल्यामुळे हे मी सत्य शपथेवर सांगत आहे. ॥ ६५ ॥

**तरी बाह्य आणि अंतरा। आपुलिया सर्व व्यापारा। मज व्यापकातें वीरा। विषयो करी॥ १३५३॥**

**अर्थ**—हे वीर अर्जुना, तूं आपल्या बाह्य इंद्रिय व्यापारांचा व मनादी आंतर व्यापारांचा, व्यापक अशा मला विषय कर. ॥ १३५३ ॥

**आघवां आंगीं जैसा। वायु मिळोनि आहे आकाशा। तूं सर्व कर्मी तैसा। मजसीचि अस॥ १३५४॥**

**अर्थ**—सर्वांगाने आकाशाला वायू जसा व्यापून राहतो त्याप्रमाणे तूं सर्वकर्मामध्ये माझ्याशीच मिसळून रहा॥ १३५४॥

**किंबहुना आपुलें मन। करीं माझें एकायतन। माझेनि श्रवणें कान। भरूनि घालीं॥ १३५५॥**

**अर्थ**—फार काय सांगायचे! तू आपले मन माझ्याच राहण्याचे एकमेव ठिकाण कर व आपले कान माझ्या विषयीच्या गोष्टींच्या श्रवणने भरून टाक. ॥ १३५५ ॥

**आत्मज्ञानें चोखडीं। संत जे माझीं रूपडीं। तेथ दृष्टि पडो आवडी। कामिनी जैसी॥ १३५६॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे प्रेमाने स्त्रीची दृष्टी आपल्या पतीवर खिळून राहते, त्याप्रमाणे आत्मज्ञानाने पवित्र झालेले व माझेच दुसरे स्वरूप असलेले जे संतलोक, त्यांच्या ठिकाणी तुझी दृष्टी प्रेमाने सारखी वेधून राहो. ॥ १३५६ ॥

**मी सर्व वस्तीचें वसौटें। माझीं नामें जियें चोखटें। तियें जीवा यावया वाटे। वाचेचिये लावीं॥ १३५७॥**

**अर्थ**—मी यच्चयावत् वस्तुमात्राचे वसतीस्थान आहे. त्या माझी जी गोड नावे आहेत ती अंत:करणात ठसण्यास वाणीच्या मार्गाला लाव. ॥ १३५७॥

**हाताचें करणें। का पायांचें चालणें। तें होय मजकारणें। तैसें करीं॥ १३५८॥**

**अर्थ**—हातांनी जे काही करावयाचे किंवा पायांनी जे काही चालायचे ते केवळ माझ्याच करता होईल असे कर॥ १३५८॥

**आपुला अथवा परावा। ठायीं उपकरसी पांडवा। तेणें यज्ञें होईं बरवा। याज्ञिकु माझा॥ १३५९॥**

**अर्थ**—अर्जुना, आपला असो अथवा परका असो, त्याच्या उपयोगी पडून त्या उपकाराच्या यज्ञाने तू माझा उत्तम यज्ञ करणारा हो. ॥ १३५९ ॥

**हें एकैक शिकऊं काई। पैं सेवकै आपुल्या ठाईं। उरौनि येर सर्वही। मी सेव्यचि करीं॥ १३६०॥**

**अर्थ**—हे एक एक काय काय म्हणून शिकवावे! तूं आपल्या ठिकाणी सेवकपणा बाणवून घेऊन व इतर यच्चयावत् जगत् मद्रूप समजून त्याची सेवा करीत जा. ॥ १३६० ॥

**तेथ जाऊनिया भूतद्वेषु। सर्वत्र नमवैन मीचि एकु। ऐसेनि आश्रयो आत्यंतिकु। लाहसी तूं माझा॥ १३६१॥**

**अर्थ**—तेव्हां, प्राणिमात्रांचा द्वेष नाहीसा होऊन सर्वत्र मीच काय तो एकटा पुन: पुन: नमस्कार करण्यास अवशिष्ट राहील. असे केले म्हणजेच माझे दृढ सान्निध्य तुला प्राप्त होईल. ॥ १३६१ ॥

**मग भरलेया जगाआंतु। जाऊनि तिजयाची मातु। होऊनि ठायील एकांतु। आम्हां तुम्हां॥ १३६२॥**

**अर्थ**—मग अत्यंत गजबजलेल्या या जगामध्ये तिसऱ्याची गोष्टच न राहल्यामुळे तुझा व माझा खराखुरा एकांत घडून येईल. ॥ १३६२ ॥

**तेव्हां भलतिये अवस्थे। मी तूंतें तूं मातें। भोगिसीं ऐसें आइतें। वाढेल सुख॥ १३६३॥**

**अर्थ**—त्यावेळी कोणत्याही अवस्थेत, तुला माझा व मला तुझा प्रेमानंद लुटता येईल व अशारीतीने आयतेच सुख वाढेल. ॥ १३६३ ॥

**आणि तिजें आडळ करितें। निमालें अर्जुना जेथें। तैं मीचि म्हणौनि तूं मातें। पावसी शेखीं॥ १३६४॥**

**अर्थ**—आणि अर्जुना मध्ये प्रतिबंध करणारे तिसरे नाहीसे झाले म्हणजे त्या स्थितीत तूं मद्रूप असल्यामुळे मलाच शेवटी प्राप्त होशील. ॥ १३६४॥

**जैसी जळींची प्रतिभा। जळनाशीं बिंबा। येतां गाभागोभा। कांहीं आहे॥ १३६५॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे पाण्यांत पडलेले प्रतिबिंब, पाणी नाहीसे होताच, बिंबात समाविष्ट होते, त्यांत काही अडथळा असतो काय?॥ १३६५॥

**पैं पवनु अंबरा। कां कल्लोळु सागरा। मिळतां आडवारा। कोणाचा गा॥ १३६६॥**

**अर्थ**—अरे, वारा आकाशाला मिळताना किंवा तरंग समुद्राला मिळताना कोणाची आडकाठी असणार!॥ १३६६॥

**म्हणौनि तूं आम्हीं। हें दिसताहे देहधर्मीं। मग ययाच्या विरामीं। मीचि होसी॥ १३६७॥**

**अर्थ**—म्हणून तू आणि आम्ही वेगळे दिसतो ते केवळ देहाच्या उपाधीमुळे. मग देहांचा निरास झाल्यावर तूं मद्रूपच होशील.॥ १३६७॥

**यया बोलामाझारीं। होय नव्हे झणें करीं। येथ आन आथी तरी। तुझीच जाण॥ १३६८॥**

**अर्थ**—ह्या माझ्या बोलण्यामध्ये होईल न होईल अशी शंका घेऊ नकोस. ह्यात कांही अन्यथा असेल तर तुझी शपथ आहे.॥ १३६८॥

**पैं तुझी आण वाहणें। हें आत्मलिंगातें शिवणें। प्रीतीची जाति लाजणें। आठवों नेदी॥ १३६९॥**

**अर्थ**—तुझी शपथ घालणे म्हणजे, आत्मस्वरूपाचीच शपथ घालणे होय. परंतु प्रीतीचे लक्षण असे आहे की ती लाजेची आठवणच होऊ देत नाही.॥ १३६९॥

**एऱ्हवीं वेदु निष्प्रपंचु। जेणें विश्वाभासु हा साचु। आज्ञेचा नटनाचु। काळातें जिणें॥ १३७०॥**

**तो देवो मी सत्यसंकल्पु। आणि जगाच्या हितीं बापु। मा आणेचा आक्षेपु। कां करावा॥ १३७१॥**

**अर्थ**—वास्तविकपणें पाहतां जगताला आधारभूत असलेला व ज्याच्यामुळे हा विश्वाचा भासणारा पसारा सत्य वाटतो व ज्याच्या सत्तेच्या सामर्थ्यामुळे काळालाही जिंकले जाते॥ १३७०॥ तो असा मी देव जर सत्य संकल्प आहे व जगताच्या कल्याणाकरता निरंतर जागरूक आहे तर त्याने शपथ घालण्याचा भलताच प्रयत्न कां करावा?॥ १३७१॥

**परी अर्जुना तुझेनि वेधें। मियां देवपणाचीं बिरुदें। सांडिलीं गा मी हें आर्धे। सगळेनि तुवां॥ १३७२॥**

**अर्थ**—परंतु अर्जुना, तुझ्या विषयीच्या प्रेमाच्या ध्यासाने मी देवपणाची चिन्हे टाकून दिली आहेत. त्यामुळे मी अर्धा झालो आहे. पण तू मात्र (मद्रूप झाल्यामुळे) पूर्ण झाला आहेस.॥ १३७२॥

**पैं काजा आपुलिया। रावो आपुली आपणया। आण वाहे धनंजया। तैसें हें कीं॥ १३७३॥**

**अर्थ**—अर्जुना, आपले कार्य साधण्यांकरता राजा आपलीच आपण शपथ वाहतो, तशातलाच हा प्रकार आहे.॥ १३७३॥

**तेथ अर्जुनु म्हणे देवें। अचाट हें न बोलावें। जे आमचें काज नांवें। तुझेनि एकें॥ १३७४॥**

**अर्थ**—तेव्हा अर्जुन म्हणाला, भगवंता! आपण हे भलतेच बोलूं नये. तुमच्या एका नावानेच (नामस्मरणाने) आमचे कार्य होते.॥ १३७४॥

**यावरी सांगों बैससी। कां सांगतां भाषही देसी। या तुझिया विनोदासी। पारु आहे जी॥ १३७५॥**

**अर्थ**—असे असूनही, तूं सांगायला लागतोस आणि वर शपथही घेतोस, तुझ्या या विनोदाला काही पार आहे काय?॥ १३७५॥

**कमळवना विकाशु। करी रवीचा एक अंशु। तेथ आघवाचि प्रकाशु। नित्य देतो॥ १३७६॥**

**अर्थ**—सूर्याचा एकच किरण संपूर्ण कमलवनाला विकसित करतो. तरी देखील सूर्य आपला संपूर्ण प्रकाश (जगाला) नित्य देतच असतो.॥ १३७६॥

**पृथ्वी निवऊनि सागर। भरीजती येवढें थोर। वर्षे तेथ मिषांतर। चातकु कीं॥ १३७७॥**

**अर्थ**—पृथ्वीला शांत करून सर्व समुद्र भरून जातील एवढी प्रचंड वृष्टी मेघ करतो. पण असे करण्यात चातक मात्र निमित्तमात्र असतो.॥ १३७७॥

**म्हणौनि औदार्या तुझेया। मज निमित्त ना म्हणावया। प्राप्ति असे दानीं राया। कृपानिधी॥ १३७८ ॥**

**अर्थ**—म्हणून तुझ्या या औदार्याला मी एक केवळ निमित्तमात्रच झालो नाही काय? हे श्रेष्ठा कृपानिधे, तुझ्या या ज्ञानदानात जगाला प्राप्ती होणारी आहे. ॥ १३७८ ॥

**तंव देवो म्हणती राहें। या बोलाचा प्रस्तावो नोहे। पैं मातें पावसी उपायें। साचचि येणें॥ १३७९ ॥**

**अर्थ**—तेव्हा देव म्हणाले, थांब. आमची स्तुती करण्याचा हा प्रसंग नाही. पण या उपायाने तू मात्र निश्चितपणे माझ्या स्वरूपाला प्राप्त होशील. ॥ १३७९ ॥

**सैंधव सिंधू पडलिया। जो क्षणु धनंजया। तेणें विरेचि कीं उरावया। कारण कायी॥ १३८० ॥**

**अर्थ**—अर्जुना, मीठाचा खडा ज्या क्षणी समुद्रात पडतो त्याचक्षणी तो विरून जातो. त्याला (खडेपणाने) न विरता उरण्याचे कारण काय?॥ १३८० ॥

**तैसें सर्वत्र मातें भजतां। सर्व मी होतां अहंता। निःशेष जाऊनि तत्त्वता। मीचि होसी॥ १३८१ ॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे सर्वत्र मीच भरलेला असे जाणून परम प्रेमाने मला भजले असता व सर्व मद्रूपच भासत असता अहंकार संपूर्ण नाहीसा होऊन तू मत्स्वरूपच होशील. ॥ १३८१ ॥

**एवं माझिये प्राप्तीवरी। कर्मालागोनि अवधारीं। दाविली तुज उजरी। उपायांची॥ १३८२॥**

**अर्थ**—अशाप्रकारे कर्मापासून माझ्या प्राप्तीपर्यंतचे सर्व उपाय तुला विशद करून सांगितले आहेत. ते तूं ध्यानात घे. ॥ १३८२ ॥

**जे आधीं तंव पांडुसुता। सर्व कर्मे मज अर्पितां। सर्वत्र प्रसन्नता। लाहिजे माझी॥ १३८३ ॥**

**अर्थ**—कारण कीं अर्जुना, आधी सांगितल्याप्रमाणे सर्व कर्मे मला अर्पण केली की सर्व ठिकाणी माझी प्रसन्नता (कृपा) तुला प्राप्त होईल. ॥ १३८३ ॥

**पाठीं माझ्या इये प्रसादीं। माझें ज्ञान जाय सिद्धी। तेणें मिसळिजे त्रिशुद्धी। स्वरूपीं माझ्या॥ १३८४॥**

**अर्थ**—नंतर माझ्या या प्रसादामुळे माझ्या विषयीचे ज्ञान परिपूर्ण होते आणि त्याच्या योगाने निश्चये करून माझ्या स्वरूपांत मिळतो॥ १३८४॥

**मग पार्था तिये ठायीं। साध्य साधन होये नाहीं। किंबहुना तुज कांहीं। उरेचि ना॥ १३८५ ॥**

**अर्थ**—मग अर्जुना! त्याठिकाणी साध्य आणि साधन (हा भेद) ही दोन्हीही नाहीशी होतात. किंबहुना तुला काही कर्तव्य उरणारच नाही. ॥ १३८५ ॥

**तरी सर्व कर्में आपुलीं। तुवां सर्वदा मज अर्पिलीं। तेणें प्रसन्नता लाधली। आजि हे माझी॥ १३८६ ॥**

**अर्थ**—तर तू आपली सर्व कर्मे मला सर्वदा अर्पण केल्या कारणाने आज माझी ही कृपा तुला प्राप्त झाली आहे॥ १३८६ ॥

**म्हणौनि येणें प्रसादबळें। नव्हे झुंजाचेनि आडळें। न ठकेचि येकेवेळे। भाळलों तुज॥ १३८७॥**

**अर्थ**—म्हणून या कृपेच्या बळामुळे युद्धाची आडकाठी मानली नाही (उपदेश करीत राहिलो) कारण मी एकदम तुझ्यावर भाळलो होतो॥ १३८७॥

**जेणें सप्रपंच अज्ञान जाये। जेणें एक मी गोचरु होये। तें उपपत्तीचेनि उपायें। गीतारूप हें॥ १३८८॥**

**अर्थ**—कारण प्रपंचासह अज्ञानाचा नाश होतो व जिच्यामुळे मीच एक फक्त सर्वत्र गोचर होतो त्या तर्कसिद्ध उपायांचे ज्ञान हेच गीतेचे स्वरूप आहे. ॥ १३८८॥

**मियां ज्ञान तुज आपुलें। नानापरी उपदेशिलें। येणें अज्ञानजात सांडीं वियालें। धर्माधर्म जें॥ १३८९॥**

**अर्थ**—मी तुला नानापरींनी आत्मज्ञानाचा उपदेश केला आहे. याच्या योगाने तूं धर्म व अधर्मरूप म्हणून जेवढे काही अज्ञान आहे ते सर्व टाकून दे. ॥ १३८९ ॥

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज। अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः॥ ६६॥**

**अर्थ**—सर्व धर्माधर्माचा त्याग करून मला एकट्यालाच शरण ये. मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन तूं शोक करूं नकोस. ॥ ६६ ॥

**आशा जैसी दुःखातें। व्याली निंदा दुरितें। हें असो जैसें दैन्यातें। दुर्भगत्व॥ १३९० ॥**

**अर्थ**—आशा ज्याप्रमाणे दुःखाला जन्म देते किंवा निंदा पातकांना उत्पन्न करते किंवा दुर्दैव जसे दीनपणाला कारण होते. ॥ १३९० ॥

**तैसें स्वर्गनरकसूचक। अज्ञान व्यालें धर्मादिक। तें सांडूनि घाली अशेख। ज्ञानें येणें॥ १३९१ ॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे स्वर्ग आणि नरकाची प्राप्ती करून देणारे धर्मादिक अज्ञानापासून उत्पन्न होतात. ती सारी या ज्ञानाच्या योगाने नाहीशीं करून टाक. ॥ १३९१ ॥

**हातीं घेऊनि तो दोरु। सांडिजे जैसा सर्पाकारु। कां निद्रात्यागें घराचारु। स्वप्नींचा जैसा॥ १३९२ ॥**

**अर्थ**—दोरी हातात धरून सर्पाचा आकार (भ्रमाने भासलेला) जसा सोडून द्यावा किंवा झोपेतून जागे झाल्यावर स्वप्नातले व्यवहार ज्याप्रमाणे आपण (खोटेपणामुळे) सोडून द्यावे. ॥ १३९२ ॥

**नाना सांडिलेनि कवळें। चंद्रींचें धुपे पिंवळें। व्याधित्यागें कडुवाळें-। पण मुखाचें॥ १३९३ ॥**

**अर्थ**—किंवा कावीळ नाहीशी झाली म्हणजे ज्याप्रमाणे चंद्राच्या ठिकाणी भासणारा पिवळेपणा नाहीसा होतो किंवा रोग गेला म्हणजे ज्याप्रमाणे तोंडाचा कडवटवणा नाहीसा होतो॥ १३९३ ॥

**अगा दिवसा पाठीं देऊनी। मृगजळ घापे त्यजुनी। कां काष्ठत्यागें वन्ही। त्यजिजे जैसा॥ १३९४॥**

**अर्थ**—किंवा दिवस गेला म्हणजे मृगजळही जसे नाहीसे होते किंवा लाकूड टाकून दिले म्हणजे अग्नीचाही जसा त्याग होतो॥ १३९४॥

**तैसें धर्माधर्माचें टवाळ। दावी अज्ञान जें कां मूळ। तें त्यजूनि त्यजीं सकळ। धर्मजात॥ १३९५ ॥**

**अर्थ**—त्या प्रमाणे धर्माधर्माला कारण असणारे जे (खोटे) अज्ञान त्या अज्ञानाचा त्याग करून यच्चयावत् धर्मांधर्म सोडून दे. ॥ १३९५ ॥

**मग अज्ञान निमालिया। मीचि येकु असें अपैसया। सनिद्र स्वप्न गेलिया। आपणपें जैसें॥ १३९६ ॥**

**अर्थ**—मग अज्ञान नाहीसे झाले म्हणजे मी एकटा आपोआप उरतो. जसे निद्रेसह वर्तमान स्वप्न गेले म्हणजे आपले आपणच राहतो. ॥ १३९६ ॥

**तैसा मी एकवांचूनि कांहीं। मग भिन्नाभिन्न आन नाहीं। सोहंबोधें तयाच्या ठायीं। अनन्यु होय॥ १३९७॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे माझ्या एकट्यावाचून दुसरे भिन्न अभिन्न काहीच नाही. त्या अशा माझ्या स्वरूपाच्या ठिकाणी 'तोच मी आहे' या ज्ञानाने एकरूप हो. ॥ १३९७॥

**पैं आपलेनि भेदेंविण। माझें जाणिजें जें एकपण। तयाचि नांव शरण। मज येणें गा॥ १३९८॥**

**अर्थ**—अरे अर्जुना, आपल्याला माझ्याहून अलग न समजता माझे जे एकत्व जाणणे याचेच नाव मला शरण येणे होय॥ १३९८॥

**जैसे घटाचेनि नाशें। गगनीं गगन प्रवेशे। मज शरण येणें तैसें। ऐक्य करी॥ १३९९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे घट फुटला असता घटातील आकाश महाआकाशात मिळून जाते त्याप्रमाणे या शरण येण्याने माझ्याशी ऐक्य होते. ॥ १३९९ ॥

**सुवर्णमणि सोनया। ये कल्लोळु जैसा पाणिया। तैसा मज धनंजया। शरण ये तूं॥ १४००॥**

**अर्थ**—अर्जुना, सोन्याचा मणी जसा सोन्याशी किंवा लाटा ज्याप्रमाणे पाण्याशी ऐक्य पावतात त्याप्रमाणे तू मला शरण ये. ॥ १४०० ॥

**गूढार्थदीपिका—ओवी १३९८ ने १४००**

या सर्व ओव्यातून भगवंताला शरण जाणे म्हणजे काय हे श्रीज्ञानेश्वर महाराज सांगत आहेत. मीपणाची

जाणीव किंवा आपलेपणा नि:शेष विसरून जाणे म्हणजे भगवंताला शरण जाणे होय. घडा नाहीसा झाला की घडयातील आकाश सहजच बाहेरच्या आकाशात मिसळून जाते, त्याप्रमाणे जीव भगवंताला शरण गेला की दोघांचेही ऐक्य होते. शरणागतीत प्रीतिवृत्तीचे प्राधान्य राहत असल्यामुळे दोघांचेही ऐक्य होऊनही ऐक्याची जाणीव त्या दशेत राहत नाही व हेच जीवाशिवाचे स्वाभाविक ऐक्य होय. भगवंताला शरण जाऊन जर त्याच्या ठिकाणीही आपलेपणाची जाणीव शिल्लक राहत असेल तर भगवंताला शरण असे म्हणण्याची त्याला लाजच वाटायला पाहिजे ह्याच शरणागतीला खरे वंदन म्हणतात व याच वंदनाला तुकाराम महाराज 'नमन ते भक्ति' म्हणतात.

**वांचूनि सागराच्या पोटीं। वडवानळु शरण आला किरीटी। जाळूं न ठाके तया गोठी। वाळूनि दे पां॥ १४०१॥**

**अर्थ**—याशिवाय अर्जुना, समुद्राच्या पोटात वडवानळ शरण आला खरा. पण तो त्याला जाळणार नाही ही गोष्ट सोडून दे.॥ १४०१॥

**मजही शरण रिघिजे। आणि जीवत्वेंचि असिजे। धिग् बोली ईया न लजे। प्रज्ञा केवीं॥ १४०२॥**

**अर्थ**—मला शरण येऊनही जीवपणा कायम राहिला. धिक्कार असो अशा बोलण्याला! असे बोलण्याची बुद्धीला लाज कशी वाटत नाही?॥ १४०२॥

**अगा प्राकृताही राया। आंगीं पडे जें धनंजया। तें दासिरूंही कीं तया। समान होय॥ १४०३॥**

**अर्थ**—अर्जुना य:कश्चित् राजानेही जिचा स्वीकार केला असतो अशी दासी देखील त्याच्या बरोबरीची (होते)॥ १४०३॥

**मा मी विश्वेश्वरु भेटे। आणि जीवग्रंथी न सुटे। हे बोल नको वोखटे। कानीं लाऊं॥ १४०४॥**

**अर्थ**—मग मी विश्वाचा स्वामी आहे तो मी भेटलो आणि जीवदशा नाहीशी झाली नाही ही ओंगळ गोष्ट कानावर देखील येऊ देऊ नकोस॥ १४०४॥

**म्हणौनि मी होऊनि मातें। सेवणें आहे आयितें। तें करीं हातां येतें। ज्ञानें येणें॥ १४०५॥**

**अर्थ**—म्हणून मत्स्वरूप होऊन माझी भक्ती करणे अनायासेच होणार आहे. ही (भक्ती) या ज्ञानाने प्राप्त होईल. असे कर.॥ १४०५॥

**मग ताकौनिया काढिलें। लोणी मागौतें ताकीं घातलें। परी न घेपेचि कांहीं केलें। तेणें जेवीं॥ १४०६॥**

**अर्थ**—मग ताकापासून काढलेले लोणी पुन्हा ताकात टाकले तर ते काही केले तरी ज्याप्रमाणे ताकात मिसळत नाही.॥ १४०६॥

**तैसें अद्वयत्वें मज। शरण रिघालिया तुज। धर्माधर्म हे सहज। लागतील ना॥ १४०७॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे अद्वयपणाने मला शरण आल्यावर तुला धर्माधर्म सहजच लागणार नाहीत.॥ १४०७॥

**लोह उभे खाय माती। तें परिसाचिये संगती। सोनें जालया पुढती। न शिविजे मळें॥ १४०८॥**

**अर्थ**—लोखंड जरी तसेच राहिले तर ते माती खाते (गंजून जाते) पण तेच परिसाच्या स्पर्शाने सोने झाल्यावर त्याला मळ (गंज) शिवत देखील नाही.॥ १४०८॥

**हें असो काष्ठापासोनी। मंथूनि घेतलया वन्ही। मग काष्ठेंही कोंडोनि। न ठके जैसा॥ १४०९॥**

**अर्थ**—ते राहू दे. लाकडापासून घासून अग्नी काढला. असता तो जसा काष्ठानी कोंडून रहात नाही.॥ १४०९॥

**अर्जुना काय दिनकरु। देखत आहे अंधारु। कीं प्रबोधीं होय गोचरु। स्वप्नभ्रमु॥ १४१०॥**

**अर्थ**—अर्जुना, सूर्य आंधार पहातो काय? किंवा जागे झाल्यावर स्वप्नभ्रम दिसेल काय?॥ १४१०॥

**तैसें मजसीं येकवटलेया। मी सर्वरूप वांचूनियां। आन कांहीं उरावया। कारण असे॥ १४११॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे माझ्याशी एकरूप झाल्यावर मी जो सर्वरूप, त्या वांचून दुसरे काही उरण्याला कारण आहे काय?॥ १४११॥

**म्हणौनि तयाचें कांहीं। चिंतींना आपुल्या ठाईं। तुझें पापपुण्य पाहीं। मीचि होईन॥ १४१२॥**

**अर्थ**—म्हणून त्याचा काही एक (पाप पुण्यांचा) आपल्या मनात विचार करू नको. तुझे पापपुण्य सर्व मीच होइन॥ १२१२॥

**तेथ सर्वबंधलक्षणें। पापें उरावें दुजेपणें। तें माझ्या बोधीं वायाणें। होऊनि जाईल॥ १४१३॥**

**अर्थ**—आता सर्व बंधाचे लक्षण, म्हणजे माझ्याहून स्वत:ला भिन्न पहाण्याचे जे पाप, ते देखील माझे ज्ञान (अद्वैतरूपाने) झाल्यानंतर नाहीसे होईल.॥ १२१३॥

**जळीं पडिलिया लवणा। सर्वही जळ होय विचक्षणा। तुज मी अनन्यशरणा। होईन तैसा॥ १४१४॥**

**अर्थ**—हे सुज्ञा, पाण्यात मीठ पडले म्हणजे ते जसे जलरूप होऊन जाते, त्याप्रमाणे तूं मला अनन्यभावाने शरण आलां असता मत्स्वरूपच होऊन जाशील.॥ १४१४॥

**येतुलेनि आपैसया। सुटलाचि आहासी धनंजया। घेईं मज प्रकाशोनियां। सोडवीन तूतें॥ १४१५॥**

**अर्थ**—अर्जुना, येवढ्याने आपोआपच तूं सुटशील, मला तू ज्ञानपूर्वक जाणून घे म्हणजे तुला मी (धर्माधर्मापासून) सोडवीन.॥ १४१५॥

**याकारणें पुढती। हें आधी न वाहें चित्तीं। मज एकासि ये सुमती। जाणोनि शरण॥ १४१६॥**

**अर्थ**—हे बुद्धिमंता, म्हणून ह्यानंतर आपल्या मनात काहीही चिंता करूं नकोस. तू मला एकट्यालाच जाणून शरण ये.॥ १४१६॥

**ऐसें सर्वरूप रूपसें। सर्वदृष्टिडोळसें। सर्वदेशनिवासें। बोलिलें श्रीकृष्णें॥ १४१७॥**

**अर्थ**—सर्वरूपे ज्याच्यायोगाने रूपवान् होतात, सर्वदृष्टी ज्याच्या योगाने डोळस होते व जे सर्वत्र व्यापलेले आहेत असे भगवान् श्रीकृष्ण याप्रमाणे म्हणाले.॥ १४१७॥

**मग सांवळा सकंकणु। बाहु पसरोनि दक्षिणु। आलिंगिला स्वशरणु। भक्तराजु तो॥ १४१८॥**

**अर्थ**—मग कंकणयुक्त श्यामल वर्णाचा उजवा बाहू पसरून आपणाला शरण आलेल्या भक्तराजाला त्याने आलिंगन दिले.॥ १४१८॥

**न पवतां जयातें। काखे सूनि बुद्धीतें। बोलणें मागौतें। वोसरलें॥ १४१९॥**

**अर्थ**—वस्तूची प्राप्ती न होता बुद्धीला काखेत मारून बोलणें माघारी फिरले॥ १४१९॥

**ऐसें जें कांहीं एक। बोला बुद्धीसीही अटक। तें द्यावया मिख। खेवाचें केलें॥ १४२०॥**

**अर्थ**—अशी जी काही वस्तू जिच्यामध्ये वाणी व बुद्धी यांचा शिरकाव होत नाही ती देण्याकरता (भगवंतानी) आलिंगनाचे निमित्त केले.॥ १४२०॥

**हृदया हृदय येक जालें। ये हृदयींचें ते हृदयीं घातलें। द्वैत न मोडितां केलें। आपणाऐसें अर्जुना॥ १४२१॥**

**अर्थ**—हृदयाशी हृदय भिडले. आपल्या हृदयातील अद्वैतबोध अर्जुनाच्या हृदयात घातला. व देव व भक्त यांचा दोनपणा ठेऊन अर्जुनाला आपल्यासारखे केले॥ १४२१॥

**दीपें दीपु लाविला। तैसा परिष्वंगु तो जाला। द्वैत न मोडितां केला। आपणपें पार्थु॥ १४२२॥**

**अर्थ**—दिव्याने दिवा लावावा त्याप्रमाणे ते आलिंगन झाले. दोनपणा न मोडता अर्जुनाला स्वस्वरूप केले॥ १४२२॥

**तेव्हां सुखाचा मग तया। पूरु आला जो धनंजया। तेथ वाडु तऱ्हीं बुडोनियां। ठेला देवो॥ १४२३॥**

**अर्थ**—तेव्हां अर्जुनाला जो सुखाचा पूर आला तो इतका मोठा होता की त्यात देव जरी सामर्थ्यवान होते तरी ते बुडून गेलेत.॥ १४२३॥

**सिंधु सिंधूतें पावों जाये। तें पावणें ठाके दुणा होये। वरी रिगे पुरवणिये। आकाशही॥ १४२४॥**

**अर्थ**—समुद्राला समुद्र जेव्हा मिळायला जातो तेव्हा ते मिळणे एकीकडेच राहते व तो मात्र दुप्पट होतो व भरीला तो आकाशापर्यंत उसळतो.॥ १४२४॥

**तैसें तया दोघांचें मिळणें। दोघां नावरे जाणावें कवणें। किंबहुना श्रीनारायणें। विश्व कोंदलें॥ १४२५॥**

**अर्थ**—त्याप्रमाणेच त्या दोघांची भेट दोघांनाही आवरेना त्याचे मर्म कोणाला कळणार? फार काय सांगावे. भगवंतानी सर्व विश्वच कोंदून टाकले म्हटले तरी चालेल.॥ १४२५॥

**एवं वेदाचें मूळसूत्र। सर्वाधिकारैकपवित्र। श्रीकृष्णें गीताशास्त्र। प्रकट केलें॥ १४२६॥**

**अर्थ**—अशाप्रकारे वेदाचे मूळसूत्र व सर्व अधिकारांचे एकमेव पवित्र ठिकाण असे जे गीतारूपी शास्त्र ते श्रीकृष्णाने प्रगट केले.॥ १४२६॥

**येथ गीता मूळ वेदां। ऐसें केवीं पां आलें बोधा। हें म्हणाल तरी प्रसिद्धा। उपपत्ति सांगों॥ १४२७॥**

**अर्थ**—येथे 'गीता ही वेदाचे मूळ' हे कसे काय समजले असे म्हणाल तर त्या संबंधीची सयुक्तिक कारण मीमांसा सांगतो॥ १४२७॥

**तरी जयाच्या निश्वासीं। जन्म झालें वेदराशी। तो सत्यप्रतिज्ञ पैजेसीं। बोलिला स्वमुखें॥ १४२८॥**

**अर्थ**—ज्याच्या निश्वासापासून वेदांचा समुदाय जन्माला आला त्याच सत्य प्रतिज्ञा असलेल्या भगवंताने प्रतिज्ञेवर आपल्या मुखाने गीता सांगितली॥ १४२८॥

**गूढार्थदीपिका—बोलिला स्वमुखे। ओवी १४२८**

आपण श्वासोश्वास करतो त्याकरता आपल्याला प्रयत्न करावा लागत नाही. तो अयत्नपूर्वकच होतो. त्याप्रमाणे नित्ययोगी असेल्या परमेश्वराकडून कोणताही यत्न न करता निश्वासाप्रमाणे वेद निर्माण केले जातात.

भगवान् श्रीकृष्ण परब्रह्माचेच अवतार असल्याकारणाने त्यांच्या ठिकाणी अवतारकाळीही योगस्थिती भंगत नाही. अयत्नपूर्वक वेद निर्माण करतेवेळी जर सत्याचा आविष्कार करताना भगवान् चुकले नाहीत तर यत्नपूर्वक भगवद्गीता सांगताना सत्याचे प्रतिपादन करण्यात त्यांची कशी चूक होऊं शकेल?

वेदांतील अनेक गोष्टीं अव्यक्तार्थबोधक आहेत. पण भगवद्गीता साक्षात् भगवंतानी आपल्या मुखाने सांगितली असल्याकारणाने ती स्पष्टार्थबोधक आहे.

श्रीगुलाबराव महाराजांनी म्हणून गीतेला जाग्रत् श्रुती म्हटले आहे ते किती समर्पक आहे हे यावरून कळून येईल. (श्रीगुलाबराव महाराज कृत प्रियलीला महोत्सव सखीप्रेषण ३).

**म्हणौनि वेदां मूळभूत। गीता म्हणों हें होय उचित। आणिकही येकी येथ। उपपत्ति असे॥ १४२९॥**

**अर्थ**—म्हणून वेदांचे मूळसूत्र गीता आहे हे म्हणणे योग्यच आहे. आणखीही याठिकाणी एक युक्तिसंगत तर्क आहे.॥ १४२९॥

**जें न नशतु स्वरूपें। जयाचा विस्तारु जेथ लपे। तें तयाचें म्हणिपे। बीज जगीं॥ १४३०॥**

**अर्थ**—ज्याचा स्वरूपत: नाश होत नाही व ज्याचा विस्तार ज्यात लुप्त होऊन राहतो त्याला जगात त्याचे बीज असे म्हणतात.॥ १४३०॥

**तरी कांडत्रयात्मकु। शब्दराशी अशेखु। गीतेमाजीं असे रुखु। बीजीं जैसा॥ १४३१॥**

**अर्थ**—तर बीजामध्ये ज्याप्रमाणे वृक्ष (अव्यक्त) असतो त्याप्रमाणे तीन कांडात्मक संपूर्ण वेदराशी गीतेमध्ये (अव्यक्तरूपाने) आहे.॥ १४३१॥

**म्हणौनि वेदाचें बीज। श्रीगीता होये हें मज। गमे आणि सहज। दिसतही आहे॥ १४३२॥**

**अर्थ**—म्हणून वेदांचे बीज श्रीगीता आहे असे मला वाटते आणि ते सहज देखील दिसून येते.॥ १४३२॥

**जे वेदाचे तिन्ही भाग। गीते उमटले असती चांग। भूषणरत्नीं सर्वांग। शोभलें जैसें॥ १४३३॥**

**अर्थ**—सुवर्णालंकार व रत्न यांनी ज्याप्रमाणे सर्व शरीराला शोभा येते, त्याप्रमाणे वेदांचे (कर्मादी) तिन्ही भाग गीतेमध्यें सुंदररीतीने उमटले आहेत.॥ १४३३॥

**तियेंचि कर्मादिकें तिन्हीं। कांडें कोणकोणे स्थानीं। गीते आहाति तें नयनीं। दाखऊं आईक॥ १४३४॥**

**अर्थ**—तीच कर्मादिक (कर्म, ज्ञान व भक्ती) तिन्ही कांडे गीतेमध्ये कोण कोणत्या ठिकाणी आहेत ती डोळ्यांना दाखऊ ऐका. ॥ १४३४ ॥

**तरी पहिला जो अध्यावो। तो शास्त्रप्रवृत्तिप्रस्तावो। द्वितीयीं सांख्यसद्भावो। प्रकाशिला॥ १४३५ ॥**

**अर्थ**—तर पहिला जो अध्याय आहे तो शास्त्राच्या प्रवृत्तीची प्रस्तावना आहे. दुसऱ्यात सांख्यशास्त्राची भूमिका स्पष्ट केली आहे. ॥ १४३५ ॥

**मोक्षदानीं स्वतंत्र। ज्ञानप्रधान हें शास्त्र। येतुलालें दुजीं सूत्र। उभारिलें॥ १४३६ ॥**

**अर्थ**—ह्या शास्त्रात ज्ञानाचे प्राधान्य असून ते मोक्षप्राप्ती करून देण्यास स्वतंत्र आहे इतकेच दुसऱ्या अध्यायात सूत्ररूपाने सांगितले आहे. ॥ १४३६ ॥

**मग अज्ञानें बांधलेयां। मोक्षपदीं बैसावया। साधनारंभु तो तृतीया-। ध्यायीं बोलिला॥ १४३७ ॥**

**अर्थ**—अज्ञानाने बद्ध असलेल्या जीवाला मोक्षाची प्राप्ती करून देण्याकरता ज्या साधनमार्गांचा आरंभ करावयाचा त्यांची माहिती तिसऱ्या अध्यायांत दिली आहे. ॥ १४३७ ॥

**जे देहाभिमानबंधें। सांडूनि काम्यनिषिद्धें। विहित परी अप्रमादें। अनुष्ठावें॥ १४३८ ॥**

**अर्थ**—कारण की देहाभिमानामुळे बंधनकारक असलेली काम्य व निषिद्ध कर्मे सोडून देऊन विहित असणारी कर्मे दोषरहित अशी आचरावी. ॥ १४३८ ॥

**ऐसेनि सद्भावें कर्म करावें। हा तिजा अध्यावो जो देवें। निर्णय केला ते जाणावें। कर्मकांड येथ॥ १४३९ ॥**

**अर्थ**—अशा सद्भावाने कर्म करावे हा भगवंतानी तिसऱ्या अध्यायात निर्णय सांगितला. ते येथे कर्मकांड आहे हे लक्षात ठेवावे. ॥ १४३९ ॥

**आणि तेंचि नित्यादिक। अज्ञानाचें आवश्यक। आचरतां मोचक। केवीं होय पां॥ १४४० ॥**

**अर्थ**—आणखी तसेंच नित्यनैमित्तिक कर्मे आचरण करताना अज्ञानापासून सोडवणारे ते कसे होतील. ॥ १४४० ॥

**ऐसी अपेक्षा जालिया। बद्ध मुमुक्षुते आलिया। देवें ब्रह्मार्पणत्वें क्रिया। सांगितली॥ १४४१ ॥**

**अर्थ**—अशी इच्छा झाली असता व शुद्ध पुरुषाला मोक्षाची तळमळ लागली असता देवाने त्याला ब्रह्मार्पण बुद्धीने कर्म करण्याला सांगितले. ॥ १४४१ ॥

**जे देहवाचामानसें। विहित निपजे जें जैसें। तें एक ईश्वरोद्देशें। कीजे म्हणितलें॥ १४४२ ॥**

**अर्थ**—ते असे की कायावाचामनेकरून जे जे विहित कर्म जसे जसे उत्पन्न होईल ते ते एका ईश्वराच्या उद्देशाने करावे असे देवाने सांगितले. ॥ १४४२ ॥

**हेंचि ईश्वरीं कर्मयोगें। भजनकथनाचें खागें। आदरिलें शेषभागें। चतुर्थाचेनी॥ १४४३ ॥**

**अर्थ**—कर्मयोगाने ईश्वराच्या ठिकाणी भजनादी भक्ती करण्याचे हेच शेवटचे ठिकाण होय असे हे चवथ्या अध्यायाच्या राहिलेल्या भागांत सांगितले. ॥ १४४३ ॥

**तें विश्वरूप अकरावा। अध्यावो संपे जंव आघवा। तंव कर्मे ईशु भजावा। हें जें बोलिलें॥ १४४४ ॥**

**अर्थ**—ते (चवथ्या अध्यायपासून) विश्वरूपाचा अकरावा अध्याय संपेपर्यंत कर्माच्या योगाने ईश्वराची भक्ती करावी हे जे सांगितले ॥ १४४४ ॥

**तें अष्टाध्यायीं उघड। जाण येथें देवताकांड। शास्त्र सांगतसे आड। मोडूनि बोलें॥ १४४५ ॥**

**अर्थ**—त्या आठ अध्यायात (चार ते अकरा अध्यायात) स्पष्टपणे देवताकांड आहे असे गीताशास्त्र सांगत आहे, हे आडपडदा न ठेवता सांगतो. ॥ १४४५ ॥

**आणि तेणेंचि ईशप्रसादें। श्रीगुरुसंप्रदायलब्धें। साच ज्ञान उद्बोधे। कोंवळें जें॥ १४४६ ॥**

**अर्थ**—आणि ईश्वराच्या त्या कृपाप्रसादाने व श्रीगुरुच्या संप्रदायातून प्राप्त झालेले कोवळे असे यथार्थज्ञान जे अनुभवले जाते. ॥ १४४६ ॥

**तें अद्वेष्टादि प्रभृतिकीं। अथवा अमानित्वादिकीं। वाढविजे म्हणोनि लेखीं। बारावा गणूं॥ १४४७॥**

**अर्थ**—ते, अद्वेष्टा इत्यादी किंवा अमानित्वादी गुण आंगी बाणण्याच्या मार्गांनी वाढवून दृढ करावे. ह्या हिशेबात बाराव्या अध्यायाची आम्ही गणना करतो.॥ १४४७॥

**तो बारावा अध्याय आदी। आणि पंधरावा अवधी। ज्ञानफळपाकसिद्धि। निरूपणासी॥ १४४८॥**

**अर्थ**—त्या बाराव्या अध्यायापासून व पंधराव्याला शेवट धरून त्या अध्यायापर्यंत जे अध्याय आहेत त्यांत ज्ञानाचे परिपक्व फळ हाच निरूपणाचा विषय आहे.॥ १४४८॥

**म्हणौनि चहूंही इहीं। ऊर्ध्वमूळांतीं अध्यायीं। ज्ञानकांड ये ठायीं। निरूपिजे॥ १४४९॥**

**अर्थ**—म्हणून या 'ऊर्ध्वमूळ' पर्यंतच्या या चारही अध्यायात ज्ञानकांडाचेच निरूपण आले आहे.॥ १४४९॥

**एवं कांडत्रयनिरूपणी। श्रुतीचि हे कोडिसवाणी। गीतापद्यरत्नांचीं लेणीं। लेयिली आहे॥ १४५०॥**

**अर्थ**—या प्रमाणे कांडत्रयाचे रूप धारण केलेली (कर्म, उपासना व ज्ञान) ही (गीता) गोजिरवाणी श्रुतीच आहे व तिने (गीतेतील) श्लोकरूपी रत्नालंकार धारण केलेले आहेत.॥ १४५०॥

**हें असो कांडत्रयात्मक। श्रुति मोक्षरूप फळ येक। बोभावे जें आवश्यक। ठाकावें म्हणौनि॥ १४५१॥**

**अर्थ**—हे राहू दे. हे तीन भाग असलेली (गीतारूपी) श्रुती ज्या एका मोक्षफळाची गर्जना करते व जे अवश्यमेव प्राप्त करावे म्हणून सांगते.॥ १४५१॥

**तयाचेनि साधनज्ञानेंसीं। वैर करी जो प्रतिदिवशीं। तो अज्ञानवर्ग षोडशीं। प्रतिपादिजे॥ १४५२॥**

**अर्थ**—त्याचे (मोक्षाचे) साधन जे ज्ञान त्याच्याशी रात्रंदिवस वैर करणारा जो अज्ञानवर्ग तो सोळाव्या अध्यायात वर्णन केला आहे.॥ १४५२॥

**तोचि शास्त्राचा बोळावा। घेवोनि वैरी जिणावा। हा निरोपु तो सतरावा। अध्याय येथ॥ १४५३॥**

**अर्थ**—शास्त्राचे साह्य घेऊन हा वैरी (शत्रुवर्ग) जिंकावा अशा तऱ्हेचा संदेश सतराव्या अध्यायात आहे.॥ १४५३॥

**ऐसा प्रथमालागोनी। सतरावा लाणीं करूनी। आत्मनिश्वास विवरूनि। दाविला देवें॥ १४५४॥**

**अर्थ**—ह्याप्रमाणे पहिल्यापासून सतराव्यापर्यंत देवांनी आपलेच श्वासोश्वास असलेले असे जे वेद त्याचे विवरण केले आहे.॥ १४५४॥

**तया अर्थजाता अशेषा। केला तात्पर्याचा आवांका। तो हा अठरावा देखा। कलशाध्यायो॥ १४५५॥**

**अर्थ**—या सर्व अध्यायांतील सर्व अर्थाचा ज्यात थोडक्यात आढावा घेतला आहे तो हा अठरावा कलशाध्याय होय.॥ १४५५॥

**एवं सकळसांख्यसिंधु। श्रीभगवद्गीताप्रबंधु। हा औदार्ये आगळा वेदु। मूर्तु जाण॥ १४५६॥**

**अर्थ**—अशा प्रकारे तत्त्वज्ञानाचा समुद्र असा हा श्रीमद्भगवद्गीता ग्रंथ आपल्या ज्ञानदानाच्या औदार्यामुळे संपन्न झालेला आगळाच मूर्तिमंत वेद आहे.॥ १४५६॥

**वेदु संपन्नु होय ठाईं। परी कृपणु ऐसा आनु नाहीं। जे कानीं लागला तिहीं। वर्णांच्याचि॥ १४५७॥**

**अर्थ**—वेद आपल्या ठिकाणी ज्ञानसंपत्तीने परिपूर्ण आहे खरा. पण त्याच्या सारखा दुसरा कंजूस कोठेच नाही. कारण तो फक्त तीनच वर्णांच्या लोकांच्या कानांशी लागतो.॥ १४५७॥

**येरां भवव्यथा ठेलियां। स्त्रीशूद्रादिकां प्राणियां। अनवसरू मांडूनियां। राहिला आहे॥ १४५८॥**

**अर्थ**—इतर स्त्रीशूद्रादिक जे जीव आहेत व जे संसारयातनेत पिचत पडले आहेत त्यांना अनधिकारी ठरवून तो स्वस्थ राहिला आहे.॥ १४५८॥

**तरी मज पाहतां तें मागील उणें। फेडावया गीतापणें। वेदु वेठला भलतेणें। सेव्य होआवया॥ १४५९॥**

**अर्थ**—मला तर असे वाटते की मागचा कमीपणा घालवण्याकरताच व कोणालाही त्याचे सेवन करता यावे म्हणून गीतेच्या रूपाने वेद प्रगट झाला आहे.॥ १४५९॥

**गूढार्थदीपिका—वेद वेठला भलतेणें। सेव्य होआवया।**

भगवंताचेच नि:श्वासरूप वेद असल्याकारणाने वेदाला कमीपणा आणण्याचा याठिकाणी माउलीचा हेतु नाही. कारण माउलींनीच 'तरी जयाच्या निश्वासी। जन्म झाले वेदराशी। तो सत्यप्रतिज्ञ पैजेसी। बोलिला स्वमुखें' यात वेद व भगवद्गीता या दोहोंचेही कर्तृत्व भगवंताकडेच दिलेले आहे. त्यामुळे त्यांच्यात तरतमभाव तसा नाही, अस्पष्टार्थबोधक व स्पष्ट अर्थबोधक एवढा मात्र फरक या दोहोत आहे. वेदासमान गीतेचेही प्रामाण्य आहे, हे माउलीला येथे सूचित करावयाचे आहे.

वेदात बीजरूपाने असलेली अध्यात्मविद्या स्पष्टपणे गीतेत समाविष्ट केलेली आहे. म्हणूनच माउलीने गीतेला वेदांचे मूळ म्हटले आहे. ''म्हणौनि वेदाचें बीज। श्रीगीता होये हें मज'' अ० १८ ओ० १४३२. ''वेदांचा प्रतिपाद्य विषय जो भगवान् परमात्मा तोच या गीता ग्रंथाचा वक्ता असल्यामुळे गीतेची थोरवी काय वर्णावी!'' याही माउलीच्या उद्‌गारांवरून वेदतुल्य प्रामाण्य व आदर श्रीगीतेविषयी माउलीला वाटत असल्याचे दिसून येते. ''बाप बाप ग्रंथ गीता। जो वेदीं प्रतिपाद्य देवता। तो श्रीकृष्ण वक्ता। जिये ग्रंथी॥ अ० ११ ओ० २४ वेदांनीच उगार होऊन गीतेचे रूप धारण केले व आपल्या ठिकाणचा कृपणपणा नाहीसा केला याही म्हणण्यात गीता ही वेदांचेच दुसरे रूप ठरते व गीतेचे प्रामाण्य वेदाहून किंचितही कमी नाही हे निश्चित होते.

**नाहे हे अर्थु रिगोनि मनीं। श्रवणें लागोनि कानीं। जपमिषें वदनीं। वसोनियां॥ १४६०॥**

**अर्थ**—किंवा हें (गीताशास्त्र) अर्थाने मनात शिरून, श्रवणाने कानास लागून व जपाच्या निमित्ताने मुखात राहून॥ १४६०॥

**ये गीतेचा पाठु जो जाणे। तयाचेनि सांगातीपणें। गीता लिहोनि वाहाणें। पुस्तकमिषें॥ १४६१॥**

**अर्थ**—या गीतेचा पाठ जो जाणणार आहे त्याच्या संगतीत राहून व गीता लिहून ती पुस्तकरूपाने जो जवळ बाळगतो॥ १४६१॥

**ऐसैसा मी सकटा। संसाराचां चोहटां। गवादी घालीत चोखटा। मोक्षसुखाची॥ १४६२॥**

**अर्थ**—त्याला अशा अशा निमित्ताने संसाराच्या चव्हाट्यावर मोक्षसुखाचे अन्नछत्रच घालून ठेवले आहे.॥ १४६२॥

**परी आकाशीं वसावया। पृथ्वीवरी बैसावया। रविदीप्ती राहाटावया। आवारु नभ॥ १४६३॥**

**अर्थ**—परंतु अंतरिक्षात संचार करण्याला, पृथ्वीवर बसण्याला किंवा सूर्यप्रकाश पसरण्याला ज्याप्रमाणे आकाशच आवार असते.॥ १४६३॥

**तेवीं उत्तम अधम ऐसें। सेवितां कवणातेंही न पुसे। कैवल्यदानें सरिसें। निववीत जगा॥ १४६४॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे सेवन करताना तू उत्तम आहेस की अधम आहेस असे कोणालाही गीता विचारीत नाही. मोक्षाचे सारखेच दान करून सर्वजगाला ती तृप्त करते.॥ १४६४॥

**यालागीं मागिली कुटी। भ्याला वेदु गीतेच्या पोटीं। रिगाला आतां गोमटी। कीर्ति पातला॥ १४६५॥**

**अर्थ**—या करता मागच्या निंदेला भिऊन वेद गीतेच्या पोटात शिरला. आता त्याने चांगली कीर्ती मिळवली आहे॥ १४६५॥

**म्हणौनि वेदाची सुसेव्यता। ते हे मूर्त जाण श्रीगीता। श्रीकृष्णें पांडुसुता। उपदेशिली॥ १४६६॥**

**अर्थ**—म्हणून वेदाचे सुलभ सेवन करण्यासारखे जे मूर्तिमंत रूप ती ही श्रीकृष्णाने अर्जुनाला उपदेशिलेली गीता आहे हे तूं जाण.॥ १४६६॥

**परी वत्साचेनि वोरसें। दुभतें होय घरोद्देशें। जालें पांडवाचेनि मिषें। जगदुद्धरण॥ १४६७॥**

**अर्थ**—पण वासराच्यामुळे पान्हा फूटून गाईचे दुभते जसे सर्व घराला उपयोगी पडते, त्याप्रमाणे अर्जुनाच्या निमित्ताने सर्व जगताचा उद्धार झाला॥ १४६७॥

**चातकाचिये कणवे। मेघु पाणियेसिं धांवे। तेथ चराचर आघवें। निवालें जेवीं॥ १४६८॥**

**अर्थ**—चातकाची करूणा येऊन मेघ जसा पाणी घेऊन धावून येतो व त्यावेळी संपूर्ण चराचर सृष्टी जशी गारीगार (शांत) होते. ॥ १४६८ ॥

**कां अनन्यगतीकमळा-। लागीं सूर्य ये वेळोवेळां। कीं सुखिया होइजे डोळां। त्रिभुवनींचां॥ १४६९ ॥**

**अर्थ**—किंवा कमळाच्या एकनिष्ठते करता सूर्य वारंवार येतो पण त्यामुळे त्रिभुवनातील लोकांच्या डोळ्यांना जसे सुख मिळते. ॥ १४६९ ॥

**तैसें अर्जुनाचेनि व्याजें। गीता प्रकाशूनि श्रीराजें। संसाराएवढें थोर ओझें। फेडिलें जगाचें॥ १४७० ॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे अर्जुनाला निमित्त करून भगवंतानी गीता प्रगट केली व जगाचे संसारासारखे प्रचंड ओझे नाहीसे केले. ॥ १४७० ॥

**सर्वशास्त्ररत्नदीप्ती। उजळिता हा त्रिजगती। सूर्यु नव्हे लक्ष्मीपती-। वक्त्राकाशींचा॥ १४७१ ॥**

**अर्थ**—सर्वशास्त्ररूपी रत्नांच्या तेजाला त्रैलोक्यात देदीप्यमान करणारा हा (गीता ग्रंथ) लक्ष्मीपतीच्या मुखरूपी आकाशातील हा सूर्यच नव्हे काय? ॥ १४७१ ॥

**बाप कुळ तें पवित्र। जेथिंचा पार्थु या ज्ञाना पात्र। जेणें गीता केलें स्वतंत्र। आवारु जगा॥ १४७२ ॥**

**अर्थ**—ज्यातील अर्जुन या आत्मज्ञानास पात्र होऊन त्याने सर्व जगाला गीतारूपी स्वतंत्र आवार मोकळे करून दिले ते कुळही पवित्र व धन्य होय. ॥ १४७२ ॥

**हें असो मग तेणें। सद्‌गुरुश्रीकृष्णें। पार्थाचें मिसळणें। आणिलें द्वैता॥ १४७३ ॥**

**अर्थ**—हे राहू द्या. मग त्या सद्‌गुरु श्रीकृष्णाने अर्जुनाच्या आपल्याशी झालेल्या प्रेमाद्वैतातून त्याला द्वैतावर आणले. ॥ १४७३ ॥

**पाठीं म्हणतसें पांडवा। शास्त्र हें मानलें कीं जीवा। तेथ येरु म्हणे देवा। आपुलिया कृपा॥ १४७४ ॥**

**अर्थ**—मग अर्जुनाला (भगवान्) म्हणाले. हे शास्त्र तुझ्या अंत:करणाला पटले की नाही? तेव्हा तो म्हणाला, भगवंता आपल्या कृपेने पटले. ॥ १४७४ ॥

**तरी निधान जोडावया। भाग्य घडे गा धनंजया। परि जोडिलें भोगावया। विपायें होय॥ १४७५ ॥**

**अर्थ**—तर अर्जुना, ठेवा प्राप्त होण्यास भाग्य पाहिजे पण मिळालेला ठेवा भोगण्याचे भाग्य मात्र क्वचितच लाभते. ॥ १४७५ ॥

**पैं क्षीरसागरायेवढें। अविरजी दुधाचें भांडें। सुरां असुरां केवढें। मथितां जालें॥ १४७६ ॥**

**अर्थ**—क्षीरसागराएवढें न विरजलेल्या दुधाचे भांडे घुसळताना देवांना व राक्षसांना किती तरी कष्ट पडले. ॥ १४७६ ॥

**ते सायासही फळा आले। जें अमृतही डोळां देखिलें। परी वरिली चुकले। जतने ते॥ १४७७ ॥**

**अर्थ**—ते सर्व श्रम शेवटी फळाला आले. कारण कीं त्यांनी (त्यातून निघालेले) अमृत डोळ्यांनी पाहिले. परंतु नंतर त्याचे रक्षण करण्यास ते चुकले. ॥ १४७७ ॥

**तेथ अमरत्वा वोगारिलें। तें मरणाचिलागीं जालें। भोगों नेणतां जोडले। ऐसें आहे॥ १४७८ ॥**

**अर्थ**—तेव्हा अमरत्व प्राप्त होण्याकरता जे वाटले ते (अमृत) ते मरणाला (दैत्यांच्या) कारण झाले. मिळालेले कसे भोगावे हे माहीत नसले म्हणजे असे होते. ॥ १४७८ ॥

**नहुषु स्वर्गाधिपति जाहला। परी राहाटीं भांबावला। तो भुजंगत्व पावला। नेणसी कायी॥ १४७९ ॥**

**अर्थ**—नहुष राजा स्वर्गाचा स्वामी झाला. पण स्वर्गाच्या वर्तणुकीच्या पद्धतीत चुकला. त्यामुळे त्याला सर्पयोनी प्राप्त झाली हे तुला माहीत नाही काय? ॥ १४७९ ॥

**म्हणौनि बहुत पुण्य तुवां। केलें तेणें धनंजया। आजि शास्त्रराजा इया। जालासि विषयो॥ १४८० ॥**

**अर्थ**—तेव्हा अर्जुना, तूं खूप पुण्यसंचय केला त्यामुळे आज तूं हे सर्वश्रेष्ठ शास्त्र (गीतारूप) प्राप्त होण्यास पात्र झाला आहेस. ॥ १४८० ॥

**तरी ययाचि शास्त्राचेनी। संप्रदायें पांघुरौनी। शास्त्रार्थु हा निकेनी। अनुष्ठीं हो॥ १४८१॥**

**अर्थ**—तर याच शास्त्राचा संप्रदाय अंगीकार करून या शास्त्राच्या शिकवणुकी चांगल्या रीतीने आचरणांत आण. ॥ १४८१ ॥

**एऱ्हवीं अमृतमंथना-। सारिखें होईल अर्जुना। जरी रिघसी अनुष्ठाना। संप्रदायेंवीण॥ १४८२॥**

**अर्थ**—नाही तर, अर्जुना, संप्रदायाशिवाय जर तूं आचरण करूं पाहशील तर अमृतमंथना सारखी स्थिती होईल. ॥ १४८२ ॥

**गाय धड जोडे गोमटी। ते तैंचि पय दे किरीटी। जैं जाणिजे हातवटी। सांजवणीची॥ १४८३॥**

**अर्थ**—गाय चांगली सुंदर धडधाकट मिळाली पण अर्जुना, धार काढण्याची कला अवगत असली तरच तिचे दूध मिळणार. ॥ १४८३ ॥

**तैसा श्रीगुरु प्रसन्नु होये। शिष्य विद्याही कीर लाहे। परी ते फळे संप्रदायें। उपासिलिया॥ १४८४॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे श्रीगुरु प्रसन्न होतील व शिष्याला खरोखर विद्याही प्राप्त होईल. पण ती (विद्या) फलद्रूप होईल संप्रदायानुसार अनुष्ठान केल्यासच॥ १४८४॥

**म्हणौनि शास्त्रीं जो इये। उचितु संप्रदायो आहे। तो ऐक आतां बहुवें। आदरेंसी॥ १४८५.॥**

**अर्थ**—तेव्हा या (गीता) शास्त्रात जो योग्य संप्रदाय आहे त्या विषयी अत्यंत आदरपूर्वक आता श्रवण कर. ॥ १४८५ ॥

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन। न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति॥ ६७॥**

**अर्थ**—तपरहित, गुरु व ईश्वराविषयी भक्ती नसलेला, जो हे ज्ञान ऐकण्याची इच्छा करीत नाही व जो माझी निंदा करतो, त्याला हे ज्ञान कधीही सांगू नये. ॥ ६७॥

**तरी तुवां हें जें पार्था। गीताशास्त्र लाधलें आस्था। तें तपोहीना सर्वथा। सांगावें ना हो॥ १४८६॥**

**अर्थ**—तरी अर्जुना, तुला हे गीताशास्त्र श्रद्धेने प्राप्त झाले आहे ते तपोहीन मनुष्याला मुळीच सांगू नको. ॥ १४८६ ॥

**अथवा तापसुही जाला। परी गुरुभक्ती जो ढिला। तो वेदीं अंत्यजु वाळिला। तैसा वाळी॥ १४८७॥**

**अर्थ**—किंवा तापस असूनही ज्याची गुरुविषयी भक्ती अढळ नाही त्याला, वेदाध्ययनाच्या बाबतीत ज्याप्रमाणे अंत्यजाला वाळीत टाकण्यात आले आहे त्याप्रमाणे वाळीत टाकावे. ॥ १४८७॥

**नातरी पुरोडाशु जैसा। न घापे वृद्ध तरी वायसा। गीता नेदी तैसी तापसा। गुरुभक्तिहीना॥ १४८८॥**

**अर्थ**—किंवा यज्ञातील अवशेष प्रसाद कावळा जरी वृद्ध असला तरी त्याला ज्याप्रमाणे घालीत नाही, त्याप्रमाणे तापस असला तरी गुरुभक्तीचा लवलेश नसेल तर त्याला गीताशास्त्र सांगू नये. ॥ १४८८॥

**का तपही जोडे देहीं। भजे गुरुदेवांच्या ठायीं। परी आकर्णनीं नाहीं। चाड जरी॥ १४८९॥**

**अर्थ**—अथवा एखाद्याने शारीरिक तप केले व तो श्रीगुरुंच्या व ईश्वराच्या ठिकाणी भक्तिनिष्ठही आहे पण त्याला (हे ज्ञान) ऐकण्याची इच्छा नसेल. ॥ १४८९ ॥

**तरी तो मागील दोहीं आंगीं। उत्तम होय कीर जगीं। परी या श्रवणालागीं। योग्यु नोहे॥ १४९०॥**

**अर्थ**—तर तो मागील (वर्णन केलेल्या) दोन्ही गुणांनी जगात खरोखर उत्तम असेल पण हे (गीताशास्त्र) श्रवण करण्याला मात्र योग्य नव्हे. ॥ १४९० ॥

**मुक्ताफळ भलतैसें। हो परी मुख नसे। तंव गुण प्रवेशे। तेथ कायी॥ १४९१॥**

**अर्थ**—मोती कितीही सुंदर असले पण त्यांना जर (छिद्र) नसेल तर त्यात दोरा जाईल काय?॥ १४९१॥

**सागरु गंभीरु होये। हें कोण ना म्हणत आहे। परी वृष्टि वायां जाये। जाली तेथ॥ १४९२॥**

**अर्थ**—समुद्र गंभीर आहे हे कोण नाही म्हणतो? पण त्यावर झालेली वृष्टी वाया जातेच॥ १४९२॥

**धालिया दिव्यान्न सुवावें। मग जें वायां धाडावें। तें आर्तीं कां न करावें। उदारपण॥ १४९३॥**

**अर्थ**—तृप्त झालेल्यांना सुग्राम अन्न वाढून ते वाया घालवण्यापेक्षा उदारपणाने ते भुकेल्यालाच का वाढू नये?॥ १४९३॥

**म्हणौनि योग्य भलतैसें। होतु परी चाड नसे। तरी झणें वानिवसें। देसी हें तयां॥ १४९४॥**

**अर्थ**—म्हणून (इतर बाबतीत) वाटेल तितका योग्य असला तरी गीता श्रवणाची जर त्याला इच्छा नसली तर कौतुकाने देखील हे गीताशास्त्र त्याला देऊं नको बर का!॥ १४९४॥

**रूपाचा सुजाणु डोळा। वोडवूं ये कायि परिमळा। जेथ जें माने तें फळा। तेथचि ये गा॥ १४९५॥**

**अर्थ**—रूपाचे ग्रहण करण्याला सुयोग्य असलेला डोळा सुवास घेण्याच्या कामी उपयोगी होईल काय? म्हणून जेथे जे योग्य असेल तेथेच ते फळद्रूप होते.॥ १४९५॥

**म्हणौनि तपी भक्ति। पाहावे ते सुभद्रापति। परी शास्त्रश्रवणीं अनासक्ति। वाळावेचि ते॥ १४९६॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना, (ज्यांना गीता सांगावयाची आहे) ते तपस्वी व भक्तिमान् आहेत किंवा नाही हे तर पहावेच पण (त्याबरोबरच) त्यांची जर गीता श्रवणाच्या ठिकाणी आवडी नसेल तर मात्र त्यांचा त्यागच करावा.॥ १४९६॥

**नातरी तपभक्ति। होऊनि श्रवणीं आर्ति। आथी ऐसीही आयती। देखसी जरी॥ १४९७॥**

**अर्थ**—अथवा तप, भक्ती व (गीताशास्त्र) श्रवण करण्याची इच्छा ही इतकी सामग्री असलेली जरी पाहशील॥ १४९७॥

**तरी गीताशास्त्रनिर्मिता। जो मी सकळलोकशास्ता। तया मातें सामान्यता। बोलेल जो॥ १४९८॥**

**अर्थ**—तरी त्या गीताशास्त्राला निर्माण करणारा व सर्व भूतमात्रांचे नियमन करणारा जो मी त्या माझ्याविषयी जो तुच्छतेने बोलेल.॥ १४९८॥

**माझ्या सज्जनेंसिं मातें। पैशून्याचेंनि हाते। येक आहाती तयांतें। योग्य न म्हण॥ १४९९॥**

**अर्थ**—माझ्या भक्तांची व माझी निंदा करणारे जे कोणी असतील अशा त्यांना हे गीताशास्त्र देण्यास योग्य समजू नकोस.॥ १४९९॥

**तयांची येर आघवी। सामग्री ऐसी जाणावी। दीपेंवीण ठाणदिवी। रात्रीची जैसी॥ १५००॥**

**अर्थ**—त्या अशा लोकांची असलेली इतर सर्व सामग्री म्हणजे रात्रीच्यावेळी दिवा न लावलेला स्थान दिवाच समजावा.॥ १५००॥

**अंग गोरें आणि तरुणें। वरि लेइलें आहे लेणें। परी येकलेनि प्राणें। सांडिलें जेवीं॥ १५०१॥**

**अर्थ**—शरीर गोरे व तरणे बांड आहे. शिवाय त्यावर अलंकारही घातलेले आहेत; परंतु ते एका प्राणाशिवाय जसे टाकावे लागते.॥ १५०१॥

**सोनयाचें सुंदर। निर्वाळिलें होय घर। परी सर्पांगना द्वार। रुंधलें आहे॥ १५०२॥**

**अर्थ**—सोन्याचे सुन्दर घर बांधले आहे, पण आत जाण्याचे द्वार मात्र जसे नागिणीने अडवून ठेवले असावे.॥ १५०२॥

**निपजे दिव्यान्न चोखट। परी माजीं असे काळकूट। असो मैत्री कपट-। गर्भिणी जैसी॥ १५०३॥**

**अर्थ**—सुग्रास अन्न तयार झालेले आहे पण त्यांत विष मिसळलेले असावे किंवा मैत्री असावी पण पोटात कपट असावे.॥ १५०३॥

**तैसी तपभक्तिमेधा। तयाची जाण प्रबुद्धा। जो माझयांची कां निंदा। माझीचि करी॥ १५०४॥**

**अर्थ**—हे बुद्धिमंता, जो माझ्या भक्तांची किंवा माझी निंदा करतो त्याचे तप, त्याची भक्ती व बुद्धी त्याप्रमाणे आहे असे समज.॥ १५०४॥

**याकारणें धनंजया। तो भक्तु मेधावी तपिया। तरी नको बापा इया। शास्त्रा आतळों देवों॥ १५०५॥**

**अर्थ**—अर्जुना, या कारणास्तव तो भक्त, बुद्धिवान् व तपस्वी असला तरी बाबा, ह्या शास्त्राला त्याला शिवू देऊ नकोस.॥ १५०५॥

**काय बहु बोलों निंदका। योग्य स्त्रष्ट्याहीसारिखा। गीता हे कवतिका। लागींही नेदी॥ १५०६॥**

**अर्थ**—फार काय सांगायचे! तो निंदक ब्रह्मदेवाच्या योग्यतेचा असला तरी कौतुकाकरताही हे गीताशास्त्र त्याला देऊ नकोस.॥ १५०६॥

**म्हणौनि तपाचा धनुर्धरा। तळीं दाटोनि गाडोरा। वरी गुरुभक्तीच: पुरा। प्रासादु जो जाला॥ १५०७॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना, खाली तपाचा पाया भरून त्यावर गुरुभक्तीचा जो मंदिर झाला आहे.॥ १५०७॥

**आणि श्रवणेच्छेचा पुढां। दारवंटा सदा उघडा। वरी कळशु चोखडा। अनिंदारत्नांचा॥ १५०८॥**

**अर्थ**—आणि (गीताशास्त्र) श्रवण करण्याच्या इच्छेचा दरवाजा निरंतर पुढे उघडा ठेऊन ज्या मंदिरावर निंदेच्या अभावरूपी रत्नांचा कळस ठेवला गेला आहे.॥ १५०८॥

**य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति । भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः॥ ६८॥**

**अर्थ**—हे अत्यंत गुप्त असलेले ज्ञान माझ्या ठिकाणी पराभक्ती करून जो माझ्या भक्तांना सांगेल तो नि:संशय माझ्या स्वरूपाला प्राप्त होईल.॥ ६८॥

**ऐशा भक्तालयीं चोखटीं। गीतारत्नेश्वरु हा प्रतिष्ठीं। मग माझिया संवसाटी। तुकसी जगीं॥ १५०९॥**

**अर्थ**—अशा भक्तरूपी पवित्र मंदिरात गीतारत्नरूपी ईश्वराची प्राणप्रतिष्ठा कर म्हणजे जगामध्ये माझ्याच योग्यतेस तू चढशील॥ १५०९॥

**का जे एकाक्षरपणेंसीं। त्रिमात्रकेचिये कुशीं। प्रणवु होतां गर्भवासीं। सांकडला॥ १५१०॥**

**अर्थ**—(ॐ या) एकाक्षराच्यारूपाने अ० उ० म० या त्रिमात्रकेच्या पोटात ओंकार हा गर्भवासामध्ये अडकला होता.॥ १५१०॥

**तो गीतेचिया बाहळीं। वेदबीज गेलें पाल्हाळीं। कीं गायत्री फुलीं फळीं। श्लोकांच्या आली॥ १५११॥**

**अर्थ**—वेदाचे बीज असलेला तो ॐकार गीतेच्या शाखांनी विस्तारला गेला किंवा (गीता म्हणजे जणुं काय) गायत्रीच श्लोकांच्या फुलांनी व फळांनी बहरली॥ १५११॥

**ते हे मंत्ररहस्य गीता। मेळवी जो माझिया भक्तां। अनन्यजीवना माता। बाळका जैसी॥ १५१२॥**

**अर्थ**—आई व्यतिरिक्त दुसरे जीवनच माहीत नसलेल्या बालकाची जशी आईशी गाठ घालून द्यावी त्याप्रमाणे (गायत्री) मंत्राचे रहस्य असलेल्या ह्या गीतेची जो माझ्या भक्ताशी गाठ घालून देईल.॥ १५१२॥

**तैसी भक्तां गीतेसीं। भेटी करी आदरेंसीं। तो देहापाठीं मजसीं। येकचि होय॥ १५१३॥**

**अर्थ**—व अशाप्रमाणे जो गीतेशी भक्तांची आदराने भेट करील तो देहपात झाल्यानंतर मत्स्वरूपच होईल.॥ १५१३॥

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः। भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि॥ ६९॥**

**अर्थ**—गीता शास्त्र संप्रदाय चालविणाऱ्या मनुष्यामध्ये त्याच्यापेक्षा मला कोणीही अतिशय प्रिय नाही व पुढेही जगतात त्यापेक्षा मला कोणीही अधिक प्रिय होणार नाही.॥ ६९॥

**आणि देहाचेंही लेणें। लेऊनि वेगळेपणें। असे तंव जीवेप्राणें। तोचि पढिये॥ १५१४॥**

**अर्थ**—आणि शरीररूपी अलंकार घालून तो (गीता सांगणारा) माझ्याहून वेगळा असतो तेव्हाही तो मला जीवाभावाने आवडतो.॥ १५१४॥

**ज्ञानियां कर्मठां तापसां। यया खुणेचिया माणुसां-। माजीं तो एकु गा जैसा। पढिये मज॥ १५१५॥**

**तैसा भूतळीं आघवा। आन न देखें पांडवा। जो गीता सांगे मेळावा। भक्तजनांचा॥ १५१६॥**

**अर्थ**—ज्ञानी, कर्मठ व तपस्वी या लक्षणांच्या मनुष्यामध्ये भक्तांच्या समुदायात गीता सांगणारा तो जसा मला आवडता होतो. ॥ १५१५ ॥ जो भक्तजनांच्या मेळाव्यांत गीता सांगतो तो मला जसा आवडतो तसा अर्जुना, दुसरा मला आवडता; या अखिल भूतळावर दिसत नाही. ॥ १५१६ ॥

**मज ईश्वराचेनि लोभें। हे गीता पढतां अक्षोभें। जो मंडन होय सभे। संतांचिये॥ १५१७॥**

**अर्थ**—मी जो ईश्वर त्या माझ्या केवळ प्रेमामुळे स्वस्थ चित्ताने जो गीता सांगत असतो तो संताच्या सभेचे भूषणच होय. ॥ १५१७ ॥

**नवपल्लवीं रोमांचितु। मंदानिळें कांपवितु। आमोदजळें वोलवितु। फुलांचे डोळे॥ १५१८॥**
**कोकिळाकलरवाचेनि मिषें। सद्गद बोलवीत जैसें। वसंत का प्रवेशे। मद्भक्तआरामीं॥ १५१९॥**
**का जन्माचें फळ चकोरां। होतु चंद्र ये अंबरा। नाना नवघन मयूरां। वो देत पावे॥ १५२०॥**
**तैसा सज्जनांच्या मेळावीं। गीतापद्यरत्नीं उमपीं। वर्षे जो माझ्या रूपीं। हेतु ठेऊनि॥ १५२१॥**

**अर्थ**—नवीन पालवींनी रोमांचित होऊन, मंदमंद वाऱ्याच्या झुळकीने त्यांना डोलवीत, सुवासिक जलाने फुलांचे डोळे ओले करीत॥ १५१८ ॥ कोकिळेच्या मधुर आवाजाच्या मिषाने गद्गद् होऊन हाका मारणाऱ्या वसंत ऋतुप्रमाणे जो माझ्या भक्तमंडळीरूपी बगीच्यात प्रवेश करतो॥ १५१९ ॥ किंवा चंद्र आकाशात उगवला म्हणजे चकोर पक्षाच्या जन्माचे सार्थक होते किंवा मोराच्या टाहोला ओ देत नूतन मेघ जसा येऊन ठाकतो. ॥ १५२० ॥ त्याप्रमाणे केवळ माझ्या स्वरूपाच्या प्राप्तीचे लक्ष्य ठेऊन जो सत्पुरुषांच्या मेळाव्यात गीतापद्यरूपी रत्नांचा अमाप वर्षाव करतो. ॥ १५२१ ॥

**मग तयाचेनि पाडें। पढियंतें मज फुडें। नाहींचि गा मागेंपुढें। न्याहाळितां॥ १५२२॥**

**अर्थ**—अर्जुना, मागे होऊन गेलेल्या व पुढे होणाऱ्या भक्तांचा विचार करता, अशा या पुरुषा इतका मला आवडता असा खरोखरच दुसरा कोणी नाही॥ १५२२ ॥

**अर्जुना हा ठायवरी। मी तयातें सूयें जिव्हारीं। जो गीतार्थाचें करी। परगुणें संतां॥ १५२३॥**

**अर्थ**—अर्जुना, गीतेच्या अर्थाची जो संताना मेजवानी देतो त्याला अद्यापपर्यंत मी आपला जीवीचा जिवलग करून ठेवत आलो आहे. ॥ १५२३ ॥

**अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः। ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः॥ ७०॥**

**अर्थ**—या आपल्या (मोक्ष) धर्मरूप संवादाचे जो अध्ययन करील त्याने ज्ञानरूपी यज्ञाने माझे यजन केले असे मी उमजतो. ॥ ७० ॥

**पैं माझिया तुझिया मिळणीं। वाढीनली जे हे कहाणी। मोक्षधर्म का जिणीं। आलासे जेथें॥ १५२४॥**

**अर्थ**—माझ्या व तुझ्या या भेटीत जी ही गीतारूपी कथा वाढली व ज्यात मोक्षधर्म जन्माला आला॥ १५२४॥

**तो हा सकळार्थप्रबोधु। आम्हां दोघांचा संवादु। न करितां पदभेदु। पाठेंचि जो पढे॥ १५२५॥**

**अर्थ**—तो हा सकल अर्थ देणारा आपणा उभयतांचा संवाद शब्दात काहीही बदल न करता. जो केवळ पठन करतो. ॥ १५२५ ॥

**तेणें ज्ञानानळीं प्रदीप्तीं। मूळ अविद्येचिया आहुती। तोषविला होय सुमती। परमात्मा मी॥ १५२६॥**

**अर्थ**—हे सुबुद्धी अर्जुना! त्याने धगधगीत झालेल्या ज्ञानरूपी अग्नीमध्ये मूळ अविद्येची आहुती देऊन मी जो परमात्मा त्या मला संतुष्ट केले आहे. ॥ १५२६ ॥

**घेऊनि गीतार्थ उगाणा। ज्ञानिये जें विचक्षणा। ठाकिती तें गाणावाणा। गीतेचा तो लाहे॥ १५२७॥**

**अर्थ**—हे ज्ञानी अर्जुना, गीतेच्या अर्थाचा झाडा (विस्तृत ज्ञान) घेऊन ज्ञानी पुरुष ज्या पदास पोहोचतात तेच पद गीतेचे गायन करणाऱ्यास व वर्णन करणाऱ्यास प्राप्त होते. ॥ १५२७ ॥

**गीतापाठकासि असे। फळ अर्थज्ञाचि सरिसें। गीतामाउलियेसि कीं नसे। जाणें तान्हें॥ १५२८॥**

**अर्थ**—गीतेचा पाठ (अर्थरहित) करणाऱ्यास गीतेचा अर्थ जाणणाऱ्या इतकेच फळ प्राप्त होते. गीतारूपी मातेला जाणते (ज्ञानी) मूल व नेणते (अज्ञानी) मूल हा भेद नाही. ॥ १५२८ ॥

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः। सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम्॥ ७१ ॥**

**अर्थ**—श्रद्धायुक्त व मत्सररहित असा मनुष्य हे श्रवण करील तर तो देखील पापापासून मुक्त होईल व पुण्यकर्म करण्याने मिळणाऱ्या शुभ लोकांना प्राप्त होईल. ॥ ७१ ॥

**आणि सर्वमार्गी निंदा। सांडूनि आस्था पैं शुद्धा। गीताश्रवणीं श्रद्धा। उभारी जो॥ १५२९ ॥**

**अर्थ**—आणि सर्वतोपरी निंदा टाकून देऊन श्रवणाच्या (गीता श्रवणाच्या) ठिकाणी आस्थेने शुद्ध श्रद्धा जो ठेवील ॥ १५२९ ॥

**तयाच्या श्रवणपुटीं। गीतेचीं अक्षरें जंव पैठीं। होतीना तंव उठाउठीं। पळेचि पाप॥ १५३० ॥**

**अर्थ**—त्याच्या कानामध्ये गीतेची अक्षरे शिरतात न शिरतात तोच पाप तत्काळ पळून जाते. ॥ १५३० ॥

**अटवियेमाजीं जैसा। वन्हि रिघतां सहसा। लंघिती का दिशा। वनौकें तियें॥ १५३१ ॥**

**का उदयाचळकुळीं। झळकतां अंशुमाळी। तिमिरें अंतराळीं। हारपती॥ १५३२ ॥**

**तैसा कानाच्या महाद्वारीं। गीता गजर जेथ करी। तेथ सृष्टीचिये आदीवरी। जायचि पाप॥ १५३३ ॥**

**अर्थ**—अरण्यात अकस्मात् वणवा पेटला असता वनातील पशुपक्षी जसे सैरावैरा पळत सुटतात॥ १५३१ ॥ किंवा उदय गिरीवर सूर्य झळकू लागला म्हणजे आकाशातील अंधःकार जसा नाहीसा होतो. ॥ १५३२ ॥ त्याप्रमाणे जेथे कानाच्या महाद्वारात गीतेचा गजर होतो तेथे सृष्टीच्या आरंभा पासून झालेले पाप (ऐकणाऱ्याचे) नष्ट होते. ॥ १५३३ ॥

**ऐसी जन्मवेली धुवट। होय पुण्यरूप चोखट। याहीवरी अचाट। लाहे फळ॥ १५३४ ॥**

**अर्थ**—ह्या प्रमाणे जन्माची परंपरारूप वेल निर्मल होऊन शुद्ध व पुण्यरूप होते व मग तिला अद्भुत (मोठे) फळयेते. ॥ १५३४ ॥

**जे इये गीतेचीं अक्षरें। जेतुलीं का कर्णद्वारें। रिघती तेतुले होती पुरे। अश्वमेध कीं॥ १५३५ ॥**

**अर्थ**—कारण की या गीतेची अक्षरे जितकी जितकी कर्णद्वारात शिरतील तितके तितके पूर्ण अश्वमेध यज्ञ घडल्याप्रमाणे होते. (अश्वमेधाचे पुण्य प्राप्त होते) ॥ १५३५ ॥

**म्हणौनि श्रवणें पापें जाती। आणि धर्म धरी उन्नती। तेणें स्वर्गराज्यसंपत्ति। लाहेचि शेखीं॥ १५३६ ॥**

**अर्थ**—म्हणून (गीतेच्या) श्रवणाने पापे जातात आणि धर्माचा उत्कर्ष होतो आणि त्यामुळे शेवटी स्वर्गाच्या राज्याची संपत्ती मिळते. ॥ १५३६ ॥

**तो पैं मज यावयालागीं। पहिलें पेणें करी स्वर्गीं। मग आवडे तंव भोगी। पाठीं मजचि मिळे॥ १५३७ ॥**

**अर्थ**—माझ्याकडे येण्याकरता तो पहिला मुक्काम स्वर्गाचा करतो. आणि आवडेल तो पर्यंत स्वर्गसुखाचा भोग उपभोगून मागाहून मलाच येऊन मिळतो. ॥ १५३७ ॥

**ऐसी गीता धनंजया। ऐकतया आणि पढतया। फळे महानंदें मियां। बहु काय बोलों॥ १५३८ ॥**

**अर्थ**—अर्जुना, अशी ही गीता ऐकणाऱ्याला व पठन करणाऱ्याला महान आनंदाने फळ देते (परमानंद स्वरूप माझी प्राप्ति करून देते) यापेक्षा जास्त काय सांगायचे!॥ १५३८ ॥

**याकारणें हें असो। परी जयालागीं शास्त्रातिसो। केला तें तंव तुज पुसों। काज तुझें॥ १५३९ ॥**

**अर्थ**—एवढ्या करता हे राहू दे. पण ज्या करता एवढा हा शास्त्राचा विस्तार केला ते तुझे काम तुला आता विचारतो (त्या तुझ्या कामाविषयी आता विचारले पाहिजे.) ॥ १५३९ ॥

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा। कच्चिदज्ञानसम्मोहः प्रनष्टस्ते धनञ्जय॥ ७२ ॥**

**अर्थ**—अर्जुना, तू एकाग्र चित्ताने हे श्रवण केलेस ना? धनंजया, तुझ्या अज्ञानापासून उत्पन्न झालेला मोह नष्ट झाला ना?॥ ७२ ॥

**तरी सांग पां पांडवा। हा शास्त्रसिद्धांतु आघवा। तुज एकचित्तें फावा। गेला आहे॥ १५४० ॥**

**अर्थ**—तर अर्जुना, हा सर्व शास्त्रसिद्धान्त एकाग्र चित्ताने नीट समजून घेतलास की नाही; सांग पाहू? ॥ १५४० ॥

**आम्हीं जैसें जया रीती। उगाणिलें कानांच्या हातीं। येरीं तैसेंचि तुझ्या चित्तीं। पैठें केलें कीं॥ १५४१ ॥**

**अर्थ**—आम्ही जसे व ज्यारीतीने हे ज्ञान तुझ्या कानांच्या पदरात टाकले. पण बघ, तसेच व त्यारीतीने ते तुझ्या चित्तात स्थिरावले की नाही? ॥ १५४१ ॥

**अथवा माझारीं। गेलें सांडिविखुरी। किंवा उपेक्षेवरी। वाळूनि सांडिलें॥ १५४२ ॥**

**अर्थ**—अथवा मध्येच ते सांडण्यालोटण्यावारी गेले आहे किंवा त्याची उपेक्षा होऊन ते टाकून दिले गेले आहे? ॥ १५४२ ॥

**जैसें आम्हीं सांगितलें। तैसेंचि हृदयीं पावलें। तरी सांग पां वहिलें। पुसेन तें मी॥ १५४३ ॥**

**अर्थ**—जसे आम्ही तुला सांगितले तसेच जर तुझ्या अंतःकरणात सांठवले असेल तर मी आता जे विचारीन ते लवकर सांग पाहू॥ १५४३ ॥

**तरी स्वाज्ञानजनितें। मागिलें मोहें तूतें। भुलविलें तो येथें। असे कीं नाहीं॥ १५४४ ॥**

**अर्थ**—आपल्या स्वरूपाच्या अज्ञानामुळे उत्पन्न झालेल्या ज्या मोहाने तुला भ्रमात पाडले होते तो मोह अजून आहे की नाही!॥ १५४४ ॥

**हें बहु पुसो काई। सांगें तूं आपल्या ठाईं। कर्माकर्म कांहीं। देखतासीं॥ १५४५ ॥**

**अर्थ**—हे फार काय विचारायचे? तूं हे सांग की, तूं स्वतःच्या ठिकाणी (अद्यापि) कर्माकर्म बघतोस काय? ॥ १५४५ ॥

**पार्थु स्वानंदैकरसें। विरेल ऐसा भेददशे। आणिला येणें मिषें। प्रश्नाचेनि॥ १५४६ ॥**

**अर्थ**—अर्जुन हा आत्मानंदाच्या रसात विरून जाईल म्हणून या प्रश्नाच्या निमित्ताने त्याला द्वैत दशेत आणले॥ १५४६ ॥

**पूर्णब्रह्म जाला पार्थु। तरी पुढील साधावया कार्यार्थु। मर्यादा श्रीकृष्णनाथु। उल्लंघों नेदी॥ १५४७ ॥**

**अर्थ**—अर्जुन पूर्णब्रह्मस्वरूप झाला तरी पुढील कार्य साधण्याकरता भगवान् श्रीकृष्ण त्याला कर्मयोगाची मर्यादा ओलांडू देईनात. ॥ १५४७ ॥

**एऱ्हवीं आपुलें करणें। सर्वज्ञ काय तो नेणे। परी केलें पुसणें। याचिलागीं॥ १५४८ ॥**

**अर्थ**—न होतर, आपल्या उपदेश कृतीचा परिणाम सर्वज्ञ असलेला भगवान् काय जाणत नव्हता! परंतु अर्जुन देहभानावर यावा म्हणूनच देवांनी प्रश्न विचारला. ॥ १५४८ ॥

**एवं करोनियां प्रश्न। नसतेंचि अर्जुनपण। आणूनियां जालें पूर्णपण। तें बोलवी स्वयें॥ १५४९ ॥**

**अर्थ**—याप्रमाणे प्रश्न करून नसताच अर्जुनपणा नाहीसे झालेले अर्जुनाचे देहभान आणून ब्रह्मप्राप्तीचा जो अनुभव अर्जुनाला आला होता तोच त्याला बोलायला लावला. ॥ १५४९ ॥

**मग क्षीराब्धीतें सांडितु। गगनीं पुंजुमंडितु। निवडे जैसा न निवडितु। पूर्णचंद्र॥ १५५० ॥**
**तैसा ब्रह्म मी हें विसरे। तेथ जगचि ब्रह्मत्वें भरे। हेंही सांडी तरी विरे। ब्रह्मपणही॥ १५५१ ॥**

**अर्थ**—क्षीरसमुद्रातून निघणारा व आपल्या किरणांच्या पुंजाने सुशोभित दिसणारा आकाशातील पौर्णिमेचा चंद्र जसा पांढरा तसाच क्षीरसमुद्रही पांढरा. ते आपले पांढरेपण निळे न करताच निराळा दिसावा. ॥ १५५० ॥ त्याप्रमाणे 'मी ब्रह्म आहे' ही जाणीव विसरतो तेव्हा सर्वजगच ब्रह्मरूप असल्याची (अमर्यादित्वाची) जाणीव निर्माण होते व तीही नाहीशी होताच ब्रह्मपणाच्या व्यापकत्वाची जाणीवही पूर्णपणे विरून जाते. ॥ १५५१ ॥

**गूढार्थदीपिका—हेंही सांडी तरी विरे। ब्रह्मपणही।**

जोपर्यंत जाणीव कायम राहते तोपर्यंत ब्रह्मरूपता आंगी बाणली असे म्हणता येत नाही. 'मी ब्रह्मस्वरूप आहे' ही जाणीव अब्रह्मरूप जो पूर्वी प्रत्यय येत होता त्याच्या अपेक्षेने असल्यामुळे ही विद्यावृत्ती असली तरी लेखाविद्याच आहे हे ज्ञान व्यतिरेक ज्ञान आहे. ''नामरूपांनी भासणारे सर्व दृश्य जगत् हे ब्रह्मच आहे'' हा अन्वयाचा प्रत्यय व्यतिरेक ज्ञानानंतर येतो. हे अन्वयाचे व्यापक ज्ञान असले तरी हीही वृत्तीच आहे. ज्ञानांश जोपर्यंत प्रधान आहे तोपर्यंत जाणीव ही कायम राहणारच. व जाणीव आहे तोपर्यंत वृत्तिरूपता नाहीशी होऊ शकत नाही. तेव्हा ही वृत्तीही नाहीशी झाल्याशिवाय ब्रह्मरूपतेचा जाणीवरहित अनुभव येऊं शकत नाही. ही ज्ञानाची वृत्ती अर्थातच दुसऱ्या कोणत्याही ज्ञानाने नाहीशी होऊ शकत नाही. तिला नाहीशी करावयाचे असल्यास प्रेमवृत्तीला प्रधान करणे हाच त्यावर उपाय आहे. प्रेम हे सगुण साकार भगवंताविषयी होत असल्यामुळे अशा ज्ञानीभक्तांचा सर्व व्यवहारच भगवद्रूप होतो व जीवन्मुक्तीतच त्यांना विदेहमुक्तीचाही लाभ होतो. ज्ञान्याच्या ठिकाणी असणारा समाधि व व्युत्थान हाही भेद त्यांना भासत नाही व त्यांना नित्य समाधीसुख लाभते. ''यत्र यत्र मनो याति तत्र तत्र समाधय:'' ही उक्ती ज्ञानोत्तर भक्तांच्याच ठिकाणी सार्थ होते, केवळ ज्ञान्याच्या ठिकाणी नाही.

**ऐसा मोडतु मांडतु ब्रह्में। तो दु:खें देहाचिये सीमे। मी अर्जुन येणें नामें। उभा ठेला॥ १५५२॥**

**अर्थ**—याप्रमाणे एक (अव्यापक) जाणीव सोडत व दुसरी (व्यापक) जाणीव धरीत तो देहाच्या सीमेवर 'मी अर्जुन' या नावाने मोठ्या दु:खाने उभा राहिला.॥ १५५२॥

**मग कापतां करतळीं। दडपूनि रोमावळी। पुल्कू स्वेदजळीं। जिरऊनियां॥ १५५३॥**
**प्राणक्षोभें डोल्तया। आंगा आंगचि टेंकया। सूनि स्तंभु चाळया। भुलौनियां॥ १५५४॥**
**नेत्रयुगुळाचेनि वोतें। आनंदामृताचें भरितें। वोसंडत तें मागुतें। काढूनियां॥ १५५५॥**
**विविधा औत्सुक्यांची दाटी। चीप दाटत होती कंठीं। ते करूनियां पैठी। हृदयामाजीं॥ १५५६॥**
**वाचेचें वितुळणें। सांवरूनि प्राणें। अक्रमाचें श्वसणें। ठेऊनि ठायीं॥ १५५७॥**

**अर्थ**—मग कापऱ्या तळहातांनी उभे राहिलेले रोमांच दाबून व पुलकित झाल्यामुळे आलेल्या स्वेदबिंदूना जिरवून॥ १५५३॥ श्वास लागल्यामुळे हालणाऱ्या अंगाला अंगाचाच टेका देऊन व हालचालीला विसरून स्तब्ध राहून.॥ १५५४॥ दोन्ही डोळ्यांतील अश्रूंच्या रूपाने आनंदामृताच्या पुराचा जो लोट वहात होता त्याला मागच्यामागे थोपवून॥ १५५५॥ नाना प्रकारच्या उत्कंठेच्या गर्दीमुळे कंठात जो गहिवर दाटत होता त्याला हृदयात दाबून टाकून॥ १५५६॥ (बोबडी वळल्यामुळे) विस्कळीत झालेल्या वाणीला प्राणाने सावरून व अनियमित झालेल्या श्वासाला पूर्ववत करून (नियमित करून)॥ १५५७॥

*अर्जुन उवाच*

**नष्टो मोह: स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाऽच्युत। स्थितोऽस्मि गतसन्देह: करिष्ये वचनं तव॥ ७३॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणाला—माझा मोह नाहीसा झाला, भगवंता, तुझ्याकृपेने माझ्या खऱ्या स्वरूपाचे मला ज्ञान झाले. आता मी नि:संदेह झालो आहे. आता तुझी आज्ञा पालन करीन.॥ ७३॥

**मग अर्जुन म्हणे काय देवो। पुसताति आवडे मोहो। तरी तो सकुटुंब गेला जी ठावो। घेऊनि आपला॥ १५५८॥**

**अर्थ**—मग अर्जुन म्हणाला, देवा, मोह आवडतो की काय म्हणून आपण विचारता; तर, तो महाराज आपले ठिकाण घेऊन परिवारासह गेला॥ १५५८॥

**पासीं येऊनि दिनकरें। डोळ्यातें आंधारें। पुसिजे हें कायि सरे। कोणे गांवीं॥ १५५९॥**
**तैसा तूं श्रीकृष्णराया। आमुचिया डोळ्यां। गोचर हेंचि कायिसया। न पुरे तंव॥ १५६०॥**

**अर्थ**—सूर्याने जवळ येऊन डोळ्यांनाच विचारायचे की आता आंधार आहे काय? असे कोणत्या गावी घडले आहे?॥ १५५९॥ त्याप्रमाणे श्रीकृष्णराया, तूं आमच्या डोळ्यासमोर उभा आहेस येवढेच त्याला (मोह विनाशाला) पुरे नाही काय?॥ १५६०॥

**वरी लोभें मायेपासूनी। तें सांगसी तोंड भरूनी। जें कायिसेनिही करूनी। जाणूं नये॥ १५६१॥**

**अर्थ**—शिवाय, जे कशानेही (कोणत्याही साधनमार्गांनी) जाणता येणार नाही ते आईपेक्षाही अधिक प्रेमाने तू तोंड भरून सांगतोस.॥ १५६१॥

**आतां मोह असे कीं नाहीं। हें ऐसें जी पुससी काई। कृतकृत्य जाहलों पाहीं। तुझेपणें॥ १५६२॥**

**अर्थ**—तेव्हा आता मोह (मला) आहे की नाही हे आपण काय विचारता? मी तुझ्या स्वरूपाशी ऐक्य पावल्याने कृतकृत्य झालो पहा!॥ १५६२॥

**गुंतलों होतों अर्जुनगुणें। तो मुक्त जालों तुझेपणें। आतां पुसणें सांगणें। दोन्ही नाहीं॥ १५६३॥**

**अर्थ**—अर्जुनपणामुळे मी जो अडकलो होतो तो तुझ्यास्वरूपाशी ऐक्य पावल्यामुळे मुक्त झालो. आता तू विचारणे व मी सांगणे या दोन्ही गोष्टी उरल्या नाहीत.॥ १५६३॥

**मी तुझेनि प्रसादें। लाधलेनि आत्मबोधें। मोहाचे तया कांदे। नेदीच उरों॥ १५६४॥**

**अर्थ**—तुमच्या कृपेमुळे प्राप्त झालेल्या आत्मबोधाने मोहाचे मूळ (मी आपल्या ठिकाणी) मुळीच शिल्लक राहू देणार नाही.॥ १५६४॥

**आतां करणें का न करणें। हें जेणें उठी दुजेपणें। तें तूं वांचूनि नेणें। सर्वत्र गा॥ १५६५॥**

**अर्थ**—आता, भगवंता, करणे किंवा न करणे हे ज्या दुजेपणामुळे (द्वैतामुळे) निर्माण होते ते, आता तुझ्या एका शिवाय सर्व ठिकाणी मला काहीही नसल्यामुळे, उरले नाही.॥ १५६५॥

**येविषयीं माझ्या ठायीं। संदेहाचें नुरेचि कांहीं। त्रिशुद्धी कर्म जेथ नाहीं। तें मी जालों॥ १५६६॥**

**अर्थ**—याविषयीं माझ्या ठिकाणीं कोणताही संदेह मुळीच उरला नाही. तर निश्चयेकरून जेथे कर्माचा संबंधच नाही ते (ब्रह्मस्वरूपच) मी झालो आहे.॥ १५६६॥

**तुझेनि मज मी पावोनी। कर्तव्य गेलें निपटूनी। परी आज्ञा तुझी वांचोनी। आन नाहीं प्रभो॥ १५६७॥**

**अर्थ**—तुझ्या कृपेने माझे आत्मस्वरूप मला प्राप्त होऊन 'अमके करायचे' अशा तऱ्हेचे कर्तव्य सपशेल नाहीसे झाले. परंतु तुमच्या आज्ञेवाचून, भगवंता, आता मला दुसरे कर्तव्य काही नाही.॥ १५६७॥

**कां जें दृश्य दृश्यातें नाशी। जें दुजें द्वैतातें ग्रासी। जें एक परी सर्वदेशीं। वसवी सदा॥ १५६८॥**

**अर्थ**—कारण की गुरुरूप जे दृश्य श्रीगुरुमूर्ती म्हणजे श्रीकृष्ण स्वरूप (पंचभूतात्मक) दृश्याचा नाश करते व जे दुसरे दिसतात पण द्वैताचा पूर्ण निरास करतात व जे एकच असले तरी सर्व देशात वास करतात॥ १५६८॥

**जयाचेनि संबंधें बंधु फिटे। जयाचिया आशा आस तुटे। जें भेटलया सर्व भेटे। आपणपांचि॥ १५६९॥**

**अर्थ**—ज्याच्या संबंधाने संसाराचे बंधन तुटून पडते, ज्याची आशा केली असता इतर सर्व आशा नष्ट होतात, व जे भेटले असता आपल्याच ठिकाणी सर्व भेटते.॥ १५६९॥

**तें तूं गुरुलिंग जी माझें। जें येकलेपणींचें विरजें। जयालागीं वोलांडिजे। अद्वैतबोधु॥ १५७०॥**

**अर्थ**—ज्याच्या प्रीतीकरता अद्वैतबोधही उल्लंघावा लागतो व जी एकाकीपणालाच (अद्वैतभावाला) साह्य करते अशी माझी श्रीगुरुमूर्ती तू आहेस.॥ १५७०॥

**आपणचि होऊनि ब्रह्म। सारिजे कृत्याकृत्यांचे काम। मग कीजे का निःसीम। सेवा जयाची॥ १५७१॥**

**अर्थ**—आपणच ब्रह्मरूप होऊन कार्य व अकार्य यांचा झगडा मिटवून मग ज्याची निःसीम सेवा करावी.॥ १५७१॥

**गंगा सिंधु सेवूं गेली। पावतांचि समुद्र जाली। तेवीं भक्तां सेल दिधली। निजपदाची॥ १५७२॥**

**अर्थ**—गंगा समुद्राची सेवा करायला गेली व तेथे पोहचताच समुद्ररूप झाली त्याप्रमाणे आपणही भक्ताला आपल्या ब्रह्मपदाचा शेवटचा वाटा दिलात.॥ १५७२॥

**तो तूं माझा जी निरुपचारु। श्रीकृष्णा सेव्य सद्गुरु। मा ब्रह्मतेचा उपकारु। हाचि मानी॥ १५७३॥**

**अर्थ**—श्रीकृष्णा, तो तू माझा निरुपाधिक सेवा करण्यास योग्य असा सद्‍गुरु आहेस. आपण मला ब्रह्मरुपता प्राप्त करून दिली हा माझ्यावर उपकार झाला. पण त्याची फेड म्हणजे सद्‍गुरुचरणसेवा घडावी हे मी समजतो॥ १५७३॥

**गूढार्थदीपिका—या ब्रह्मतेचा उपकारु। हाचि मानी।**

**'देखे आपुलिया प्रतीति। जगचि मुक्त।'** अशी ज्यांची ज्ञानदृष्टी परिपक्व झाली आहे अशा तऱ्हेचे सद्‍गुरु कोणाला शिष्य मानू शकतील? त्याना जर शिष्यच भासत नसेल तर ते आपल्याठिकाणी गुरुत्व तरी कसे वागवतील? तुकाराम महाराजांनी म्हटल्याप्रमाणे शिष्याची ते सेवा घेऊ शकत नाहीत कारण शिष्यालाही ते देवच मानतात 'शिष्याची जो नेघे सेवा। मानी देवा समान' आत्मस्वरूप अफूट असल्याकारणाने गुरुशिष्यादी कोणताही संबंध त्या ठिकाणी राहू शकत नाही.

पण असे असले तरी दिव्याने दिवा लावला असता पहिल्या दिव्याचे मोठेपण जसे नाहीसे होत नाही, त्याप्रमाणे शिष्याच्या बुद्धीतून श्रीगुरुविषयीची कृतज्ञाता बुद्धी नाहीशी होऊ शकत नाही. श्रीगुरुनी मला ब्रह्मस्थितीच्या अंतिम टोकावर बसविल्यामुळे मी पूर्ण ब्रह्मस्वरूप झालो; आता मला कृत्याकृत्य काहीही राहिले नाहीत. पण श्रीगुरुची नि:सीम सेवा करणे एवढेच आता एक शिल्लक राहिले.

अज्ञान दशेत भेदाचे कवाड आड येत असल्यामुळे अहंता व ममता या दोन्ही अंशांनी श्रीगुरुची सेवा करता येऊ शकली नाही. ज्ञानाने तो अडसर दूर होऊन गेल्यामुळे श्रीगुरुच्या ऋणातून मुक्त होण्याचा एकच मार्ग आता उरला व तो म्हणजे त्यांची नि:सीम सेवा करणे. माउलीनी याठिकाणी एकप्रकारे सच्छिष्य कसा असतो किंवा असावा याचा आदर्शच येथे सांगितला आहे.

शिष्याच्या अंत:करणातून गुरुत्वभावना ज्ञानानंतर नाहीशी झाल्यास शिष्याचा ज्ञानाहंकार बळावण्याचा संभव असतो व म्हणूनच वेदान्तात **'नाद्वैतन् गुरुणासह'** अशी ज्ञानी शिष्याला शिकवण दिली आहे. (तत्वोपदेश० श्लो० ८७)

**जें मज तुम्हां आड। होतें भेदाचें कवाड। तें फेडोनि केलें गोड। सेवासुख॥ १५७४॥**

**अर्थ**—तुमच्या आणि माझ्याकडे जे भेदाचे दार आडवे होते ते काढून टाकून तुम्ही सेवेचे गोड सुख प्राप्त करून दिले.॥ १५७४॥

**तरी आतां तुझी आज्ञा। सकळदेवाधिदेवराज्ञा। करीन देईं अनुज्ञा। भलतियेविषयी॥ १५७५॥**

**अर्थ**—तर आता, हे सकळ देवाधिदेवा! तुमची आज्ञा मला शिरसावंद्य आहे. आपण मला कोणतीहि आज्ञा द्या.॥ १५७५॥

**यया अर्जुनाचिया बोला। देवो नाचे सुखें भुल्ला। म्हणे विश्वफळा जाला। फळ हा मज॥ १५७६॥**

**अर्थ**—या अर्जुनाच्या बोलण्याने भगवान् सुखाने भांबावून जाऊन आनंदाने नाचू लागले आणि म्हणाले विश्वाचे साध्य जो मी त्या मला हा फळ (आनंद) देणारा झाला.॥ १५७६॥

**उणेनि उमचला सुधाकरु। देखुनी आपला कुमरु। मर्यादा क्षीरसागरु। विसरेचिना॥ १५७७॥**

**अर्थ**—आपला मुलगा जो चंद्र त्याचा उणेपणा (कलारहित) नाहीसा होऊन तो पूर्णत्वाने प्रकाशू लागल्यावर समुद्र आपली मर्यादा सांडतोच ना!॥ १५७७॥

**ऐसें संवादाचां बहुलां। लग्न दोघांचिया आंतुला। लागलें देखोनि जाला। निर्भरु संजयो॥ १५७८॥**

**अर्थ**—याप्रमाणे संवादाच्या बोहल्यावर दोघांचे (श्रीकृष्ण व अर्जुन) यांचे अंतर्भावाचे मीलन झालेले पाहून संजय हर्षभरित झाला॥ १५७८॥

**तेणें म्हणतसे संजयो। बाप कृपानिधी रावो। तो आपुला मनोभावो। अर्जुनेंसी केला॥ १५७९॥**

**अर्थ**—त्या भरात संजय म्हणाला, "प्रभु कृपानिधी फार थोर! त्याने अर्जुनाला आपला मनोभावच करून सोडला" म्हणजे अर्जुनाप्रमाणे तोही संवादरूपी सुखांने उचंबळून आला॥ १५७९॥

**तेणें उचंबळलेपणें। संजय धृतराष्ट्रातें म्हणें। जी कैसें बादरायणें। रक्षिलों दोघे॥ १५८०॥**

**अर्थ**—तसाच सद्‌गदित अंत:करणाने संजय धृतराष्ट्राला म्हणाला "महाराज! आपण दोघे व्यासाकडून कसे रक्षिलो गेलो." (कृपेला पात्र झालो.)॥ १५८०॥

**आजि तुमतें अवधारा। नाहीं चर्मचक्षूही संसारा। कीं ज्ञानदृष्टिव्यवहारा। आणिलेती॥ १५८१॥**

**अर्थ**—अहो ऐका, तुम्हाला तर संसार करण्यास लागणारे डोळेही नाहीत म्हणूनच ज्ञानदृष्टीच्या व्यवहाराला आपणाला आणले॥ १५८१॥

**आणि रथींचिये राहाटी। घेईजो घोडेयासाठीं। तया आम्हां या गोष्टी। गोचरा होती॥ १५८२॥**

**अर्थ**—आणि रथांचे घोडे (परीक्षा करून) घेण्यासाठी ज्या आम्हाला ठेवले त्या आम्हाला (कृष्णार्जुन संवादाच्या) ह्या गोष्टी प्रत्यक्ष ऐकण्याचा योग आला!॥ १५८२॥

**वरी जुंझाचें निर्वाण। मांडलें असे दारुण। दोहीं हारीं आपण। हारपिजे जैसें॥ १५८३॥**

**अर्थ**—शिवाय युद्ध तर असे प्रचंड घनघोर चालू आहे की दोहोपैकी कोणाचाही पराभव झाला तरी आपलीच हार आहे असे प्रत्येकाला वाटते.॥ १५८३॥

**येवढा जिये सांकडां। कैसा अनुग्रहो पैं गाढा। जे ब्रह्मानंदु उघडा। भोगवीतसे॥ १५८४॥**

**अर्थ**—एवढे जेथे भयानक संकट उभे राहिले आहे, तेथे आम्हाला प्रत्यक्ष ब्रह्मानंद भोगावयास मिळत आहे.॥ १५८४॥

**ऐसें संजय बोलिला। परी न द्रवे येरु उगला। चंद्रकिरणीं शिवतला। पाषाणु जैसा॥ १५८५॥**

**अर्थ**—चंद्र किरणांचा स्पर्श होऊनही दगडाला जसा पाझर फुटत नाही त्याप्रमाणे संजय अशाप्रकारे बोलला तरी धृतराष्ट्राच्या मनाला किंचितही द्रव आला नाही.॥ १५८५॥

**हे देखोनि तयाची दशा। मग करीचि ना सरिसा। परी सुखें जाला पीसा। बोलतसे॥ १५८६॥**

**अर्थ**—ही त्याची अवस्था पाहून त्याने बोलण्याचे सोडून दिले होते तरीपण हर्षातिशयाने बेहोष झाल्यामुळे तो बोलतच राहिला॥ १५८६॥

**भुलविला हर्षवेगें॥ म्हणौनि धृतराष्ट्रा सांगें। एऱ्हवीं नव्हे तयाजोगें। हें कीर जाणे॥ १५८७॥**

**अर्थ**—हर्षातिशयाने वाहवला गेल्यामुळे तो धृतराष्ट्राला सांगू लागला. एऱ्हवी तो ऐकण्याच्या योग्यतेचा नाही हे तो निश्चितपणे जाणत होता.॥ १५८७॥

*सञ्जय उवाच*

**इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः। संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम्॥ ७४॥**

**अर्थ**—संजय म्हणाला—महात्मा अर्जुन व श्रीकृष्ण यांचा अत्यंत विस्मयकारक व अंगावर रोमांच उभे राहतील इतका आनंददायक असलेला संवाद मी ऐकला.॥ ७४॥

**मग म्हणे पैं कुरुराजा। ऐसा भ्रातृपुत्र तो तुझा। बोलिला तें अधोक्षजा। गोड जालें॥ १५८८॥**

**अर्थ**—मग संजय म्हणाला, "हे कौरवाधिपते, असे तुझा पुतण्या जो अर्जुन जे काही बोलला, ते बोलणे श्रीकृष्णाला फार गोड वाटले."॥ १५८८॥

**अगा पूर्वापर सागर। हा नामासीचि सिनार। येर आघवें तें नीर। एक जैसें॥ १५८९॥**
**तैसा श्रीकृष्ण पार्थ ऐसें। हें आंगाचिपासीं दिसे। मग संवादीं जी नसे। कांहींचि भेदु॥ १५९०॥**

**अर्थ**—अहो, पूर्वेचा समुद्र, पश्चिमेचा समुद्र ही नावेच काय ती वेगवेगळी, एरव्ही पाणी येथून तेथून सारे जसे एकच.॥ १५८९॥ त्याप्रमाणे श्रीकृष्ण व अर्जुन हे शरीरामुळेच काय ते वेगवेगळे भासत परंतु संवादामध्ये मात्र भेद म्हणून काहीच नव्हता.॥ १५९०॥

**पैं दर्पणाहूनि चोखें। दोन्ही होती सन्मुखें। तेथ येरीं येर देखे। आपणपें जैसें॥ १५९१॥**

**तैसा देवेंसीं पांडुसुतु। आपणपें देवीं देखतु। पांडवेंसीं देखे अनंतु। आपणपें पार्थीं॥ १५९२॥**

**अर्थ**—आरशापेक्षाही स्वच्छ अशा दोन वस्तू जर समोरासमोर आल्या तर त्या जशा एकमेकात आपल्याला पहातात. ॥ १५९१ ॥ त्याप्रमाणे अर्जुन देवासह देवामध्ये आपणाला पहात होता व भगवान् अर्जुनासह अर्जुनामध्ये आपणाला पहात होते. ॥ १५९२ ॥

**देवो देवभक्तालागीं। जिये विवरूनि देखे आंगीं। येरुही तियेची भागीं। दोन्ही देखे॥ १५९३॥**

**अर्थ**—देव ज्या आंगाच्या ठिकाणी स्वत:ला व भक्ताला अवकाश पहात होते, त्याचठिकाणी तोही (भक्तही) दोघांना अवकाश पहात होता. ॥ १५९३ ॥

**आणिक कांहींच नाहीं। म्हणौनि करिती काई। दोघे एकपणें पाहीं। नांदताती॥ १५९४॥**

**अर्थ**—आणखी (दोघाशिवाय) दुसरे काहीच नाही, तेव्हा करणार काय? म्हणून दोघेही एकरूप होऊन राहूं लागले पहा. ॥ १५९४ ॥

**आतां भेदु जरी मोडे। तरी प्रश्नोत्तर का घडे। ना भेदुचि तरी जोडे। संवादसुख कां॥ १५९५॥**

**अर्थ**—आता द्वैतभावच जर नाहीसा झाला तर प्रश्नोत्तरे तरी कशी होणार? भेदच जर, नाही तर संवादाचे सुख तरी कसे लाभणार!॥ १५९५ ॥

**ऐसें बोलतां दुजेपणें। संवादीं द्वैत गिळणें। तें ऐकिलें बोलणें। दोघांचें मियां॥ १५९६॥**

**अर्थ**—असे दोनपणा ठेऊन बोलता बोलताच संवादामध्ये द्वैत पूर्णपणे नाहीसे होऊन गेले व ते बोलणे मी ऐकले (असे संजय म्हणतात)॥ १५९६ ॥

**उटूनि दोन्ही आरसे। वोडविलीया सरिसे। कोण कोणा पाहातसे। कल्पावें पां॥ १५९७॥**

**अर्थ**—दोन आरसे स्वच्छ करून एकमेकासमोर ठेवले असता कोणकोणाकडे पहातो म्हणून कल्पना करावी?॥ १५९७ ॥

**का दीपासन्मुखु। ठेविलया दीपकु। कोण कोणा अर्थिकु। कोण जाणे॥ १५९८॥**

**अर्थ**—किंवा एका दिव्यासमोर दुसरा दिवा ठेवला तर कोण कोणाला प्रकाशाची याचना करतो (प्रकाश देतो) म्हणून समजावे. ॥ १५९८ ॥

**नाना अर्कापुढें अर्कु। उदयलिया आणिकु। कोण म्हणे प्रकाशकु। प्रकाश्य कवण॥ १५९९॥**

**अर्थ**—किंवा सूर्यासमोर आणखी एक सूर्य उगवला तर प्रकाश करणारा कोण व प्रकाशित होणारा कोण म्हणायचा!॥ १५९९ ॥

**हें निर्धारूं जातां फुडें। निर्धारासि ठक पडे। ते दोघे जाले येवढे। संवादें सरिसे॥ १६००॥**

**अर्थ**—ह्याचा खरा निर्णय करायला गेलो म्हणजे निर्णयच कुंठित होतो. इतके ते दोघे संवादाने एकरूप होऊन गेलेत. ॥ १६०० ॥

**जी मिळतां दोन्ही उदकें। माजीं ल्वण वारूं ठाके। कीं तयासींही निमिखें। तेंचि होय॥ १६०१॥**

**अर्थ**—महाराज, दोन प्रवाहाचे पाणी एकमेकात मिसळून जाईल म्हणून त्यांना अलग ठेवण्याकरिता मध्ये जर मीठ ठेवले, तर क्षणातच तेही तद्रूप होऊन जाते. ॥ १६०१ ॥

**तैसे श्रीकृष्ण अर्जुन दोन्ही। संवादलें तें मनीं। धरितां मजही वानी। तेचि होतसे॥ १६०२॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे श्रीकृष्ण व अर्जुन या दोघांचे झालेले संभाषण मनात आणताच माझीही तशीच तऱ्हा झाली. ॥ १६०२ ॥

**ऐसें म्हणे ना मोटकें। तंव हिरोनि सात्त्विकें। आठव नेला नेणों कें। संजयपणाचा॥ १६०३॥**

**अर्थ**—असे बोलतो न बोलतो तोच सात्त्विक भाव दाटून येऊन त्याने संजयपणाची जाणीव कोठे नेली कोण जाणे?॥ १६०३ ॥

**रोमांच जंव फरके। तंव तंव आंग सुरके। स्तंभ स्वेदांतें जिंके। एकला कंपु॥ १६०४॥**

**अर्थ**—जो जो अंगावर रोमांच उभे राहू लागले तो तो शरीराचा संकोच होऊ लागला व एकटा कंप गहिवरामुळे आलेली स्तब्धता व घाम या दोन सात्त्विक भावापेक्षा उठून दिसत होता॥ १६०४॥

**अद्वयानंदस्पर्शे। दिठी रसमय जाली असे। ते अश्रु नव्हती जैसें। द्रवत्वचि॥ १६०५॥**

**अर्थ**—अद्वयानंदाचा अनुभव आल्यामुळे डोळे डबडबून भरून आलेत, ते प्रेमाश्रु नव्हते तर जणु काय डोळ्यांना प्रेम पाझरच फुटला म्हणायचे!॥ १६०५॥

**नेणों काय न माय पोटीं। काय नेणों गुंफे कंठीं। वागर्था पडत मिठी। उससांचिया॥ १६०६॥**

**अर्थ**—पोटात काय मावत नव्हते कोणास माहीत? गळ्यात काय अडकत होते माहीत नाही. पण हुंदक्यामुळे मात्र वाणीला आडकाठी झाली होती.॥ १६०६॥

**किंबहुना सात्त्विकां आठां। चाचरु मांडतां उमेठा। संजयो जाहलासे चोहटा। संवादसुखाचा॥ १६०७॥**

**अर्थ**—किंबहुना अशा अष्टसात्त्विक भावांनी त्याची अतिशय बोबडी वळवून टाकल्यामुळे संजय, त्या संवादसुखाचा चव्हाटाच (साक्षिभूत) होऊन बसला.॥ १६०७॥

**तया सुखाची ऐसी जाती। जे आपणचि धरी शांती। मग पुढती देहस्मृती। लाधली तेणें॥ १६०८॥**

**अर्थ**—त्या आनंदाची जातच अशी आहे की ते आपोआपच शांती धारण करते (वेग कमी होतो) मग पुन्हा त्यामुळे तो देह भानावर आला.॥ १६०८॥

**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम्। योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम्॥ ७५॥**

**अर्थ**—साक्षात् योगेश्वर श्रीकृष्ण स्वतः सांगत असताना व्यासांच्या कृपेने दिव्यचक्षु लाभ प्राप्त होऊन योगरूप परमगुह्य ऐकले.॥ ७५॥

**तेव्हां बैसतेनि आनंदें। म्हणें जी जें उपनिषदें। नेणती तें व्यासप्रसादें। ऐकिलें मियां॥ १६०९॥**

**अर्थ**—तेव्हा आनंद थोडा ओसरल्यावर तो म्हणाला महाराज! जे ज्ञान उपनिषदांनाही ठाऊक नाही ते व्यासांच्या कृपेने मी ऐकले.॥ १६०९॥

**ऐकतांचि ते गोठी। ब्रह्मत्वाची पडिली मिठी। मीतूंपणेंसीं दिठी। विरोनि गेली॥ १६१०॥**

**अर्थ**—ते संभाषण ऐकता क्षणीच मी ब्रह्मस्वरूप झालो व मी तूपणाची दृष्टी होती ती पूर्णपणे नाहीशी झाली.॥ १६१०॥

**हे आवघेचि का योग। जया ठाया येती मार्ग। तयाचें वाक्य सवंग। केलें मज व्यासें॥ १६११॥**

**अर्थ**—हे सर्वच योग ज्या ठिकाणाला नेणारे मार्ग आहेत त्या भगवंताचे बोलणे व्यासांच्या कृपेमुळे मला सहजासहजी ऐकायला मिळाले.॥ १६११॥

**अहो अर्जुनाचेनि मिषें। आपणपेंचि दुजें ऐसें। नटोनि आपणया उद्देशें। बोलिले जें देव॥ १६१२॥**

**अर्थ**—महाराज, अर्जुनाच्या निमित्ताने आपणच दुसरे बनून आपल्यालाच उद्देशून देव जे बोललेत॥ १६१२॥

**तेथ कीं माझे श्रोत्र। पाटाचे जाले जी पात्र। काय वानूं स्वतंत्र। सामर्थ्य श्रीगुरूचें॥ १६१३॥**

**अर्थ**—तेथे माझे कान श्रवण करण्याच्या अधिकाराला पात्र की हो झालेत! श्री गुरुंच्या (व्यासांच्या) स्वतंत्र (त्यांचे ठिकाणी असलेल्या) सामर्थ्याचे मी काय वर्णन करूं!॥ १६१३॥

**राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम्। केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः॥ ७६॥**

**अर्थ**—राजा, या श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या अद्भुत व पुण्यकारक संवादाचे वारंवार स्मरण होऊन मला पुनःपुनः आनंद होत आहे.॥ ७६॥

**राया हें बोलतां विस्मित होये। तेणेंचि मोडावला ठाये। रत्नीं कीं रत्नकिळा ये। झांकोळित जैसी॥ १६१४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे रत्नाची कांती रत्नाला झाकून टाकते, त्याप्रमाणे 'राया' हे म्हणताच संजय विस्मित झाला व त्या विस्मयानेच तो देहभान विसरून गेला.॥ १६१४॥

**हिमवंतींचीं सरोवरें। चंद्रोदयीं होती काश्मीरें। मग सूर्यागमीं माघारें। द्रवत्व ये॥ १६१५॥**

**अर्थ**—चंद्र उगवला म्हणजे जशी हिमालयावरील सरोवरे स्फटिकशिला सारखी धनरूप होतात पण सूर्य उगवताच पुन्हा त्यांना पाझर फुटतो.॥ १६१५॥

**तैसा शरीराचिया स्मृती। तो संवादु संजय चित्तीं। धरी आणि पुढती। तेंचि होय॥ १६१६॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे देहभानावर येताच तो संवाद पुन्हा तो मनात आणी आणि पुन्हा त्याची तीच अवस्था देहभान हारपण्याची होई॥ १६१६॥

**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः। विस्मयो मे महान्राजन्हृष्यामि च पुनः पुनः॥ ७७॥**

**अर्थ**—भगवान् श्रीकृष्णाच्या अत्यंत अद्भुत रूपाची पुनः पुनः आठवण होऊन हे राजा, मला अत्यंत आश्चर्य वाटत आहे व पुनः पुनः मला आनंद होत आहे.॥ ७७॥

**मग उठोनी म्हणे नृपा। श्रीहरीचिया विश्वरूपा। देखिलया उगा कां पां। असों लाहासी॥ १६१७॥**

**अर्थ**—मग उठून म्हणाला, राजा, भगवंताचे विश्वरूप पाहूनही आपण स्तब्ध कसे काय राहू शकलात?॥ १६१७॥

**न देखणेनि जें दिसे। नाहींपणेंचि जें असे। विसरें आठवे तें कैसें। चुकवूं आतां॥ १६१८॥**

**अर्थ**—न पाहताही जे दिसते, नाहीपणानेच जे आहे, विसरू म्हटले तरी जे आठवते, ते आता कसे चुकवूं?॥ १६१८॥

**देखोनि चमत्कारु। कीजे तो नाहीं पैसारु। मजहीसकट महापुरु। नेत आहे॥ १६१९॥**

**अर्थ**—ते (विश्वरूप) पाहून भगवंताचा तो चमत्कार आहे असेही म्हणण्यास अवकाश रहात नाही. विश्वरूपाचा तो महापूर माझ्यासकट वाहून नेत आहे.॥ १६१९॥

**ऐसा श्रीकृष्णार्जुन-। संवादसंगमीं स्नान। करूनि देतसे तिळदान। अहंतेचें॥ १६२०॥**

**अर्थ**—याप्रमाणे श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादरूपी संगमात स्नान करून संजय अहंतेला तिलांजली देत होता॥ १६२०॥

**तेथ असंवरें आनंदें। अलौकिकही कांहीं स्फुंदे। श्रीकृष्ण म्हणे सद्गदें। वेळोवेळां॥ १६२१॥**

**अर्थ**—तेव्हा अनावर झालेल्या आनंदाने त्याला विलक्षण गहिवरामुळे हुंदके येऊन सद्गदित अंतःकरणाने 'श्रीकृष्ण श्रीकृष्ण' असे तो वारंवार म्हणू लागला.॥ १६२१॥

**या अवस्थांची कांहीं। कौरवातें परी नाहीं। म्हणौनि रायें तें कांहीं। कल्पावें जंव॥ १६२२॥**

**तंव जाला सुखलाभु। आपणपां करूनि स्वयंभु। बुझाविला अवष्टंभु। संजयें तेणें॥ १६२३॥**

**अर्थ**—(संजयाच्या) या अवस्थांची धृतराष्ट्राला कल्पनाही नव्हती. म्हणून तो असे का करतो याविषयी धृतराष्ट्राने जेव्हां कल्पना करावी॥ १६२२॥ तेव्हा संजयाने यथेच्छ सुखाचा लाभ घेतला आणि मग निग्रहाने आपला गहिवर सावरून घेतला.॥ १६२३॥

**तेथ कोणी एकी अवसरी। होआवी ते करूनि दुरी। रावो म्हणे संजया परी। कैशी तुझी गा॥ १६२४॥**

**अर्थ**—तेव्हा धृतराष्ट्र म्हणाला, संजया, कोणत्या वेळेला काय काय घडते हे सांगावयाचे सोडून तू हे काय चालवले आहेस?॥ १६२४॥

**तेणें तूंतें येथें व्यासें। बैसविलें कासया उद्देशें। अप्रसंगामाजीं ऐसें। बोलसी काई॥ १६२५॥**

**अर्थ**—तुला येथे व्यासांनी कोणत्या कामा करता, बसवले आहे? प्रसंग नसता मध्ये दुसरेच काय बोलतोस?॥ १६२५॥

**रानींचें राऊळा नेलिया। दाही दिशा मानी सुनिया। कां रात्री होय पाहलया। निशाचरां॥ १६२६॥**

**अर्थ**—जंगलात राहाणाराला जर राजवाड्यात नेले तर त्याला दाही दिशा शून्य वाटतात किंवा दिवस उजाडला की निशाचरांना रात्रच होते.॥ १६२६॥

**जो जेथिंचें गौरव नेणे। तयासि तें भिंगुळवाणें। म्हणौनि अप्रसंगु तेणें। म्हणावा कीं तो॥ १६२७॥**

**अर्थ**—ज्याला जेथचे महत्त्व माहीत नसते त्याला ते भयंकरच वाटते. तेव्हा त्याने त्याला अप्रसंग म्हणणे योग्यच आहे.॥ १६२७॥

**मग म्हणे सांगें प्रस्तुत। उदयलेंसे जें उत्कळित। तें कोणासि बा रे जैत। देईल शेखीं॥ १६२८॥**

**अर्थ**—मग (धृतराष्ट्र) म्हणाला. बाबारे, आता असे सांग की हे जे युद्ध उपस्थित झाले आहे त्यात शेवटी कोणाचा विजय होणार?॥ १६२८॥

**एऱ्हवीं विशेषें बहुतेक। आमुचें ऐसें मानसिक। जे दुर्योधनाचे अधिक। प्रताप सदा॥ १६२९॥**

**अर्थ**—वास्तविक पाहतां आमचा असा तर्क आहे की केव्हाही दुर्योधनाचा पराक्रम हा नेहमी जास्तच असणार.॥ १६२९॥

**आणि येरांचेनि पाडें। दळही यांचें देव्हडें। म्हणौनि जैत फुडें। आणील ना तें॥ १६३०॥**

**अर्थ**—आणि प्रतिपक्षाच्या मानाने तर यांचे सैन्यही दीडपट आहे. म्हणून ते सैन्य जयश्री ओढून आणील ना?॥ १६३०॥

**आम्हां तंव गमे ऐसें। मा तुझें जोतीष कैसें। तें नेणों संजया असे। तैसें सांग पां॥ १६३१॥**

**अर्थ**—आम्हाला तर असे वाटते. मग तुझे ज्योतिष्य कसें काय आहे, ते कळत नाही. तेव्हा, संजया! ते सांग पाहू.॥ १६३१॥

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः। तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम॥ ७८॥**

**ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे**
**मोक्षसन्यासयोगो नामाष्टादशोऽध्यायः॥ १८॥**

**अर्थ**—जिकडे योगेश्वर कृष्ण व धनुर्धारी अर्जुन असतील तेथे श्रीविजय, ऐश्वर्य आणि नीति ही निश्चितच आहेत असा माझा निश्चय आहे.॥ ७८॥

**यया बोला संजयो म्हणे। जी येरयेरांचें मी नेणें। परी आयुष्य तेथें जिणें। हें फुडें कीं गा॥ १६३२॥**

**अर्थ**—या भाषणावर संजय म्हणाला, राजा, त्यांच्या एकमेकांचे काय होईल हे मला माहीत नाही पण जेथे आयुष्य आहे तेथे जगणे निश्चितच आहे.॥ १६३२॥

**चंद्र तेथें चंद्रिका। शंभु तेथें अंबिका। संत तेथें विवेका। असणें कीं जी॥ १६३३॥**
**रावो तेथें कटक। सौजन्य तेथें सोइरीक। वन्हि तेथें दाहक। सामर्थ्य कीं॥ १६३४॥**
**दया तेथें धर्मु। धर्मु तेथें सुखागमु। सुखीं पुरुषोत्तमु। असे जैसा॥ १६३५॥**
**वसंत तेथें वनें। वन तेथ सुमनें। सुमनीं पालिंगनें। सारंगांचीं॥ १६३६॥**
**गुरु तेथ ज्ञान। ज्ञानीं आत्मदर्शन। दर्शनीं समाधान। आथी जैसें॥ १६३७॥**
**भाग्य तेथ विलासु। सुख तेथें उल्लासु। हें असो तेथ प्रकाशु। सूर्य जेथें॥ १६३८॥**
**तैसें सकळ पुरुषार्थ। जेणें स्वामी का सनाथ। तो श्रीकृष्ण रावो जेथ। तेथ लक्ष्मी॥ १६३९॥**

**अर्थ**—राजा, चंद्र तेथे चांदणे, शिव तेथे पार्वती, संत तेथे आत्मानात्मविचार असायचाच॥ १६३३॥ राजा तेथे सैन्य, सौजन्य तेथे सोयरीक, आणि विस्तव तेथे दाहकशक्तीही राहणारच.॥ १६३४॥ दया तेथे धर्म व धर्म तेथे सुखाचा लाभ व सुख तेथे ईश्वर जसा असतोच॥ १६३५॥ वसंत तेथे वन आणि वन तेथे फुले ही असणारच. आणि फुले म्हटली की तेथे भुंग्यांचा समुदाय ठरलेलाच॥ १६३६॥ सद्गुरु तेथे ज्ञान, ज्ञान तेथे आत्मदर्शन आणि आत्मदर्शनात जसे समाधान असते.॥ १६३७॥ भाग्य तेथे सुखविलास सुख तेथे उल्हास, हे असो. जेथे सूर्य तेथे प्रकाश.॥ १६३८॥ त्याप्रमाणे ज्या स्वामीमुळे सर्व पुरुषार्थ सनाथ झाले आहेत, तो श्रीकृष्ण जेथे आहे तेथे लक्ष्मी ही असायचीच.॥ १६३९॥

**आणि आपलेनि कांतेंसीं। ते जगदंबा जयापासीं। अणिमादिकी काय दासी। नव्हती तयातें॥ १६४०॥**

**अर्थ**—आणि पतीसह जगन्माता ज्याच्याजवळ आहे त्याच्या अणिमादिक सिद्धी दासी होणार नाहीत काय ?॥ १६४०॥

**कृष्ण विजयस्वरूप निजांगें। तो राहिला असे जेणें भागें। तैं जयो लागेंवेगें। तेथेंचि आहे॥ १६४१॥**

**अर्थ**—कृष्ण स्वत:च विजय स्वरूप आहे. ते ज्या पक्षाकडे असतील त्या पक्षाला विजय हा तातडीने मिळायचाच.॥ १६४१॥

**विजयी नामें अर्जुन विख्यातु। विजयस्वरूप श्रीकृष्णनाथु। श्रियेसीं विजय निश्चितु। तेथेंचि असे॥ १६४२॥**

**अर्थ**—विजय नावाने अर्जुन तर प्रसिद्धच आहे. आणि भगवान् श्रीकृष्ण स्वत:च विजयस्वरूप आहेत. तेव्हा लक्ष्मीसह विजय तेथेच आहे हे निश्चित समज.॥ १६४२॥

**तयाचिये देशींच्या झाडीं। कल्पतरूतें होडी। न जिणावें कां येवढी। मायबापे असतां॥ १६४३॥**

**अर्थ**—ज्यांना एवढ्या मोठ्या आईबापांचे पाठबळ आहे त्यांच्या देशांतील साध्या झाडांनी कल्पतरूंना पैजेने कां जिंकू नये.॥ १६४३॥

**ते पाषाणही आघवे। चिंतारत्नें कां नोहावे। तिये भूमिके कां न यावें। सुवर्णत्व॥ १६४४॥**

**अर्थ**—त्या देशातील सर्व दगड चिंतामणी कां होऊ नयेत? आणि तेथील मातीला सुवर्णत्व (सोनेपण) कां येऊ नये?॥ १६४४॥

**तयाचिया गांवींचिया। नदी अमृतें वाहाविया। नवल कायि राया। विचारीं पां॥ १६४५॥**

**अर्थ**—त्यांच्या गावातील नद्या अमृताने भरून वाहू लागल्या तर नवल काय? राजा, विचार कर.॥ १६४५॥

**तयाचे बिसाट शब्द। सुखें म्हणों येती वेद। सदेह सच्चिदानंद। कां नोहावा तो॥ १६४६॥**

**अर्थ**—त्यांचे वेडे विद्रे शब्दही खुशाल वेद म्हणावे. आणि ते स्वत:च देहासकट सच्चिदानंदस्वरूप का होणार नाहीत?॥ १६४६॥

**पैं स्वर्गापवर्ग दोन्ही। इयें पदें तया अधीनीं। श्रीकृष्ण बाप जननी। कमळा जया॥ १६४७॥**

**अर्थ**—श्रीकृष्ण ज्यांचे बाप व लक्ष्मी ज्यांची आई आहे त्यांच्या स्वाधीन स्वर्ग व मोक्ष दोन्ही पदे असतात॥ १६४७॥

**म्हणौनि जिया बाहीं उभा। तो लक्ष्मियेचा वल्लभा। तेथ सर्वसिद्धी स्वयंभा। येर मी नेणें॥ १६४८॥**

**अर्थ**—म्हणून ज्या पक्षाच्या बाजूने लक्ष्मीपति उभा आहे त्याठिकाणी सर्वसिद्धी आपोआपच ठेवल्या आहेत. (येवढेच मी जाणतो) बाकी मला काही समजत नाही.॥ १६४८॥

**आणि समुद्राचा मेघु। उपयोगें तयाहूनि चांगु। तैसा पार्थीं आजि लागु। आहे तये॥ १६४९॥**

**अर्थ**—आणि मेघ हा समुद्रापासूनच झालेला असला तरी उपयोगाच्या दृष्टीने तो त्याहून चांगला आहे. तीच गोष्ट अर्जुनाच्या बाबतीत इथे लागू आहे.॥ १६४९॥

**कनकत्वदीक्षागुरू। लोहा परिसु होय किरू। परी जगा पोसिता व्यवहारू। तेंचि जाणें॥ १६५०॥**

**अर्थ**—सुवर्णपणा येण्याची दीक्षा लोखंडाला देणारा परीस हा लोखंडाचा गुरू खरा, पण जगाचे पोषण करणारा व्यवहार करणे सोन्यालाच कळते.॥ १६५०॥

**येथ गुरुत्वा येतसे उणें। ऐसें झणें कोण्ही म्हणे। वन्हि प्रकाश दीपपणें। प्रकाशी आपला॥ १६५१॥**

**अर्थ**—याठिकाणी गुरुत्वाला कमीपणा येतो असे कदाचित् कोणी म्हणेल, पण तसे नाही. दिव्याच्यारूपाने अग्नी आपलाच प्रकाश जसा प्रकाशित करतो.॥ १६५१॥

**तैसा देवाचिया शक्ती। पार्थु देवासीचि बहुती। परी माने इये स्तुती। गौरव असे॥ १६५२॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे भगवंताच्याच सामर्थ्याने अर्जुन भगवंताहूनही अधिक सामर्थ्यसंपन्न दिसू लागला ही अर्जुनाची स्तुति भगवंताला गौरवकारक वाटते.॥ १६५२॥

**आणि पुत्रें मी सर्व गुणीं। जिणावा हे बापा शिराणी। तरी ते शार्ङ्गपाणी। फळा आली॥ १६५३॥**

**अर्थ**—आणि मुलाने आपल्या सर्व गुणांनी जिंकावे हीच बापाची इच्छा असते. ती भगवंताची इच्छा फलद्रूप झाली. ॥ १६५३ ॥

**किंबहुना ऐसा नृपा। पार्थु जालासे कृष्णकृपा। तो जयाकडे साक्षेपा। रीति आहे॥ १६५४॥**

**तोचि गा विजयासि ठावो। येथ तुज कोण संदेहो। तेथ न ये तरी वावो। विजयोचि होय॥ १६५५॥**

**अर्थ**—किंबहुना, राजा, अर्जुन कृष्णकृपेस पात्र झाला आहे व तो ज्या पक्षाकडे जाणून सवरून राहिला आहे. ॥ १६५४॥ त्याला विजयश्री माळ घालील यात तुला संदेह का वाटावा? त्या पक्षाला जर विजय मिळणार नसेल तर विजयच अर्थहीन ठरेल!॥ १६५५॥

**म्हणौनि जेथ श्री तेथे श्रीमंतु। जेथ तो पांडूचा सुतु। तेथ विजय समस्तु। अभ्युदयो तेथ॥ १६५६॥**

**अर्थ**—म्हणून जेथे लक्ष्मी तेथे लक्ष्मीपती, आणि जेथे तो पांडूचा मुलगा अर्जुन तेथेच संपूर्ण विजय व सर्व गोष्टींची भरभराट असणार. ॥ १६५६ ॥

**जरी व्यासाचेनि साचें। धिरे मन तुमचें। तरी या बोलाचें। ध्रुवचि माना॥ १६५७॥**

**अर्थ**—व्यासांच्या खरेपणावर जर तुमचा विश्वास असेल तर माझे हे बोलणे अढळ आहे असे समजा. ॥ १६५७॥

**जेथ तो श्रीवल्लभु। जेथ भक्तकदंबु। तेथ सुख आणि लाभु। मंगळाचा॥ १६५८॥**

**अर्थ**—ज्याठिकाणी लक्ष्मीपती त्याठिकाणीच भक्तांचे समुदाय तेथे सुखाची आणि कल्याणाची प्राप्ती ठरलेलीच. ॥ १६५८॥

**या बोला आन होये। तरी व्यासाचा अंकु न वाहें। ऐसें गाजोनि बाहे। उभिली तेणें॥ १६५९॥**

**अर्थ**—माझे हे बोलणे जर अन्यथा ठरले तर व्यासाचा शिष्य मी म्हणवणार नाही. असे मोठ्याने बोलून त्याने हात वर केला. ॥ १६५९॥

**तो भारताचा आवांका। आणूनि श्लोका येका। संजयें कुरुनायका। दिधला हातीं॥ १६६०॥**

**अर्थ**—संपूर्ण महाभारताचे सार अशारीतीने एका श्लोकात आणून संजयाने ते धृतराष्ट्राच्या हातात दिले॥ १६६०॥

**जैसा नेणों केवढा वन्ही। परी गुणाग्रीं ठेऊनी। आणिजे सूर्याची हानी। निस्तरावया॥ १६६१॥**

**अर्थ**—अग्नी हा केवढा मोठा (व्यापक) आहे हे काही आपल्याला कळत नाही. पण तो वातीच्या टोकावर ठेऊन (दिव्याच्या रूपाने) सूर्यप्रकाशाची उणीव भरून काढण्याकरता ज्याप्रमाणे त्याला (अग्नीला) आणावा॥ १६६१॥

**तैसें शब्दब्रह्म अनंत। जाले सवालक्ष भारत। भारताचें शतें सात। सर्वस्व गीता॥ १६६२॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे वेद हे अनंत व त्यापासून सवा लक्ष भारत झाले व भारताचे सार असलेली गीता सातशे श्लोकात झाली. ॥ १६६२॥

**तयाही सातां शतांचा। इत्यर्थु हा श्लोक शेषींचा। व्यासशिष्य संजयाचा। पूर्णोद्गारु जो॥ १६६३॥**

**अर्थ**—व्यासांचा शिष्य जो संजय त्याचा पूर्णोद्गार असलेला हा गीतेचा शेवटला जो श्लोक तो या सातशेही श्लोकांचे तात्पर्य आहे. ॥ १६६३॥

**येणें येकेंचि श्लोकें। राहे तेणें असकें। विद्याजाताचें निकें। जिंतिलें होय॥ १६६४॥**

**अर्थ**—या एकाच श्लोकावर जो पूर्णपणे विसंबून राहील त्याने संपूर्ण अविद्या प्रपंच जिंकलाच म्हणून समजावे. ॥ १६६४॥

**ऐसे श्लोक शतें सात। गीतेचीं पदें आंगें वाहत। पद्यें म्हणो कीं परमामृत। गीताकाशींचें॥ १६६५॥**

**अर्थ**—असे हे सातशे श्लोक म्हणजे गीतामूर्तीची चालती पावलेच म्हणावी. अथवा ही पावले म्हणावी की गीतारूपी आकाशातील परम अमृतच समजावे. ॥ १६६५॥

**कीं आत्मराजाचिये सभे। गीते वोडवले हे खांबे। मज श्लोक प्रतिभे। ऐसे येत॥ १६६६ ॥**
**कीं गीता हे सप्तशती। मंत्रप्रतिपाद्य भगवती। मोहमहिषा मुक्ती। आनंदली असे॥ १६६७॥**
**म्हणौनि मनें कायें वाचा। जो सेवक होईल इयेचा। तो स्वानंदसाम्राज्याचा। चक्रवर्ती करी॥ १६६८॥**

**अर्थ**—किंवा आत्मराजाच्या गीतारूप सभेला (सभामंडपाला) हे श्लोकरूपी खांबच लावले आहेत असे मला वाटते॥ १६६६॥ किंवा गीता ही सप्तशतीच्या मंत्रांनी (सातशे श्लोकरूपी) प्रतिपादन केलेली भगवतीच असून मोहरूपी महिषाला मुक्ती देऊन ती आनंदली आहे.॥ १६६७॥ म्हणून मनाने, देहाने व वाणीने जो हिचा (गीतादेवीचा) सेवक होईल त्याला ती आत्मानंदरूपी साम्राज्याचा सार्वभौम राजाच करील.॥ १६६८॥

**कीं अविद्यातिमिररोखें। श्लोक सूर्यातें पैजा जिंके। ऐसे प्रकाशिले गीतामिखें। रायें श्रीकृष्णें॥ १६६९॥**

**अर्थ**—किंवा अविद्यारूपी अंधःकारावर चाल करून जे सूर्यालाही प्रतिज्ञेवर जिंकतात असे हे श्लोक गीतेच्या रूपाने भगवान् श्रीकृष्णाने प्रगट केले आहेत.॥ १६६९॥

**कीं श्लोकाक्षरद्राक्षलता। मांडव जाली आहे गीता। संसारपथश्रांता। विसंवावया॥ १६७०॥**

**अर्थ**—किंवा संसाराचा मार्ग चालून चालून थकलेल्यांना विसावा घेण्यासाठी श्लोकांच्या अक्षररूपी द्राक्षांच्या वेलीचा गीता ही मांडवच झाली आहे.॥ १६७०॥

**कीं सभाग्यसंतीं भ्रमरीं। सेविली ते श्लोक कल्हारीं। श्रीकृष्णाख्यसरोवरीं। सासन्नली हे॥ १६७१॥**

**अर्थ**—किंवा भाग्यवान् संतरूपी भ्रमरांनी सेवन केली अशा ह्या श्लोकरूपी कमळांनी श्रीकृष्ण नावाचे हे गीतारूपी सरोवर गजबजून गेले आहे.॥ १६७१॥

**कीं श्लोक नव्हती आन। गमे गीतेचें महिमान। वाखाणिते बंदिजन। उदंड जैसे॥ १६७२॥**

**अर्थ**—किंवा हे श्लोक दुसरे कोणी नसून गीतेचा महिमा वर्णन करणारे जणु काय पुष्कळसे हे भाटच वाटतात.॥ १६७२॥

**कीं श्लोकाचिया आवारा। सात शतें करूनि सुंदरा। सर्वागम गीतापुरा। वसों आले॥ १६७३॥**

**अर्थ**—किंवा सातशे श्लोकांचा सुंदर तट घालून सर्वशास्त्रे या गीतारूपी नगरीत रहावयास आली आहेत.॥ १६७३॥

**कीं निजकांता आत्मया। आवडी गीता मिळावया। श्लोक नव्हती बाह्या-। पसरु का जो॥ १६७४॥**

**अर्थ**—किंवा आपला पती जो आत्मा त्याला प्रीतीने आलिंगन देण्या करता गीतेने पसरलेले हे श्लोक म्हणजे बाहूच नव्हेत काय!॥ १६७४॥

**कीं गीताकमळींचे भृंग। कीं हे गीतासागरतरंग। कीं हरीचे तुरंग। गीतारथींचे॥ १६७५॥**

**अर्थ**—किंवा हे (श्लोक) गीतारूप कमळातील भृंगच म्हणाना! किंवा गीतारूप समुद्रावर उठलेले हे तरंगच म्हणता येतील किंवा श्रीहरीच्या गीतारूप रथाचे हे घोडेच म्हणावेत!॥ १६७५॥

**कीं श्लोक सर्वतीर्थसंघातु। आला श्रीगीतेगंगेआंतु। जे अर्जुन सिंहस्थु। जाला म्हणौनि॥ १६७६॥**

**अर्थ**—किंवा अर्जुन हा सिंहस्थ पर्वणी झाला म्हणून हा श्लोकरूपी सर्व तीर्थांचा समुदाय श्रीगीतारूपी गंगेत येऊन मिळाला.॥ १६७६॥

**कीं नोहे हे श्लोकश्रेणी। अचिंत्यचित्तचिंतामणी। कीं निर्विकल्पां लावणी। कल्पतरूंची॥ १६७७॥**

**अर्थ**—किंवा ही श्लोकांची पंक्ती नसून निर्वासन चित्त झालेल्यांना चिंतामणीच आहेत किंवा निर्विकल्प ब्रह्माचे फळ देणाऱ्या कल्पवृक्षांची ही रांगच लावली आहे.॥ १६७७॥

**ऐसिया शतें सात श्लोकां। परि आगळा येकयेका। आतां कोण वेगळिका। वानावा पां॥ १६७८॥**

**अर्थ**—अशा प्रकारे हे सातशे श्लोक आहेत. पण एकापेक्षा एक वैशिष्ट्यपूर्ण आहेत. आता कोण कोणाची वेगळी निवड करून वाखाणणी करावी?॥ १६७८॥

**तान्ही आणि पारठी। इया कामधेनूतें दिठी। सूनि जैसिया गोठी। कीजतीना॥ १६७९॥**

**अर्थ**—कामधेनूच्या बाबतीत बोलताना ती तान्ही (नुकतीच व्यालेली) की पारठी आहे अशा तऱ्हेच्या गोष्टी ज्याप्रमाणे करता येत नाही. ॥ १६७९ ॥

**दीपा आगिलु मागिलु। सूर्यु धाकुटा वडीलु। अमृतसिंधु खोलु। उथळु कायसा॥ १६८०॥**
**तैसे पहिले सरते। श्लोक न म्हणावे गीते। जुनीं नवीं पारिजातें। आहाती काई॥ १६८१॥**

**अर्थ**—दिवा हा मागचा कसला आणि पुढचा कसला? सूर्य हा लहान कसला आणि मोठा कसला? अमृताचा सागर खोल कसला आणि उथळ कसला?॥ १६८० ॥ त्याप्रमाणे गीतेच्या श्लोकात हे पहिले (उत्तम) व हे शेवटचे (निकृष्ट) असे प्रकार आहेत असे म्हणू नये. (स्वर्गातील) पारिजातकांच्या फुलात ताजी व शिळी असा भेद आहे काय?॥ १६८१ ॥

**आणि श्लोका पाडु नाहीं। हें कीर समर्थु काई। येथ वाच्य वाचकही। भागु न धरी॥ १६८२॥**

**अर्थ**—आणि श्लोकाश्लोकांत तरतमभाव नाही ह्याचे आणखी काय समर्थन करावयाचे? या गीतेत वाच्य व वाचक असाही भेद नाही. ॥ १६८२ ॥

**जे इये शास्त्रीं येकु। श्रीकृष्णचि वाच्य वाचकु। हें प्रसिद्ध जाणे लोकु। भलताही॥ १६८३॥**

**अर्थ**—कारण की या गीताशास्त्रात श्रीकृष्णच हेच एक काय ते वाच्य व वाचक आहेत ही गोष्ट प्रसिद्ध असून कोणालाही माहीत आहे. ॥ १६८३ ॥

**येथें अर्थे तेंचि पाठें। जोडे येवढेनि धटें। वाच्यवाचक येकवटें। साधितें शास्त्र॥ १६८४॥**

**अर्थ**—मोठ्या कष्टाने प्राप्त होणारे जे साध्य ते येथे अर्थाने जसे प्राप्त होणार तसेच ते पाठाने निश्चये करून प्राप्त होणार. वाच्य व वाचक यांचे ऐक्य हे गीताशास्त्र साधते. ॥ १६८४ ॥

**गूढार्थदीपिका—श्रीकृष्णचि वाच्य वाचकु। वाच्यवाचक येकवटे। साधितें शास्त्र।**

सच्चिदानंदरूप निर्गुण परब्रह्म अवतारकालीही आपल्या स्वरूप स्थितीत यत्किंचितही न्यूनता न आणता सगुण साकार होते. भगवान् श्रीकृष्ण सगुण साकार दिसत असले तरी त्यांची अखंड निर्गुण निराकारता अवतारकालीही कायम असते. 'यस्य निःश्वसिता वेदाः' म्हणून ज्या परब्रह्माचा उल्लेख करण्यात येतो तेच परब्रह्म सगुण साकार श्रीकृष्ण होऊन अवतरले व त्याने आपल्या मुखाने अर्जुनाला वेदातील आत्मरहस्य सांगितले. सच्चिदानंद ब्रह्माचा गीतेच्यारूपाने अशा रीतीने आविष्कार झाला असल्यामुळे भगवान श्रीकृष्ण ज्याप्रमाणे सच्चिदानंदस्वरूप त्याचप्रमाणे त्यानी सांगितलेली गीताही सच्चिदानंदस्वरूप. माउलीने ज्ञानीभक्तांचे वर्णन करतांना अशा ज्ञानी भक्तांच्या तोंडून जे जे शब्द बाहेर पडतील ते ते सर्व वेदवाणीच राहील (तयांचे ते बिसाट शब्द। सुखे म्हणो येती वेद। अ० १८ ओ० १६४६) असे म्हटले आहे. भगवान् श्रीकृष्ण तर प्रत्यक्ष परब्रह्माचेच अवतार. मग त्यांच्या तोंडातून येणारे शब्द परब्रह्मस्वरूप का होणार नाहीत?

याठिकाणी भगवान् श्रीकृष्ण वाचक म्हणजे सांगणारे व भगवद्गीता ही वाच्य म्हणजे सांगितली जाणारी आहे. भगवंताचा सर्व व्यवहारच जसा सच्चिदानंदरूप तशाच प्रमाणे त्यांच्या मुखातून निघालेली गीताही सच्चिदानंदस्वरूप.

गीतेत जीव व शिवाचे ऐक्य प्रतिपादन करणारे जे आत्मज्ञान भगवंतानी सांगितले आहे ते गीतेचा अर्थ समजून घेणाऱ्याला जसे प्राप्त होते तसेच गीतेचा अर्थ न समजता केवळ पठन करणाऱ्या श्रद्धाळु भक्तालाही प्राप्त होते. भगवान् श्रीकृष्णाच्या मुखातून निघालेल्या गीतेकडे या श्रद्धाळु पठन करणाऱ्या भक्तांचा दृष्टिकोन भगवंताच्या प्रेमाचा राहत असतो व गीतेचे पठन करीत असताना भगवान् श्रीकृष्ण त्यांच्या प्रेमाचे आलंबन राहत असल्यामुळे भगवंताविषयी प्रेम उत्तरोत्तर वाढण्यात त्याची परिणती होते. साहजिकच कायावाचामनाने एक भगवानच त्यांचा विषय होत असल्यामुळे श्रद्धाळु वाचक भक्त व गीतेतील प्रतिपाद्य (वाच्य) भगवान् यांचे ऐक्य अनायासेच गीतेच्या पठनाने साधते.

**म्हणौनि मज कांहीं। समर्थनीं आतां विषय नाहीं। गीता जाणा हे वाङ्मयी। श्रीमूर्ति प्रभूची॥ १६८५॥**

**अर्थ**—म्हणून मला आता प्रतिपादन करण्यासारखा विषय राहिला नाही. गीता ही भगवंताची वाङ्मयीन मूर्तीच आहे, असे समजा.॥ १६८५॥

**शास्त्र वाच्यें अर्थें फळे। मग आपण मावळे। तैसें नव्हे हें सगळें। परब्रह्मचि॥ १६८६॥**

**अर्थ**—इतर शास्त्र अर्थाचे ज्ञान करून देऊन (प्रयोजन संपल्यामुळे) स्वत: नाहीसे होते. पण गीताशास्त्र हे तसे नाही. हे सगळे परब्रह्मस्वरूपच आहे.॥ १६८६॥

**कैसा विश्वाचिया कृपा। करूनि महानंद सोपा। अर्जुनव्याजें रूपा। आणिला देवें॥ १६८७॥**

**अर्थ**—सर्व जगावर कृपा करून अर्जुनाच्यारूपाने भगवंतानी (दुर्लभ असा) ब्रह्मानंद सोपा करून कसा प्रगट केला आहे पहा!॥ १६८७॥

**चकोराचेनि निमित्तें। तिन्ही भुवनें संतप्तें। निवविलीं कळावंतें। चंद्रें जेवीं॥ १६८८॥**
**कां गौतमाचेनि मिषें। कळिकाळज्वरितोद्देशें। पाणिढाळु गिरीशें। गंगेचा केला॥ १६८९॥**
**तैसें गीतेचें हें दुभतें। वत्स करूनि पार्थातें। दुभीनली जगापुरतें। श्रीकृष्णगाय॥ १६९०॥**

**अर्थ**—चकोर पक्षाच्या निमित्ताने ज्याप्रमाणे पूर्णकलायुक्त चंद्र आपल्या शीतल प्रकाशाने तापलेल्या तिन्ही लोकांना शांत करतो.॥ १६८८॥ किंवा गौतमऋषीच्या निमित्ताने कळिकाळरूपी ज्वराने पछाडलेल्या जीवांची व्याधी नाहीशी करण्याकरता भगवान् शंकरानी गंगेला (गोदावरीला) या मृत्युलोकांत पाठवून दिले.॥ १६८९॥ त्याप्रमाणे पार्थरूपी वासराचे निमित्त करून श्रीकृष्णरूप गायीने हे गीतारूप दूध जगाला पुरेल एवढे दिले.॥ १६९०॥

**येथें जीवें जरी नाहाल। तरी हेंचि कीर होआल। नातरी पाठमिषें तिंबाल। जीभचि जरी॥ १६९१॥**
**तरी लोह एके अंशें। झगटलिया परिसें। येरीकडे आपैसें। सुवर्ण होय॥ १६९२॥**
**तैसी पाठाची ते वाटी। श्लोकपाद लावा ना जंव वोठीं। तंव ब्रह्मतेची पुष्टी। येईल आंगा॥ १६९३॥**

**अर्थ**—या गीतेच्या अर्थाला अंत:करणापर्यंत पोहोचवाल (अर्थ विचाराने ग्रहण करून) किंवा पठनाच्यारूपाने जरी आपली जीभ ओली कराल तर ते स्वरूपच व्हाल॥ १६९१॥ तरी, लोखंडाचा एक भाग जरी परिसाला लागला तरी इतर भागाचे जसे आपोआप सोने होते.॥ १६९२॥ त्याप्रमाणे श्लोक, पद इत्यादिकांच्या पाठाची वाटी तोंडाला लावताच सर्व अंगाला ब्रह्मस्वरूपाची पुष्टी येईल.॥ १६९३॥

**ना येणेंसीं मुख वांकडें। करूनि ठाकाल कानवडें। तरी कानींही घेतां पडे। तेचि लेख॥ १६९४॥**

**अर्थ**—अथवा गीतेकडे तोंड वाकडे करून एका कुशीवर पडाल तरी कानाने गीता ऐकली असता तोच हिशेब होईल. (तेच फळ मिळेल.)॥ ९४॥

**जे हे श्रवणें पाठें अर्थें। गीता नेदी मोक्षाआरौतें। जैसा समर्थ दाता कोणातें। नास्ति न म्हणे॥ १६९५॥**

**अर्थ**—कारण, संपत्तीचे सामर्थ्य असलेला दाता जसा कोणालाही 'नाही' असे म्हणत नाही त्याप्रमाणे ही गीता, केवळ श्रवण करा, की नुसता पाठ करा की अर्थासह वाचा; एका मोक्षाशिवाय दुसरे काहीही द्यावयाची नाही.॥ १६९५॥

**म्हणौनि जाणतया सवा। गीताचि येकी सेवा। काय कराल आघवां। शास्त्रीं येरीं॥ १६९६॥**

**अर्थ**—म्हणून ज्ञानी पुरुषांच्या संगतीने एका गीतेचीच सेवा करावी. इतर शास्त्रांना घेऊन (मोक्षाच्या दृष्टीने) काय करणार?॥ १६९६॥

**आणि कृष्णार्जुनीं मोकळी। गोठी चावळिली जे निराळीं। ते श्रीव्यासें केली करतळीं। घेवों ये ऐसी॥ १६९७॥**

**अर्थ**—आणि श्रीकृष्ण व अर्जुन यांनी मोकळेपणाने अनाकलनीय ज्या गोष्टी केल्यात त्यांना तळहातावर घेता येईल असे श्रीव्यासांनी करून ठेवले.॥ १६९७॥

**बाळकातें वोरसें। माय जैं जेवऊं बैसे। तैं तया ठाकती तैसे। घांस करी॥ १६९८॥**

**अर्थ**—आई ममतेने जेव्हा मुलाला जेऊं घालायला बसते तेव्हा त्याला सहज गिळतां येईल असे घास करून देते. ॥ १६९८ ॥

**कां अफाटा समीरणा। आपैतेपण शाहाणा। केलें जैसें विंजणा। निर्मूनियां॥ १६९९ ॥**

**अर्थ**—किंवा जिकडे तिकडे पसरला असलेल्या वाऱ्याला बेतापुरताच घेण्यासाठी सूज्ञ लोकांनी जसा पंखा तयार केला. ॥ १६९९ ॥

**तैसें शब्दे जें न लभे। तें घडूनियां अनुष्टुभें। स्त्रीशूद्रादि प्रतिभे। सामाविलें॥ १७०० ॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे शब्दांनीही जे साध्य होणार नाही ते अनुष्टुप छंदात गुंफून स्त्री शूद्रादिकांच्या बुद्धीलाही ग्रहण करता येईल असे केले. ॥ १७०० ॥

**स्वातीचेनि पाणियें। न होती जरी मोतियें। तरी अंगीं सुंदराचिये। का शोभतीं तियें॥ १७०१ ॥**

**अर्थ**—स्वाती नक्षत्राच्या पाण्याचे (थेंब) जर मोती झाले नसते तर सुंदर स्त्रियांच्या आंगावर कोठून शोभा आली असती. ॥ १७०१ ॥

**नादु वाद्या न येतां। तरी कां गोचरु होता। फुलें न होतां घेपता। आमोदु केवीं॥ १७०२ ॥**

**अर्थ**—नाद जर वाद्याच्या रूपाला आला नसता तर तो कानाला कसा ऐकू आला असता? सुगंधाने पुष्परूप घेतले नसते तर त्याचे (सुगंधाचे) ग्रहण कसे झाले असते?॥ १७०२ ॥

**गोडी न होतीं पक्वान्नें। तरी कां फावती रसने। दर्पणावीण नयनें। नयनु का दिसे॥ १७०३ ॥**

**अर्थ**—गोडी जर पक्वान्ने झाली नसती तर ती जिभेला कशी घेता आली असती? आरशाशिवाय डोळ्यामुळे डोळा दिसेल काय?॥ १७०३ ॥

**द्रष्टा श्रीगुरुमूर्ती। न रिगता दृश्यपंथीं। तरी काह्या उपास्ती। आकळता तो॥ १७०४॥**

**अर्थ**—दृष्ट्रुस्वरूप असलेले श्रीगुरु या दृश्याच्या मार्गात पडले नसते (निर्गुणस्वरूप सगुण झाले नसते) तर ते भक्तीने कसे वश झाले असते?॥ १७०४ ॥

**तैसें वस्तु जें असंख्यात। तया संख्या शतें सात। न होती तरी कोणा येथ। फावों शकतें॥ १७०५ ॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे अमर्याद असलेली अशी परब्रह्म वस्तू जर सातशे श्लोकांच्या मर्यादेत आली नसती तर या जगात ती कोणाला प्राप्त होऊ शकली असती?॥ १७०५ ॥

**गूढार्थदीपिका—द्रष्टा श्रीगुरुमूर्ति। न दिसता दृश्यपथीं। तरीं का ह्या उपास्ती। आकळता तो॥**

परमानंदरूप असलेली ब्रह्मवस्तूच आपले परमसुख भोगण्याकरता कसे उपाधिरहित सगुण साकाररूप धारण करते हे या ओवीत माउली सांगत आहे.

आपला सुवास घेण्याकरता फूलच ज्याप्रमाणे नासिकेंद्रिय व्हावे, त्याप्रमाणे आपले सुख भोगण्याकरता सच्चिदानंद ब्रह्मच निवृत्तिनाथ झालेत असे माउलीने अमृतानुभवात म्हटले आहे. "तैसे निवृत्तिपणासी कारण। हाचि आपणतया आपण। घेयावया फूलचि झाले घ्राण। दृति" (अमृ० प्र० २०७५) आपले निरपेक्ष अद्वैतत्व कायम ठेऊनच निवृत्तिनाथ दोनपणाला अर्थातच दृश्यपणाला (नामरूपात्मक सगुणपणाला) आलेत. चेतनरूप ब्रह्मच श्रीगुरुच्या रूपाने दृश्यरूप होते हा भाव.

**मेघ सिंधूचें पाणी वाहे। तरी जग तयातेंचि पाहे। कां उमप तें नोहे। ठाकतें कोण्हा॥ १७०६ ॥**

**अर्थ**—मेघ हा जरी समुद्राचे पाणी वाहतो तरी जग मात्र (समुद्राकडे न पाहता) त्याच्याकडेच पाहते. कारण ते अमर्याद असल्यामुळे कोणाला प्राप्त करून घेता येत नाही. ॥ १७०६ ॥

**आणि वाचा जें न पवे। तें हे श्लोक न होते बरवे। तरी कानें मुखें फावे। ऐसें कां होतें॥ १७०७॥**

**अर्थ**—आणि वाणीला जे प्राप्त होत नाही (परब्रह्म) ते (परब्रह्म) हे जर सातशे सुंदर श्लोक झाले नसते तर कानाने व तोंडाने उपभोगता येईल असे झाले असते काय?॥ १७०७ ॥

**म्हणौनि श्रीव्यासाचा हा थोरु। विश्वासि जाला उपकारु। जे श्रीकृष्णउक्ती आकारु। ग्रंथाचा केला॥ १७०८॥**

**अर्थ**—म्हणून श्रीव्यासांचा जगावर मोठा उपकार झाला की त्यांनी भगवंताच्या बोलण्याला ग्रंथाचे रूप दिले. ॥ १७०८ ॥

**आणि तोचि हा मी आतां। श्रीव्यासाचीं पदें पाहतां पाहतां। आणिला श्रवणपथा। मऱ्हाठिया॥ १७०९॥**

**अर्थ**—श्रीव्यासांच्या पदांचा अर्थ पहात पहात मी आता तोच ग्रंथ मराठीतून ऐकण्याच्या रूपाला आणला. ॥ १७०९ ॥

**व्यासादिकांचे उन्मेख। राहाटती जेथ साशंक। तेथ मीही रंक येक। वाचाळी करीं॥ १७१०॥**

**अर्थ**—व्यासादिकांच्या ज्ञानाला, वावरताना जेथे शंका राहतात, त्या गीतेच्या बाबतीत मी एक गरीब (दरिद्री) बडबड करीत आहे!॥ १७१० ॥

**परी गीता ईश्वरु भोळा। ले व्यासोक्तिकुसुममाळा। तरी माझिया दुर्वादळा। ना न म्हणे कीं॥ १७११॥**

**अर्थ**—परंतु गीता हा भोळा देव आहे. व्यासांच्या उक्तिरूपी फुलांच्या माळा त्याने धारण केल्या तरी माझ्या (ओवीरूपी) दुर्वादळांना निश्चितच तो 'ना' म्हणार नाही. ॥ १७११ ॥

**आणि क्षीरसिंधूचिया तटा। पाणिया येती गजघटा। तेथ काय मुरकुटा। वारिजत तसे॥ १७१२॥**

**अर्थ**—आणि क्षीरसमुद्राच्या किनाऱ्यावर पाणी पिण्यास हत्तींचे कळप येतात, तेथे डासांना क्षीरसमुद्र येऊं नका म्हणेल काय?॥ १७१२ ॥

**पांख फुटे पाखिरूं। नुडे तरी नभींच थिरू। गगन आक्रमी सत्वरू। तो गरुडही तेथ॥ १७१३॥**

**अर्थ**—पंख फुटलेले पाखरू फार उंच उडू शकत नसले तरी आकाशातच स्थिर राहते (उडते) आणि वेगाने आकाशाचे आक्रमण करणारा गरूडही तेथेच उडत असतो. ॥ १७१३ ॥

**राजहंसाचें चालणें। भूतळीं जालिया शाहाणें। आणिकें काय कोणें। चालावेंचि ना॥ १७१४॥**

**अर्थ**—राजहंसाचे चालणे जगात उत्तम गणले गेले म्हणून काय पृथ्वीवर इतर कोणी चालूच नये॥ १७१४॥

**जी आपुलेनि अवकाशें। अगाध जळ घेपे कलशें। चुळीं चूळपणा ऐसें। भरूनि न निघे॥ १७१५॥**

**अर्थ**—अहो! आपल्या (आकारमान) पोकळीप्रमाणे घागरीला पुष्कळ पाणी घेता येते तसेच चुळीत चुळभर पाणी येत नाही काय?॥ १७१५ ॥

**दिवटीच्या आंगीं थोरी। तरी ते बहु तेज धरी। वाती आपुलिया परी। आणीच कीं ना॥ १७१६॥**

**अर्थ**—दिवटीचा आकार मोठा असतो म्हणून तिचा उजेड मोठा पडतो पण वात आपल्या परीने उजेड देतेच की नाही!॥ १७१६ ॥

**जी समुद्राचेनि पैसें। समुद्रीं आकाश आभासे। थिलुरीं थिल्लराऐसें। बिंबेचि पैं॥ १७१७॥**

**अर्थ**—अहो, समुद्रात समुद्राच्या विस्ताराच्या मानाने आकाशाचे प्रतिबिंब पडते तर डबक्यात डबक्याएवढे प्रतिबिंब पडतेच की॥ १७१७॥

**तेवीं व्यासादिक महामती। वावरों येती इये ग्रंथीं। मा आम्ही ठाकों हे युक्ती। न मिळे कीर॥ १७१८॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे व्यासादिकांसारखे अलौकिक प्रतिभासंपन्न लोक या ग्रंथाचे विवरण करतात. मग आम्ही आपल्या अल्पबुद्धिप्रमाणे या ग्रंथाचे विवरण करावे! हे युक्ति संगत होणार नाही काय?॥ १७१८ ॥

**जिये सागरीं जळचरें। संचरती मंदराकारें। तेथ देखों शफरें येरें। पोहों लाहती॥ १७१९॥**

**अर्थ**—ज्या समुद्रामध्ये मंदार पर्वता येवढे मोठमोठे जलप्राणी संचार करतात ते पाहून देखील त्याच समुद्रात लहान लहान मासे पोहत नाहीत काय?॥ १७१९ ॥

**अरुण आंगाजवळिके। म्हणोनि सूर्यातें देखे। मा भूतळींची न देखे। मुंगी काई॥ १७२०॥**

**अर्थ**—अरुण हा सूर्याच्या जवळ असतो म्हणून सूर्याला पाहतो, पण मग त्या सूर्याला पृथ्वीवरची मुंगी पहात नाही काय?॥ १७२० ॥

**यालागीं आम्हां प्राकृतां। देशिकारें बंधें गीता। म्हणणें हें अनुचिता। कारण नोहे॥ १७२१॥**

**अर्थ**—म्हणून आमच्या सारख्या सामान्य लोकांना देशी भाषेत (मराठीत) गीता आणता येते या म्हणण्यात अनौचित्याला जागा नाही. ॥ १७२१ ॥

**आणि बापु पुढां जाये। ते घेत पाउलाची सोये। बाळ ये तरी न लाहे। पावों कायी॥ १७२२॥**

**अर्थ**—आणि बाप पुढे गेलेला असला आणि त्याच्याच पाउलाच्या वाटेने मूल आले तर ते त्याच ठिकाणावर पोहाचणार नाही काय? ॥ १७२२ ॥

**तैसा व्यासांचा मागोवा घेतु। भाष्यकारांतें वाट पुसतु। अयोग्यही मी न पवतु। कें जाईन॥ १७२३॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे व्यासांचा माग काढीत काढीत व भाष्यकारांना वाट पुसत पुसत मी अयोग्य असलो तरी तेथे (गीतार्थाच्या ठिकाणी) न पोहोचता कोठे जाईन? ॥ १७२३ ॥

**आणि पृथ्वी जयाचिया क्षमा। नुबगे स्थावरजंगमा। जयाचेनि अमृतें चंद्रमा। निववी जग॥ १७२४॥**
**जयाचें आंगिक अंशिकें। तेज लाहोनि अर्के। आंधाराचें सावाइकें। लोटिजत आहे॥ १७२५॥**
**समुद्रा जयाचें तोय। तोया जयाचें माधुर्य। माधुर्या सौंदर्य। जयाचेनि॥ १७२६॥**
**पवना जयाचें बळ। आकाश जेणें पघळ। ज्ञान जेणें उज्वळ। चक्रवर्ती॥ १७२७॥**
**वेद जेणें सुभाष। सुख जेणें सोल्लास। हें असो रूपस। विश्व जेणें॥ १७२८॥**
**तो सर्वोपकारी समर्थु। सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथु। राहाटत असे मजहीआंतु। रिघोनियां॥ १७२९॥**

**अर्थ**—आणि त्याच्या (श्रीगुरुच्या) क्षमेच्या वृत्तीमुळे पृथ्वी स्थावर व जंगमाच्या (विश्वातील घडामोडींचा त्रास) त्रासाला कंटाळत नाही व ज्याच्या पासून प्राप्त होणाऱ्या अमृतामुळे चंद्र जगाला शांत करतो॥ १७२४॥ ज्याच्या (श्रीगुरुच्या) अंगाच्या तेजामुळे सूर्याला तेज प्राप्त होऊन तो अंधाराचे संकट दूर सारतो. ॥ १७२५॥ ज्याच्यामुळे (श्रीगुरुच्या सत्तेमुळे) समुद्राला पाणी आहे, पाण्याला ज्याच्यामुळे माधुर्य आहे, व माधुर्याला सौंदर्य ज्याच्यामुळे आहे. ॥ १७२६ ॥ वाऱ्यातील सामर्थ्य ज्याचे आहे, आकाशाला ज्यामुळे पैस आला आहे आणि ज्याच्यामुळे ज्ञान हे प्रकाशमान व सार्वभौम झाले आहे ॥ १७२७ ॥ वेद ज्याच्या योगाने बोलका झाला, सुख ज्याच्यामुळे उल्हासयुक्त आहे. हे असो, सारे विश्व ज्याच्या योगाने रूपवान् झाले आहे. ॥ १७२८ ॥ असा तो सर्वांवर उपकार करणारा समर्थ सद्‌गुरु श्रीनिवृत्तिनाथ माझ्यांत प्रवेश करून सर्व व्यवहार करीत आहे. ॥ १७२९ ॥

**आतां आयती गीता जगीं। मी सांगें मऱ्हाठिया भंगीं। येथ कें विस्मयालागीं। ठावो आहे॥ १७३०॥**

**अर्थ**—ज्या गीतेचे ज्ञान मला आयते मिळाले ती गीता मी आता मराठी भाषेतून सांगत आहे. तेव्हा येथे आश्चर्याला जागा कोठे आहे? ॥ १७३० ॥

**श्रीगुरुचेनि नांवें माती। डोंगरीं जयापासीं होती। तेणें कोळियें त्रिजगतीं। येकवद केली॥ १७३१॥**

**अर्थ**—डोंगरामध्ये श्रीगुरुचे (द्रोणाचार्य) नाव देऊन (त्यांची मूर्ति) ज्या कोळ्याने (एकलव्याने) मांडली त्याने सुद्धा त्रिभुवन हालवून सोडले. ॥ १७३१ ॥

**चंदनें वेधलीं झाडें। जालीं चंदनाचेनि पाडें। वसिष्ठें मांडली कीं भांडे। भानूसीं शाटी॥ १७३२॥**

**अर्थ**—चंदन वृक्षाचा गराडा पडलेली झाडे चंदनाच्याच सारखी (सुवासित) झाली. वसिष्ठानी (भांडणाच्या) निवाड्यासाठी (सूर्याच्या जागी) ठेवलेली छाटी, सूर्यासारखीच देदीप्यमान झाली. ॥ १७३२ ॥

**मा मी तव चित्ताथिला। आणि श्रीगुरु ऐसा दादुला। जो दिठीवेनि आपुला। बैसवी पदीं॥ १७३३॥**

**अर्थ**—मग मी तर सचेतन आहे आणि जो केवळ आपल्या कृपादृष्टीने आपल्या पदावर बसवतो अशा तऱ्हेचा श्रीगुरु सारखा माझा धनी आहे. ॥ १७३३ ॥

**आधींचि देखणी दिठी। वरी सूर्य पुरवी पाठी। तैं न दिसे ऐसी गोठी। केंही आहे॥ १७३४॥**

**अर्थ**—मूळची दृष्टी निर्मल असून तिला जर सूर्याचे साहाय्य मिळाले तर तिला (दृष्टीला) दिसणार नाही अशी कोणती गोष्ट आहे? ॥ १७३४ ॥

**म्हणोनि माझे नित्य नवे। श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे। श्रीगुरुकृपा काय नोहे। ज्ञानदेवो म्हणे॥ १७३५॥**

**अर्थ**—म्हणून माझे नित्य नवे श्वासोश्वास सुद्धा काव्यप्रबंध होऊ लागले आहेत. श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात की श्रीगुरुची कृपा काय करू शकणार नाही!॥ १७३५॥

**याकारणें मियां। श्रीगीतार्थ मऱ्हाठिया। केला लोकां यया। दिठीचा विषो॥ १७३६॥**

**अर्थ**—याच कारणामुळे श्री गीतेचा अर्थ मराठीमध्यें लोकांना आकलन होईल असा मी केला.॥ १७३६॥

**परी मऱ्हाठे बोल रंगें। कवळितां पैं गीतांगें। तैं गातयाचेनि पांगें। एकाढ्यता नोहे॥ १७३७॥**

**अर्थ**—परंतु माझ्या मराठी शब्दमाधुर्याच्या रंगाने जेव्हा कोणी गीतेतील शब्दादीक समजून घेईल तर सांगणाऱ्याच्या (संस्कृतमधून) उणीवेमुळे मराठी शब्दांच्या अर्थाला मर्यादितपणा येणार नाही.॥ १७३७॥

**म्हणौनि गीता गावों म्हणे। तैं गाणिवें होती लेणें। ना मोकळे तरी उणें। गीताही आणित॥ १७३८॥**

**अर्थ**—म्हणून माझ्या सार्थ मराठी गीतेचे जर कोणी पठन करील तर माझी मराठी टीकाही गीतेचा अलंकार होईल. पण जर केवळ मराठी टीकाच पठन करील तर ही गीता (मराठी टीका) संस्कृतमधून सांगितलेल्या अर्थालाही मागे सारील.॥ १४३८॥

**सुंदर आंगीं लेणें न सूये। तैं तो मोकळा शृंगारु होये। ना लेइलें तरी आहे। तैसें कें उचित॥ १७३९॥**

**कां मोतियांची जैसी जाती। सोनयाही मान देती। नातरी मानवती। अंगेंचि सडीं॥ १७४०॥**

**नाना गुंफिलीं कां मोकळीं। उणीं न होती परिमळीं। वसंतागमींचीं वाटोळीं। मोगरीं जैसीं॥ १७४१॥**

**तैसा गाणिवेनें मिरवी। गीतेवीणही रंगु दावी। तो लाभाचा प्रबंधु ओंवीं। केला मियां॥ १७४२॥**

**अर्थ**—सुंदर दागिना आंगावर घातला नाही तरी तो नुसताही शोभतोच. मग ज्या प्रमाणे आंगावर घातल्यावर आणखी चांगली गोष्ट ती कोणती?॥ १४३९॥ अथवा मोत्यांचा स्वाभाविक गुण असा की सोन्यालाही ती शोभा आणतात ती मोकळी असली तरी आपल्या अंगच्याच गुणांनी ज्याप्रमाणे शोभिवंत असतात.॥ १७४०॥ अथवा वसंत ऋतुच्या सुरवातीची मोगऱ्याची वाटोळी फुले मोकळी असोत किंवा गुंफली असोत सुगंधाच्या दृष्टीने त्यात ज्याप्रमाणे कोणताही कमीपणा रहात नाही.॥ १७४१॥ त्याप्रमाणे संस्कृत गीतेसह ही मराठी टीका सांगण्यात आली तर ती शोभा आणील पण गीते शिवाय ही नुसती माझी मराठी टीका सांगण्यात आली तरी ती शोभा देईल. अशा तऱ्हेचा (उभयप्रद) लाभ देणारा ओवीबद्ध काव्यग्रंथ मी केला आहे.॥ १७४२॥

**तेणें आबालसुबोधें। वोवीयेचेनि प्रबंधें। ब्रह्मरससुस्वादें। अक्षरें गुंथिलीं॥ १७४३॥**

**अर्थ**—लहान मुलापासून तो मोठ्या समजदार माणसापर्यंत सर्वांना सहज कळणारी ओवीच्या छंदात (वृत्तात) ब्रह्मरसाच्या गोडीने ओथंबलेली अक्षरे मी गुंफिली आहेत.॥ १७४३॥

**आतां चंदनाच्या तरुवरीं। परिमळालागीं फूलवरी। पारुखणें जियापरी। लागेना कीं॥ १७४४॥**

**तैसा प्रबंधु हा श्रवणीं। लागतखेंवो समाधि आणी। ऐकिलियाही वाखाणी। काय व्यसन न लवी॥ १७४५॥**

**अर्थ**—आता चंदनाच्या झाडांना सुवासाकरता फुले येईपर्यंत ज्याप्रमाणे वाट पहावी लागत नाही॥ १७४४॥ त्याप्रमाणे ही माझी ओवीबद्ध टीका श्रवण करताक्षणीच श्रोत्यांना समाधि लावते मग ती व्याख्यानरूपाने ऐकल्यानंतर ती ऐकण्याचा नाद लागणार नाही काय?॥ १७४५॥

**पाठ करितां व्याजें। पांडित्यें येती वेषजे। तैं अमृतातें नेणिजे। फावलिया॥ १७४६॥**

**अर्थ**—माझी टीका पठन (वाचीत असताना) करायला लागले की त्यानिमित्ताने मूर्तिमंत पांडित्य येऊन उभे राहते आणि त्यावेळी त्यातील गोडीचा अनुभव आला की अमृताचीही आठवण होत नाही.॥ १७४६॥

**तैसेनि आइतेपणें। कवित्व जालें हें उपेणें। मनन निदिध्यास श्रवणें। जिंतिलें आतां॥ १७४७॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे हे कवित्व अनायासेच (सर्वांना) विश्रांतिस्थान झाले आहे. आता मनन आणि निदिध्यासन हे एका श्रवणानेच साध्य झाले आहे.॥ १७४७॥

**हे स्वानंदभोगाची सेल। भलतयासीचि देईल। सर्वेंद्रियां पोषवील। श्रवणाकरवीं॥ १७४८॥**
**चंद्रातें आंगवणें। भोगूनि चकोर शहाणे। परी फावे जैसें चांदिणें। भलतया- ही॥ १७४९॥**
**तैसें अध्यात्मशास्त्रीं इये। अंतरंगचि अधिकारिये। परी लोकु वाक्चातुर्यें। होईल सुखिया॥ १७५०॥**

**अर्थ**—ही माझी टीका पाहिजे त्याला आत्मानंद भोगाचा शेवटचा वाटा देईल. आणि श्रवणेंद्रियाकडून सर्व इंद्रियांचे पोषण करील. ॥ १७४८ ॥ आपल्या आंगच्या गुणामुळे चंद्राचा उपभोग घेऊन (चंद्राचे अमृतकण सेवून) चकोर पक्षी चतुर ठरला आहे पण चंद्राच्या प्रकाशाचा आस्वाद मात्र सर्वांनाच ज्याप्रमाणे घेता येतो. ॥ १७४९ ॥ त्याप्रमाणे या अध्यात्मशास्त्राचे अंतर्मुख ज्ञानीच अधिकारी आहेत. पण यातील वाक् विलासाने मात्र सर्वांनाच आनंद मिळू शकेल. ॥ १७५० ॥

**गूढार्थदीपिका—तैसे अध्यात्मशास्त्रीं यिये। अंतरंगचि अधिकारियें।**

भगवदगीतेवर मराठीतून ओवीबद्ध केलेल्या आपल्या टीकेचे प्रयोजन याठिकाणी माउली सांगत आहे.

अर्जुनाला निमित्त करून अखंडपरमानंदरूपी मोक्षाचा ठेवा सर्व जगताला भगवंतानी उपलब्ध करून दिला. माउलीने मराठीतून आपली लालित्यपूर्ण व रसाळ त्यावर सविस्तर टीका लिहून आबाल वृद्धापर्यंत भगवंताच्या उपदेशाचे रहस्य पोहोचविण्याचे कार्य केले. माउलीचा वाक्विलास पाहिल्यानंतर सर्वसामान्य वाचकांना असे वाटते की गीतेवरील त्यांची ही टीका काव्याचे प्रयोजन मनात ठेऊन त्यांनी लिहिली. माउलीने या टीकेचा अधिकारी अध्यात्मशास्त्राची तळमळ असलेला व अंतर्मुख वृत्ती झालेला ज्ञानी आहे असे स्पष्ट सांगून, काव्य हे केवळ साधन आहे हे दर्शविले आहे. संपूर्ण भगवद्गीता व त्यावरील माउलीचे भाष्यरूप असलेली टीका यांचे प्रयोजन जीवाला त्याच्या मूळ आत्मस्वरूपाची ओळख करून देणे हे आहे. लोकांची बहिर्मुख वृत्ती व शब्दमाधुर्याची त्यांची ओढ लक्षात घेऊन माउलीने आपल्या काव्यमय भाषेचा साज त्या अध्यात्मावर चढविला एवढेच. पण साध्यसाधनाच्या भाषेत बोलायचे म्हणजे अद्वैतज्ञानपूर्वक पराभक्तीने अखंड परमानंदतेची याच देहाने प्राप्ती करून घेणे हे ध्येय व त्या प्राप्तीचे माध्यम म्हणजे विविध दृष्टान्त व साहित्यातील अलंकाराने नटलेले त्यांचे काव्यात्मक विवरण हे होय.

बाह्य विषयापासून इंद्रियांना परावृत्त करून अंत:करणातील अधिष्ठानरूप ब्रह्माकडे त्यांचा ओढा वळवणे हे साधन चतुष्टय संपन्न अधिकाऱ्यालाच शक्य आहे. अशा तऱ्हेचा अधिकारी पुरुषच माउलीच्या या टीकारूप वाङ्मयाचा खरा आस्वादक आहे. इतरांना शब्दांच्या लालित्यामुळे आनंद होत असला तरी ते अर्थाला झोंबू शकत नसल्यामुळे माउलीच्या वाङ्मयाचा खरोखर आस्वाद ते घेऊ शकत नाहीत.

**ऐसें श्रीनिवृत्तिनाथाचें। गौरव आहे जी साचें। ग्रंथु नोहे हें कृपेचें। वैभव तयें॥ १७५१॥**

**अर्थ**—महाराज, खरोखर असा हा श्रीनिवृत्तिनाथ महाराजांचा महिमा आहे. हा ग्रंथ नसून खरोखर हे त्यांच्या कृपेचे ऐश्वर्य आहे. ॥ १७५१ ॥

**क्षीरसिंधुपरिसरीं। शक्तीच्या कर्णकुहरीं। नेणों कैं श्रीत्रिपुरारीं। सांगितलें जें॥ १७५२॥**
**तें क्षीरकल्लोळाआंतु। मकरोदरीं गुप्तु। होता तयाचा हातु। पैठें जालें॥ १७५३॥**

**अर्थ**—क्षीरसमुद्राच्या परिसरामध्ये पार्वतीच्या कानात श्रीशंकरांनी जे सांगितले ते माहीत नाही॥ १७५२ ॥ पण त्यावेळी क्षीरसागराच्या लाटांमध्ये माशाच्या पोटामध्ये गुप्त असलेल्याला मत्स्येंद्रनाथांना ते ज्ञान हस्तगत झाले. ॥ १७५३ ॥

**तो मत्स्येंद्र सप्तशृंगीं। भग्नावयवा चौरंगीं। भेटला कीं तो सर्वांगीं। संपूर्ण जाला॥ १७५४॥**

**अर्थ**—तो मत्स्येंद्र सप्तशृंग पर्वतावर हातपाय तुटलेल्या चौरंगीला भेटतांच तो (चौरंगी) संपूर्ण अवयवयुक्त झाला. ॥ १७५४ ॥

**मग समाधि अव्यत्यया। भोगावी वासना यया। ते मुद्रा श्रीगोरक्षराया। दिधली मीनीं॥ १७५५॥**

**अर्थ**—मग निर्विघ्नपणे समाधीचे सुख भोगावे अशा इच्छेने ते गुह्य मच्छेंद्रनाथांनी श्रीगोरक्षरायाला दिले. ॥ १७५५ ॥

**तेणें योगाब्जिनीसरोवरु। विषयविध्वंसैकवीरु। तिये पदीं का सर्वेश्वरु। अभिषेकिले॥ १७५६ ॥**

**अर्थ**—योगरूपी कमळांचे सरोवर व विषयांचा नाश करण्यांत शूर असलेल्या अशा श्रीगोरक्षनाथास व मत्स्येंद्रनाथांनी सर्वेश्वर-अष्टांगयोगाधिकारी म्हणून (समाधि पदाच्या ठिकाणी) अभिषेक केला. ॥ १७५६ ॥

**मग तिहीं तें शांभव। अद्वयानंदवैभव। संपादिलें सप्रभव। श्रीगहिनीनाथा॥ १७५७॥**

**अर्थ**—मग त्या गोरक्षनाथांनी शंकरापासून प्राप्त झालेले अद्वैत आनंदाचे ऐश्वर्य मूळासकट श्रीगहिनीनाथाला दिले. ॥ १७५७ ॥

**तेणें कळि कळितु भूतां। आला देखोनि निरुता। ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा। दिधली ऐसी॥ १७५८ ॥**

**अर्थ**—कलिकाळ प्राण्यांना खरोखर ग्रास करण्यास आला आहे असे पाहून गहिनीनाथांनी श्रीनिवृत्तिनाथांना आज्ञा केली ती अशी॥ १७५८ ॥

**ना आदिगुरु शंकरा-। लागोनि शिष्यपरंपरा। बोधाचा हा संसारा। जाला जो आमुतें॥ १७५९ ॥**
**तो हा तूं घेऊनि आघवा। कळीं गिळितयां जीवां। सर्व प्रकारीं धांवा। करीं पां वेगीं॥ १७६० ॥**

**अर्थ**—की आद्यगुरु जो शंकर त्यापासून शिष्य परंपरेने हा जो बोधाचा विस्तार आमच्या पर्यन्त आला॥ १७५९ ॥ तो हा सर्व घेऊन कलीकडून गिळल्या जाणाऱ्या जीवांना संकटाच्यावेळी सर्वप्रकारे धावून सत्वर मदत कर॥ १७६० ॥

**आधींच तंव तो कृपाळु। वरी गुरुआज्ञेचा बोलु। जाला जैसा वर्षाकाळु। खवळणें मेघां॥ १७६१ ॥**
**मग आर्तांचेनि वोरसे। गीतार्थग्रंथनमिसें। वर्षला शांतरसें। तो हा ग्रंथु॥ १७६२ ॥**

**अर्थ**—पावसाळा येताच मेघ ज्याप्रमाणे जोराची वृष्टि करूं लागतात, त्याप्रमाणे आधीच कृपाळू असलेल्या निवृत्तिनाथांना गुरूची आज्ञा मिळताच॥ १७६१ ॥ मग पीडित जीवांवर करुणा करण्यासाठी गीतेचा अर्थ सांगण्याच्या निमित्ताने (निवृत्तिनाथाकडून) जी शांतरसाची वृष्टि झाली तो हा ग्रंथ होय॥ १७६२ ॥

**तेथ पुढा मी बापिया। मांडला आर्ती आपुलिया। कीं यासाठीं येवढिया। आणिलों यशा॥ १७६३ ॥**

**अर्थ**—तेव्हा मी चातकपक्षी आपल्या तीव्र इच्छेने समोर उभा होतो आणि त्यामुळेच मी एवढ्या यशाला पात्र झालो. ॥ १७६३ ॥

**एवं गुरुक्रमें लाधलें। समाधिधन जें आपुलें। तें ग्रंथें बांधौनि दिधलें। गोसावी मज॥ १७६४ ॥**

**अर्थ**—अशा रीतीने गुरुपरंपरेने प्राप्त झालेले जे समाधिरूप धन ते ग्रंथाच्या रूपाने बोध करून स्वामींनी (निवृत्तिनाथांनी) मला दिले. ॥ १७६४ ॥

**गूढार्थदीपिका—बोधाचा हा संसरा। जाला जो आमुते।** (ओ० १७५९)

**एवं गुरुक्रमें लाधले। समाधिधन जें आपुलें।** (ओ० १७६४)

ज्ञानदृष्टी प्राप्त होण्यापूर्वी सर्वांचीच जीवदशा असते. सद्‌गुरुंच्या बोधामृताने ज्ञानदृष्टीचा उदय होतो. या ठिकाणी श्रीज्ञानेश्वर महाराज ही ज्ञानदृष्टी आम्हाला श्रीगुरुपासून प्राप्त झाली असे स्वत:च सांगतात व गुरुपरंपरेने प्राप्त झालेले आपले समाधिरूपी धन स्वामींनी (श्रीनिवृत्तिनाथ महाराजांनी) मला दिले असे म्हणतात.

**वांचूनि पढे ना वाची। ना सेवाही जाणे स्वामीची। ऐसिया मज ग्रंथाची। योग्यता कें असे॥ १७६५ ॥**

**अर्थ**—ना मी काही शिकलो, ना मी काही वाचले, ना मला सद्‌गुरुची सेवा कशी करावी हे माहीत आहे अशा मला ग्रंथ करण्याची योग्यता कोठून येणार?॥ १७६५ ॥

**परी साचचि गुरुनाथें। निमित्त करूनि मातें। प्रबंधव्याजें जगातें। रक्षिलें जाणा॥ १७६६ ॥**

**अर्थ**—परंतु खरोखर सद्‌गुरुनाथांनी मला निमित्त करून या ग्रंथरचनेच्या मिषाने सर्व जगाचे रक्षण केले असे समजा. ॥ १७६६ ॥

**तऱ्ही पुरोहितगुणें। मी बोलिलों पुरें उणें। तें तुम्हीं माउलीपणें। उपसाहिजो जी॥ १७६७॥**

**अर्थ**—तरी सद्‌गुरुंचा एक पुरोहित म्हणून मी जे काही कमी जास्त बोललो असेल ते आपण (श्रोत्यांनी) आईच्या वात्सल्याने सहन करावे. ॥ १७६७ ॥

**शब्द कैसा घडिजे। प्रमेयीं कैसें पां चढिजे। अळंकारु म्हणिजे। काय तें नेणें॥ १७६८ ॥**

**अर्थ**—शब्द कसा योजावा, सिद्धांताची मांडणी कशी करावी, साहित्यशास्त्रांतील अलंकार कशाला म्हणतात यापैकी काहीही मला माहीत नाही. ॥ १७६८ ॥

**सायिखडेयाचें बाहुलें। चालवित्या सूत्राचेनि चाले। तैसा मातें दावीत बोले। स्वामी तो माझा॥ १७६९ ॥**

**अर्थ**—कळसूत्री बाहुले, चालविणाऱ्याच्या दोऱ्याने चालत असते. त्याप्रमाणे मला पुढे करून माझे सद्‌गुरु बोलत आहेत. ॥ १७६९ ॥

**यालागीं मी गुणदोष-। विषीं क्षमाविना विशेष। जे मी संजात ग्रंथलों देख। आचार्यें कीं॥ १७७० ॥**

**अर्थ**—ह्या करता मी गुणदोषाबद्दल विशेष क्षमा मागत नाही कारण सद्‌गुरुच्या प्रेरणेतून निर्माण झालेला ग्रंथच मी केला आहे. ॥ १७७० ॥

**आणि तुम्हां संतांचिये सभे। जें उणिवेंसी ठाके उभें। तें पूर्ण नोहे तैं लोभें। तुम्हांसीचि कोपें॥ १७७१ ॥**

**अर्थ**—आणि तुम्हा संतांच्या सभेमध्ये जर उणिव कायमच राहील आणि ती पूर्ण होणार नाही तर मग लडिवाळपणाने मी तुमच्यावरच रागावीन॥ १७७१ ॥

**सिवतलियाही परिसें। लोहत्वाचिये अवदसे। न मूकिजे आयसें। तैं कोणा बोलु॥ १७७२ ॥**

**अर्थ**—परिसाचा स्पर्श होऊनही लोखंडाच्या निकृष्ट दशेला जर लोखंड मुकले नाही तर तो दोष कोणाचा? ॥ १७७२ ॥

**वोहळें हेंचि करावें। जे गंगेचें आंग ठाकावें। मगही गंगा जरी नोहावे। तैं तो काय करी॥ १७७३ ॥**

**अर्थ**—लहानशा ओढ्याने एकच करायचे कीं गंगेच्या प्रवाहाला जाऊन मिळायचे. मग देखील तो गंगा झाला नाही तर त्याने काय करावे? ॥ १७७३ ॥

**म्हणौनि भाग्ययोगें बहुवें। तुम्हां संतांचे मी पाये। पातलों आतां कें लाहे। उणें जगीं॥ १७७४ ॥**

**अर्थ**—म्हणून मोठ्या भाग्य योगाने मी तुम्हा संतांच्या पायाजवळ येऊन पोहोचलो तेव्हा आता जगात उणे असे काय रहाणार आहे? ॥ १७७४ ॥

**अहो जी माझेनि स्वामी। मज संत जोडुनि तुम्हीं। दिधलेति ते सर्वकामीं। परिपूर्ण जालों॥ १७७५ ॥**

**अर्थ**—अहो महाराज, माझ्या सद्‌गुरुस्वामींनी मला आपल्या सारख्या संतांची जोड मिळवून दिली त्यामुळे मी आता सर्वबाबतीत परिपूर्ण झालो॥ १७७५ ॥

**पाहा पां मातें तुम्हां सांगडें। माहेर तेणें सुरवाडें। ग्रंथाचें आळियाडें। सिद्धी गेलें॥ १७७६ ॥**

**अर्थ**—पहा की तुम्हा संतांसारखे माहेर मला लाभले. त्यामुळे हा माझा ग्रंथाचा हट्ट सुखाने फलद्रूप झाला॥ १७७६ ॥

**जी कनकाचें निखळ। वोतूं येईल भूमंडळ। चिंतारत्नीं कुळाचळ। निर्मूं येती॥ १७७७ ॥**

**अर्थ**—महाराज! सर्व पृथ्वी सोन्याने मढविता येईल, सर्व पर्वत चिंतामणीरत्नांचेच करता येतील॥ १७७७ ॥

**सातांही हो सागरातें। सोपें भरितां अमृतें। दुवाड नोहे तारांतें। चंद्र करितां॥ १७७८ ॥**

**कल्पतरूचे आराम। लावितां नाहीं विषम। परी गीतार्थाचें वर्म। निवडूं न ये॥ १७७९ ॥**

**अर्थ**—सात समुद्रही अमृताने सहज भरता येतील ताऱ्यांचे चंद्र करणे कठीण नाही॥ १७७८ ॥ कल्पतरूंचे बगीचे लावणे कठीण नाही. पण गीतेच्या अर्थाचे मर्म मात्र काढून दाखवता येणार नाही. ॥ १७७९ ॥

**तो मी येकु सर्वमुका। बोलोनि मऱ्हाठिया भाखा। करीं डोळेवरी लोकां। घेवों ये ऐसें जें॥ १७८० ॥**

**अर्थ**—मी एक केवळ मुका असलेला, तो गीतेचा अर्थ मराठीत सांगून सर्वसाधारण लोकांच्या दृष्टीला सहज आकलन होईल असा केला॥ १७८०॥

**हा ग्रंथसागरु येव्हढा। उतरोनि पैलीकडा। कीर्तिविजयाचा धेंडा। नाचे जो का॥ १७८१॥**

**अर्थ**—हा एवढा ग्रंथ समुद्र पार करून पलीकडे गेल्याचा कीर्तिरूप विजयाचा झेंडा जो फडकतो॥ १७८१॥

**गीतार्थाचा आवारु। कळशेंसीं महामेरु। रचूनि माजीं श्रीगुरु-। लिंग जें पूजी॥ १७८२॥**

**अर्थ**—तो मी गीतेच्या अर्थाच्या आवारात अठरावा अध्यायरूपी कळसासह महामेरुपर्वत तयार करून त्याठिकाणी श्रीगुरुमूर्तीची (शिवलिंगाची) पूजा करीत आहे.॥ १७८२॥

**गीता निष्कपट माय। चुकोनि तान्हें हिंडे जें वाय। ते मायपूता भेटी होय। हा धर्म तुमचा॥ १७८३॥**

**अर्थ**—गीतारूप निष्कपट आईला चुकवून हे मूल व्यर्थ भटकत होते. त्या मायलेकराची भेट करून दिली, हा तुमचा स्वभावच आहे॥ १७८३॥

**तुम्हां सज्जनांचें केलें। आकळुनी जी मी बोलें। ज्ञानदेव म्हणे थेंकुलें। तैसें नोहे॥ १७८४॥**

**अर्थ**—ज्ञानदेव म्हणतात—महाराज तुम्ही सज्जनांनी केलेल्याचा विचार करून मी बोलत आहे. हे उगाच काहीतरी बोलणे नव्हे.॥ १७८४॥

**काय बहु बोलों सकळां। मेळविलों जन्मफळा। ग्रंथसिद्धीचा सोहळा। दाविला जो हा॥ १७८५॥**

**अर्थ**—फार काय बोलावे! तुम्ही हा जो ग्रंथ समाप्तीचा आनंदाचा सोहळा दाखवला त्यामुळे माझ्या सर्व जन्माचे सार्थक झाले.॥ १७८५॥

**मियां जैसजैसिया आशा। केला तुमचा भरंवसा। ते पुरवूनि जी बहुवसा। आणिलों सुखा॥ १७८६॥**

**अर्थ**—महाराज, मी आपल्या भरवशावर जितक्या जितक्या आशा धरल्यात त्या सर्व तुम्ही पूर्ण करून मला परमसुखाला पोहोचविले.॥ १७८६॥

**मजलागीं ग्रंथाची स्वामी। दुजी सृष्टी जे हे केली तुम्हीं। तें पाहोनि हांसों आम्ही। विश्वामित्रातेंही॥ १७८७॥**

**अर्थ**—महाराज, माझ्या करता तुम्ही जी ग्रंथाची दुसरी सृष्टी निर्माण केलीत ती पाहून आम्ही विश्वामित्राला देखील हसूं!॥ १७८७॥

**जे असोनि त्रिशंकुदोषें। धातयाही आणावें वोसें। तें नासतें कीजे कीं ऐसें। निर्मावें नाहीं॥ १७८८॥**

**अर्थ**—कारण, त्रिशंकूकरता ब्रह्मदेवालाही उणेपणा आणण्यासाठी दुसरी सृष्टी निर्माण केली पण ती नाशिवंत होती. ही (ग्रंथरूप सृष्टी) मात्र तशी नाही. (अविनाशी आहे)॥ १७८८॥

**शंभू उपमन्यूचेनि मोहे। क्षीरसागरूही केला आहे। येथ तोही उपमे नोहे। जे विषगर्भ कीं॥ १७८९॥**

**अर्थ**—शंकराने उपमन्यूच्या प्रेमाने क्षीरसमुद्रही निर्माण केला. पण तोही येथे उपमा देण्यास योग्य होत नाही कारण त्याच्या (क्षीरसागराच्या) पोटात विष आहे.॥ १७८९॥

**अंधकारु निशाचरां। गिळितां सूर्ये चराचरां। धांवा केला तरी खरा। ताउनी कीं तो॥ १७९०॥**

**अर्थ**—अंधकाररूपी राक्षस सर्व सृष्टीला गिळीत असता सूर्याने धावत येऊन त्या संकटातून सर्व सृष्टीला वाचवले खरे, पण ते ताप देऊन (ऊष्णतेने)॥ १७९०॥

**तातलियाही जगाकारणें। चंद्रें वेंचिलें चांदणें। तया सदोखा केवीं म्हणे। सारखें हें॥ १७९१॥**

**अर्थ**—होरपळलेल्या जगासाठी चंद्राने शीतल चांदणे पाडले पण कलंक असलेल्या त्या चंद्रासारखे हे आहे असे कसे म्हणता येईल?॥ १७९१॥

**म्हणौनि तुम्हीं मज संतीं। ग्रंथरूप जो हा त्रिजगतीं। उपयोग केला तो पुढती। निरुपम जी॥ १७९२॥**

**अर्थ**—म्हणून महाराज, तुम्ही संतांनी ग्रंथाच्या रूपाने मला निमित्त करून माझ्यावर जो उपकार केला पुन: पुन: विचार केला असता त्रिभुवनात अनुपम आहे असे म्हणावे लागते. ॥ १७९२ ॥

**किंबहुना तुमचें केलें। धर्मकीर्तन हें सिद्धी गेलें। येथ माझें जी उरलें। पाईकपण॥ १७९३॥**

**अर्थ**—महाराज, फार काय बोलावे! तुम्ही केलेले हे धर्मासंबंधीचे व्याख्यान तुमच्याच कडून शेवटास गेले. आणि यात माझा सेवकपणाच काय तो उरला. ॥ १७९३ ॥

**आतां विश्वात्मकें देवें। येणें वाग्यज्ञें तोषावें। तोषोनि मज द्यावें। पसायदान हें॥ १७९४॥**

**अर्थ**—आता विश्वरूप झालेल्या भगवंताने या वाणीरूपी यज्ञाने संतुष्ट व्हावे व संतुष्ट होऊन मला हे प्रसादरूपी दान द्यावे. ॥ १७९४ ॥

**जे खळांची व्यंकटी सांडो। तया सत्कर्मीं रती वाढो। भूतां परस्परें पडो। मैत्र जीवाचें॥ १७९५॥**

**अर्थ**—की दुष्टांचा वाकडेपणा (दुष्टपणा) नाहीसा व्हावा आणि त्यांची सत्कर्माच्या ठिकाणी आवडी वाढावी व प्राण्यांचे एकमेकाशी जीवाभावाच्या मित्रत्वाचे संबंध जडावेत. ॥ १७९५ ॥

**दुरिताचें तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो। जो जें वांछील तो तें लाहो। प्राणिजात॥ १७९६॥**

**अर्थ**—पापरूपी अंधकार नाहीसा व्हावा व जगात स्वधर्मरूप सूर्याचा उदय व्हावा. आणि जो जो प्राणी जी जी इच्छा करील ती ती त्याची परिपूर्ण व्हावी. ॥ १७९६ ॥

**वर्षत सकळमंगळीं। ईश्वरनिष्ठांची मांदियाळी। अनवरत भूमंडळीं। भेटो तयां भूतां॥ १७९७॥**

**अर्थ**—ईश्वरनिष्ठ लोकांचा समुदाय संपूर्ण कल्याणाचा वर्षाव करीत या भूतलावर सदोदित सर्व प्राण्यांना भेटावा. ॥ १७९७ ॥

**चलां कल्पतरूंचे आरव। चेतनाचिंतामणीचे गांव। बोलते जे अर्णव। पीयूषाचे॥ १७९८॥**
**चंद्रमे जे अलांछन। मार्तंड जे तापहीन। ते सर्वांही सदा सज्जन। सोयरे होतु॥ १७९९॥**

**अर्थ**—चालते बोलते कोटयावधि कल्पतरूंचे वृक्षच, सजीव चिंतामणीचे गांवच, अमृताचे बोलणारे समुद्रच॥ १७९८॥ जे कलंकरहित चंद्र, जे तापरहित सूर्य, असे जे संतसज्जन ते सर्वांचे सदासर्वकाळ आप्त होवोत. ॥ १७९९ ॥

**किंबहुना सर्वसुखीं। पूर्ण होऊनि तिहीं लोकीं। भजिजो आदिपुरुखीं। अखंडित॥ १८००॥**

**अर्थ**—फार काय सांगायचे! स्वर्ग, मृत्यु व पाताळ या तिन्ही लोकात रहाणारे सर्व प्राणिमात्र सर्वसुखाने परिपूर्ण होऊन आदिपुरुषाच्या भजनी निरंतर राहावेत. ॥ १८०० ॥

**आणि ग्रंथोपजीविये। विशेषीं लोकीं इयें। दृष्टादृष्टविजयें। होआवें जी॥ १८०१॥**

**अर्थ**—आणि महाराज! या श्लोकात विशेषकरून हा ग्रंथ ज्यांचा जीवनसर्वस्व होऊन राहिला असेल त्यांना या लोकांतील व परलोकातील भोगावर विजय प्राप्त होवो. ॥ १८०१ ॥

**येथ म्हणे श्रीविश्वेशरावो। हा होईल दानपसावो। येणें वरें ज्ञानदेवो। सुखिया झाला॥ १८०२॥**

**अर्थ**—तेव्हा विश्वाचे प्रभुराव श्री निवृत्तिनाथ महाराज म्हणाले "हा दानप्रसाद मिळेल" या वराने ज्ञानदेव आनंदित झालेत. ॥ १८०२ ॥

**ऐसें युगीं परी कळीं। आणि महाराष्ट्रमंडळीं। श्रीगोदावरीचां कूलीं। दक्षिणलिंगी॥ १८०३॥**
**त्रिभुवनैकपवित्र। अनादि पंचक्रोशक्षेत्र। जेथ जगाचें जीवसूत्र। श्रीमहालया असे॥ १८०४॥**
**तेथ यदुवंशविलासु। जो सकळकळानिवासु। न्यायातें पोषी क्षितीशु। श्रीरामचंद्र॥ १८०५॥**

**अर्थ**—अशाप्रकारे कलियुगात आणि महाराष्ट्रदेशामध्ये, गोदावरीच्या दक्षिण तीरावर॥ १८०३॥ तिन्ही लोकांमध्ये अत्यंत पवित्र असे जे अनादि पाच कोसाचे क्षेत्र आहे व जेथे जगातील सर्व घडामोडींचे नियंत्रण करणारी अशी श्रीमहालया वास्तव्य करते॥ १८०४॥ तेथे यदुवंशाला ललामभूत असलेला व सर्व कलांमध्ये प्रवीण असलेला श्रीरामचंद्र राजा न्यायाने राज्य करीत होता॥ १८०५॥

**तेथ महेशान्वयसंभूतें। श्रीनिवृत्तिनाथसुतें। केलें ज्ञानदेवें गीते। देशीकार लेणें॥ १८०६॥**

**अर्थ**—तेथे (त्या नेवाशामध्ये) आदिनाथ शंकर यांच्या परंपरेत जन्मलेला श्रीनिवृत्तिनाथांचा शिष्य जो ज्ञानदेव त्याने गीतेवर देशीभाषेचा (मराठी भाषेचा) अलंकार चढवला॥ १८०६॥

**एवं भारताच्या गांवीं। भीष्मनाम प्रसिद्ध पर्वी। श्रीकृष्णार्जुनीं बरवी। गोठी जे केली॥ १८०७॥**
**जें उपनिषदांचें सार। सर्व शास्त्रांचें माहेर। परमहंसीं सरोवर। सेविजे जें॥ १८०८॥**
**तिये गीतेचा कळसु। संपूर्ण हा अष्टादशु। म्हणे निवृत्तिदासु। ज्ञानदेवो॥ १८०९॥**

**अर्थ**—अशाप्रकारे भारताच्या गावात भीष्मनावाने प्रसिद्ध असलेल्या पर्वात श्रीकृष्ण व अर्जुन यांचा जो सुंदर संवाद झाला॥ १८०७॥ उपनिषदांचे जे सार आहे, सर्व शास्त्रांचे जे माहेर आहे व परमहंसरूपी राजहंसानी सेवन करण्याचे जें मानस सरोवर आहे॥ १८०८॥ निवृत्तिनाथांचे दास श्रीज्ञानदेव म्हणतात, अशा त्या गीतेचा हा अठरावा अध्याय कळस असून तो येथे संपूर्ण झाला आहे.॥ १८०९॥

**पुढती पुढती पुढती। इया ग्रंथपुण्यसंपत्ती। सर्वसुखीं सर्वभूतीं। संपूर्ण होईजे॥ १८१०॥**

**अर्थ**—या ग्रंथाच्या पुण्यरूप संपत्तीने सर्व प्राणिमात्रांनी सर्व प्रकारच्या सुखांनी उत्तरोत्तर परिपूर्ण व्हावे.॥ १८१०॥

**शके बाराशतें बारोत्तरें। तैं टीका केली ज्ञानेश्वरें। सच्चिदानंदबाबा आदरें। लेखकु जाहला॥ १८११॥**

**अर्थ**—शके बाराशे बारामध्ये श्रीज्ञानेश्वरांनी ही टीका केली आणि सच्चिदानंदबाबा यांनी ती लिहिण्याचे काम मोठ्या आदराने केले.॥ १८११॥

**इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां अष्टादशोऽध्यायः॥ १८॥**

**श्रीसद्गुरुमाऊलीच्या कृपेने श्रीज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायाचा अनुवाद गूढार्थ दीपिकेसह पूर्ण झाला तो श्रीसद्गुरु चरणी समर्पण असो.**



॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ॥

## समारोप

मागील सतराव्या अध्यायातील शेवटच्या श्लोकात भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगितले की अश्रद्धेने यज्ञ, तप, दानादिक केली असता त्यांची इहलोकी काहीच फळे मिळत नाहीत. अशी कर्मे करणे नुसता शीणच होय. परमात्मा श्रीकृष्णाचे हे बोलणे ऐकून अर्जुनाला वाटले की कर्मे ही द्वाडच आहेत. कर्मामुळेच नाना प्रकारच्या योनीत जन्म घ्यावा लागतो कर्मांचा त्यागच करावा हे उत्तम. ही शंका दूर करण्याकरिता अर्जुनाने कर्माचा संन्यास व त्याग याविषयी श्रीकृष्णाला प्रश्न केला. त्याचे विवरण म्हणजे हा अठरावा अध्याय होय. यात गीतेचे सार श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगितले म्हणून याला एकाध्यायी गीताही म्हणतात.

अर्जुन म्हणतो, परमेश्वरा श्रीकृष्णा! मी संन्यास व त्याग यांचे तत्त्व जाणूं इच्छितो. तरी आपण त्यांचे स्पष्ट निरूपण करावे.

भगवान म्हणतात, अर्जुना! काम्य कर्माचा त्याग याला संन्यास म्हणतात व सर्व कर्मांच्या फळांचा त्याग, याला त्याग म्हणतात.

कांही विद्वान कर्म बंधनकारक आहेत म्हणून त्यांचा त्याग करावा, असे म्हणतात तर काही म्हणतात की यज्ञ, दान, तप इत्यादिक कर्मांचा त्याग करू नये, माझे निश्चित मत मात्र असे आहे—

त्याग हा सात्त्विक, राजस, तामस असा तीन प्रकारचा आहे. जोपर्यंत आत्मज्ञानाचा पूर्ण निश्चय होत नाही तोपर्यंत यज्ञ, दान, तप ही कर्मे अवश्य करावीच. ती अंत:करण शुद्धीला परंपरेने कारणीभूत आहेत. आपल्याला जे कर्म विहित आहे, त्याचा त्याग, हा तामस त्याग होय. कर्म करण्याने शरीराला कष्ट पडतात. म्हणून शारीरिक कष्टाला भिऊन जो कर्माचा त्याग तो राजस त्याग होय. मी कर्माचा कर्ता आहे हा अहंकार टाकून व कर्माच्या फळाची इच्छा न धरता जे विहित कर्म केले जाते तो सात्विक त्याग होय. सात्विक कर्म करणारा पुरुषच पुढे ज्ञानाचा अधिकारी होतो. देह धारण करणाऱ्या पुरुषाला सर्व कर्माचा त्याग करणे अशक्य आहे कर्माची, अनिष्ट, इष्ट व मिश्र अशी तीन प्रकारची फळे सांगितली आहेत अज्ञानी लोकांना देहत्याग केल्यानंतर ती भोगावीच लागतात. ज्ञानी लोकांचा कर्माचा संबंध सुटला असल्यामुळे ती भोगावी लागत नाहीत.

सर्व कर्मांच्या सिद्धीला वेदान्तात पांच कारणे सांगितली आहेत.

**(१) अधिष्ठान**—म्हणजे इच्छा, द्वेष, सुख दु:ख, ज्ञान इत्यादिकांच्या अभिव्यक्तीचा आश्रय जो देह. **(२) कर्ता**—म्हणजे जीव, ज्याने सर्वस्वी देहाशीच संबंध जोडला आहे. **(३) करण**—म्हणजे दहा इंद्रिये, मन व बुद्धि. **(४) चेष्टा**—म्हणजे प्राणापानादिक वायूंच्या नानाप्रकारच्या क्रिया. **(५) व (६) दैवम्**—म्हणजे इंद्रियांच्या अधिष्ठात्री देवता.

जितकी काही बरी वाईट कर्मे आहेत त्यांना ही पांच कारणेच कारणीभूत आहेत. आत्मा, मात्र या सर्व कर्मांहून निराळा आहे. अज्ञानी पुरुष हे जाणत नाही, कारण त्याच्या बुद्धीला गुरु, शास्त्र न्याय यांचा संस्कार झालेला नसतो. ज्ञानी लोक मी या सर्व कर्माहून निराळा आहे असे पाहतात. ज्याच्या ठिकाणी मी कर्म करतो हा अहंकार उठत नाही तो कोणत्याही कर्माने बांधला जात नाही. ज्ञाता, ज्ञान ज्ञेय ही त्रिपुटी कर्माला प्रवृत्त करणारी आहे. कर्म कर्ता, करण ही त्रिपुटी कर्म घडवून आणते.

ज्ञान, कर्म, कर्ता हे सत्त्व, रज, तम या तीन गुणांनी तीन प्रकारच्या विभागात पडते असे सांख्यदर्शनशास्त्रांत सांगितले आहे.

सर्व भूतांमध्ये ज्या ज्ञानाने एक आत्मवस्तु ग्रहण केली जाते ते सात्विक ज्ञान होय. सर्वप्राण्यांमध्ये असलेला आत्मा ज्या ज्ञानाने भिन्न भिन्न स्वरूपाने ग्रहण केला जातो ते राजस ज्ञान होय. जड देह म्हणजेच आत्मा व पाषाणाचा

देव म्हणजेच ईश्वर अशा मर्यादित स्वरूपाने जे ज्ञान आत्मस्वरूपाला पाहते ते तामसज्ञान होय. जे विहित कर्म आसक्तिरहित व रागद्वेषावाचून फलाची इच्छा न धरता केले जाते, ते सात्त्विक कर्म होय. फलाची इच्छा धरून अहंकाराने व पुष्कळकष्ट करून जे कर्म केले जाते ते राजसकर्म होय, जे कर्म पुढे काय परिणाम होईल याचा विचार न करता प्राण्यांना पीडा देऊन व आपले बल व धन यांचा व्यर्थ क्षय करून, मोहाने केले जाते ते तामस कर्म होय. 'मी' 'मी' म्हणणे ज्याचे शील नाही, धैर्य धरून जो उत्साहाने आपले विहित कर्म करतो, कर्म पूर्णपणे पार पडले तर आनंद मानित नाही व मध्येच खंड पडला तर दु:ख करीत नाही. तो सात्त्विक कर्ता होय, कर्माच्या ठिकाणी आसक्ति ठेवणारा, कर्मफलाची इच्छा करणारा, लोकांना दु:ख होईल असे कर्म करणारा, बाह्य व आंतरशुद्धि न ठेवणारा, कर्म सिद्धीस गेले तर आनंद मानणारा व कर्मसिद्धि झाली नाही तर दु:ख करणारा राजसकर्ता होय. जो चित्ताला कधीही आवरत नाही, जो शास्त्र संस्काररहित व अविनीत आहे, जो दुसऱ्याच्या वृत्तीचा छेद करतो, जो आळशी असून नेहमी दु:खीच असतो, जो आजचे काम उद्यावर ढकलतो, तो तामस कर्ता होय.

बुद्धि, धैर्य व सुख यांचेही तीन गुणामुळे तीन भेद झाले आहेत. इहलोकांत व परलोकांत असा प्राणी नाही की जो या तीन गुणांत सांपडला नाही. देवांना सुद्धा या तीन गुणांनी व्याप्त केले आहे व या तीन गुणामुळेच मनुष्य चातुवर्णांत पडला आहे. म्हणून वेदांनी व शास्त्रांनी त्यांच्या कल्याणाकरितां त्यांना अनुष्टेय अशी निरनिराळी कर्मे वाटून दिली आहेत.

मन इंद्रियांपासून आवरणे इंद्रियांना विषयाकडे जाऊ न देणे, तप, शांति, सरळपणा, ज्ञान, विज्ञान, ईश्वराचे अस्तित्व मानणे ही ब्राह्मणाची कर्मे होत. शौर्य, दुसऱ्याकडून पराभूत न होणे, धैर्य, दक्षता व प्रजेवर प्रेम करणे ही क्षत्रियाची कर्मे होत. शेत नांगरणे, पशूचे पालन करणे. देवधेवीचा व्यापार करणे ही वैश्याची कर्मे होत व या तिन्ही वर्णाची सेवा करणे हे शूद्राचे कर्म होय.

आपल्या वर्णाप्रमाणे प्राप्त झालेल्या कर्मात नेहमी तत्पर असावे. या योगानेच अंत:करणशुद्धि होते. ज्ञान प्राप्त होण्यास ही अंत:करणशुद्धि आवश्यक आहे. ती नुसत्या कर्म केल्याने होत नाही तर जो सर्व जगाची उत्पत्ति, स्थिति लय करणारा असून सर्व प्राणिमात्रात भरलेला आहे त्या ईश्वराला ते सर्व कर्मे समर्पण करावे. आपला विहित धर्म आचरण्यास कठीण असला व परधर्माचे आचरण सुलभ असले तरी आपला धर्म सोडून दुसऱ्याच्या धर्माचे आचरण करू नये. आपलाच विहित धर्म आपल्याला कल्याणकारक आहे. सर्व कर्म परमेश्वराला समर्पण केले असता परमेश्वराचा अनुग्रह प्राप्त होऊन त्याचे ठिकाणी वैराग्य प्राप्त होते. विषयात त्याला गोडी वाटत नाही. तो एकान्त सेवन करतो, शरीर व्यवहार चालतील एवढाच आहार घेतो. सतत परमेश्वराचे ध्यान व योग यात तो तत्पर असतो. अहंता, ममता, काम, क्रोध, लोभ, परिग्रह यांचा तो त्याग करतो व त्याचे ठिकाणी शांति बाणते. हे सात्विक गुण, पुरुषाचे ठिकाणी प्राप्त झाले असता तो ज्ञानप्राप्ति करून घेण्यास योग्य होतो. अशा पुरुषाला मग श्रीगुरुची भेट होऊन श्रीगुरु त्याला ज्ञानाचा उपदेश करतात. ब्रह्मज्ञान झाल्यानंतर पराभक्ति त्याला प्राप्त होते. भक्तीनेच अर्जुना! माझे खरे स्वरूप तत्त्वत: कळते. म्हणून वारंवार सांगतो की सर्व कर्मे मला समर्पण कर, माझाच आश्रय कर. मी प्रसन्न झालो असता माझे शाश्वत, अविनाशी असे पद तुला प्राप्त होईल. अंत:करणात माझे सतत ध्यान राहिल्यास तुझी सर्व विघ्ने नाहिशी होतील. व तूं हा संसारसागर सहज तरून जाशील. पण जर का अहंकार वागवून माझे ऐकणार नसशील तर तुझा सर्वस्वी घात होईल. अर्जुना! मी लढाई करीत नाही, हा जो तुझा निश्चय आहे तो व्यर्थ आहे. तुझ्या पूर्वकर्माने हा क्षत्रिय देह तुला प्राप्त झाला आहे. या क्षत्रिय स्वभावा विरुद्ध मोहाने मी लढाई करीत नाही असे म्हणत असलास तरी तुझा क्षत्रिय स्वभावच तुला लढाई करण्यास प्रवृत्त करील.

ईश्वर सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांत वास करतो व तोच त्यांच्या स्वभावानुसार सर्व कर्म घडवून आणीत असतो. त्या ईश्वराला शरण जा. तो प्रसन्न झाला असता तुला शांति मिळून अविनाशी असे स्थान प्राप्त होईल.

अर्जुना! गुह्यांत अत्यंत गुह्य असे हे ज्ञान तुला सांगितले. याचा विचार कर. मग तुझी इच्छा असेल तसे कर

तूं मला अत्यंत प्रिय असल्यामुळे तुझ्या हिताचीच गोष्ट सांगतो की, तूं आपले मन माझें कडे सतत लावून ठेव माझेच पूजन करणारा हो. मलाच नमस्कार कर म्हणजे तूं माझ्याशी ऐक्य पावशील. हे मी सत्य प्रतिज्ञेने सांगतो. भगवद्भक्तालाच अखंड परमानंद प्रातिरूप मोक्ष होतो. म्हणून पुन: सांगतो की अर्जुना! भगवत्परायण हो, धर्माधर्माचा त्याग कर व मलाच शरण ये. दु:ख करू नकोस.

अर्जुना! तपश्चर्या न करणारा, अभक्त, गुरु व ईश्वर यांची सेवा न करणारा, माझे ईश्वरत्व न जाणणारा, त्यांना हे मी उपदेशिलेले ज्ञान सांगू नकोस. हे परमगुह्य ज्ञान जो माझ्या भक्तांना श्रवण करवील तो मत्स्वरूप होईल. मनुष्यांमध्ये ज्ञानोत्तर भक्ति संप्रदाय चालविंणारा पुरुष श्रेष्ठ होय. तो मला अत्यंत प्रिय असतो. अर्जुना! आपला हा गीता शास्त्ररूपी संवाद जो पठन करील तो मला अत्यंत प्रिय होईल. ज्ञानयज्ञ केल्याचे फळ त्याला प्राप्त होईल. तसेच श्रद्धा ठेवून एकाग्र चित्ताने श्रवण करणाराही अत्यंत प्रशंसनीय पुरूष समज. भगवान श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना! हे गीताशास्त्र तूं एकाग्र चित्ताने ऐकलेस ना! मग तो तुझा अज्ञानामुळे प्राप्त झालेला मोह नाहीसा झाला ना! अर्जुन म्हणतो भगवंता! आपल्या कृपेने माझा सर्व मोह नाहीसा होऊन मी आपल्या मूळच्या सच्चिदानंद स्थितीला प्राप्त झालो आहे. माझे सर्व संशय नाहीसे झाले आहेत. आतां तूं सांगशील तसे करीन.

संजय म्हणतो, हे धृतराष्ट्रा! माहात्म्या श्रीकृष्णाचा व अर्जुनाचा हा आश्चर्यकारक संवाद मी ऐकला. आनंद-सागरात बुडून गेलो. माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले व्यासांच्या कृपेनेच अत्यंत गुह्य हा उपदेश मला ऐकण्याचा योग आला. हा पुण्यरूप संवाद माझ्या अंत:करणात इतका ठसला आहे की पुन: पुन: त्याचे स्मरण होऊन मी आनंदित होत आहे. श्रीकृष्णाच्या अत्यद्भुत विश्वरूपाची आठवण झाली म्हणजे अंत:करणात आनंदाच्या लाटा उसळतात. धृतराष्ट्रा! या लढाईत कोणाला जय मिळेल याचे भविष्य मी सांगतो ऐक. ज्या बाजूला श्रीकृष्ण परमात्मा साह्यकारी आहे ज्या पक्षामध्ये अर्जुनासारखा गांडीव धनुष्य धारण करणारा अर्जुन आहे त्या बाजूला लक्ष्मी, विजय, ऐश्वर्य आणि नीति यांचा वास राहणार हे प्रतिज्ञेने सांगतो.

**॥ श्रीमद् सद्गुरु श्रीज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु ॥**



